# हळदीघाटचें युद्ध

(गुजराथी ' पत्राच्या उपहारमालांतर्गत ' हळदीघाटनुं युद्ध ' नामक पुस्तकावरून )

अनुवादक

सदाशिव दिनकर वझे.

मालवण.

" There is not a pass in the Alpine Aravali that is not sanctified by some deed of Pratap, some brilliant Victory, or oftener, more glorious defeat. Haldighat is the Thermapylea of Mewar, the field of Deweir her Marathon.

Tod's Rajasthan.

प्रकाशक

दत्तात्रय गोविंद सडेकर

खानापूर—" धनंजय " छा० मालक

सन १९१०

किंमत एक रुपया.

# अर्पण पत्रिका.

माझे परमपूज्य कैलासवासी

वडील

ती० दिनकर गोविंद वझे,

" हिंद आणि ब्रिटानिया " लालन बैरागीण '

" आई आणि मुलें" "सीता वनवास"

" राम आणि रावण " इत्यादि

पुस्तकांचे कर्ते

यांच्या

पवित्र आत्मास

ही कृति

अत्यंत भक्तिपूर्वक

अर्पण केली आहे.

# प्रस्तावना.

श्रीमन्महाराजाधिराज महिमहेंद्र यावदार्यकुल-दिवाकर महाराणा श्रीप्रतापसिंह महाराज या राजर्षींच्या सत्कीर्ति-श्रवणानें ज्याचें मन स्वाभिमानानें प्रेरित होऊन प्रमुदित झालें नाहीं असा या भरतखंडांत एकही सुशिक्षित आढळणार नाहीं. त्या राजर्षींच्या समकालीन भाट, चारण वगैरे स्तुतिपाठक शीघ्रकवींनीं त्याच्या सत्कीर्ति वर्णनांचीं कवनें निरनिराळ्या प्रसंगीं इतर रजपूतयोद्ध्यांना ऐकवून त्यांना स्वकर्तव्याविषयीं उत्साहित केलें आहे. तीं कवनें राजस्थानांत अद्यापि प्रसिद्ध आहेत. तसेंच आधुनिक काळांत जे जे इतिहासकार, कादंबरीकार, नाटककार, व कवि होऊन गेले त्यांच्यांतील पुष्कळांनीं सदरहु राजर्षींच्या सत्कीर्तीचें वर्णन करण्यांत धन्यता मानून आपली कुशल लेखणी पवित्र करून घेतली आहे. तरी त्याच्या सत्कीर्तीचें यथातथ्य वर्णन झालें असें वाटून कोणाचेंही समाधान झालेलें नाहीं. त्याच्या आयुष्यांतील प्रत्येक प्रसंग त्याच्याच कारकीर्दीत मेवाडच्या रमणीय व पवित्र भूमीवर प्रत्येक ठिकाणीं अंकित झालेला असून पाहणारास तें प्रत्येक ठिकाण म्हणजे या राजर्षींच्या इतिहासाचीं पृष्ठें निसर्ग देवीनें मोकळीं करून मेवाडदेशभर पसरून

ठेविलीं आहेत कीं काय असा भास होतो. राजस्थानचा इतिहासकार कर्नल टॉड ह्या तिऱ्हाईत इसमानें आपल्या लेखांत ठिकठिकाणीं या राजाविषयीं जे-उद्गार काढले आहेत ते वाचले म्हणजे ह्याची योग्यता केवढी मोठी होती हें चांगलें लक्षांत येतें.

ह्या आर्यावर्तांत जीं कांहीं क्षत्रिय घराणीं अवशेष राहिलेलीं आहेत त्यांत मेवाडच्या सिसोदिया घराण्याइतकें जुनें, पवित्र व सर्व क्षत्रियांना ललामभूत असें दुसरें घराणें क्वचितच असेल. ह्या घराण्याची वंशावळी प्रसिद्ध आहे. सूर्यकुल संभव-इक्ष्वाकु राजापासून श्री राजा रामचंद्र हा अठ्ठावन्नावा राजा होऊन गेला. त्याच्या पासून ८० वा बाप्पारावळ हा इ. सन ७५२ च्या सुमारास होऊन गेला. त्याच्या पासून त्रेचाळिसावा राजा प्रतापसिंह हा होय. अशी त्याच्या वंशाबद्दल माहिती मिळते. सर्व क्षत्रियकुळांत सूर्यवंशाइतका प्रसिद्ध वंश दुसरा नाहीं. श्रीभगवान् प्रभूनें दुष्टजनांच्या संसाराकरितां श्रीराजारामचंद्राच्या रूपानें अवतार घेऊन त्या वंशाची श्रेष्ठता सर्व जगास दाखविली आहेच. त्याच वंशाच्या यशोरूप रवीचा एक लहानसा किरण ह्या आपल्या महाराष्ट्रांत श्री शिवरायाच्या रूपानें प्रकट होऊन त्यानें ह्या महाराष्ट्राचें नांव अन्वर्थ केलें. त्या शिवरायाचें नांव घेतांच आपलीं मनें

किती प्रसन्न होतात हें मनांत आणलें म्हणजे मूळ रवींचा प्रकाश ज्या भूप्रदेशावर पडला असेल तो भूप्रदेश किती धन्य असेल याची कल्पना करतां येईल.

असो, अशा पुण्यश्लोक राजाचें यशोवर्णन करण्यांत प्रत्येक लेखकाला धन्यता वाटणारच व त्याप्रमाणें हिंदी, बंगाली, गुजराथी वगैरे भाषांतून पुष्कळ पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. आरंभीं हें पुस्तक प्रसिद्ध " गुजराथी " पत्राचे विद्वान् संपादक श्रीयुत इच्छाराम सूर्यराम देसाई. या प्रसिद्ध लेखकांनीं गुर्जरभाषेंत प्रसिद्ध करून आपल्या ' गुजराथी ' पत्राच्या वर्गणीदारांस बक्षिस म्हणून दिलें होतें आणि त्याचें हें मराठी रूपांतर त्यांच्याच परवानगीनें केलेलें आहे. मूळ पुस्तकांतील सरसता या रूपांतरांत कितपत उतरली आहे हें ठरविण्याचें काम सहृदय वाचकांचें आहे. माझ्या कृतींत कांहीं गुण आहेत असें वाचकांस वाटल्यास माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें वाटून असाच आणखी प्रयत्न करण्यास उमेद वाटणार आहे.

सदरहु पुस्तकाचें मराठी भाषेंत रूपांतर करून तें प्रसिद्ध करण्याची परवानगी गुर्जर भाषेंतील प्रसिद्ध विद्वान लेखक श्री. इच्छराम सूर्यराम देसाई. संपादक ' गुजराथी ' यांनीं मोठ्या उदारमनानें दिली व छापून प्रसिद्ध करण्याचें महत्वाचें काम श्री. दत्तात्रय गोविंद सडेकर,

संपादक ' लोकमित्र ' या उत्साही गृहस्थांनीं आपल्या अंगावर घेऊन तें पुरें केलें ह्या त्यांच्या उपकृतिबद्दल त्या दोघांचाही मी फार आभारी आहे.

असो. शेवटीं ज्या जगच्चालक प्रभूच्या कृपाप्रसादानें प्रस्तुत कार्य शेवटास गेलें त्या दयाघन जगदीशाचे मी अनन्यभावें आभार मानून अशीच सहृदय वाचकांची सेवा करण्याची परवानगी घेतों.

मालवण | स० दि० वझे.
जानेवारी १९१०

---



# अनुक्रमणिका.

## प्रथम खंड-उद्बोधन.



## द्वितीय खंड-व्रतग्रहण.



## तृतिय खंड-प्रेमदर्शन.

विषय. पृष्ठ.



## चतुर्थ खंड-प्रतिज्ञापालन.



---

# हळदीघांटचें युद्ध

## प्रथम खंड—उद्बोधन.

### प्रथम परिच्छेद.

### चंदावत कृष्ण व प्रताप.

( छप्पय )

" प्रथम अंगबल होय, द्वितीय अभ्यास शस्त्रको ।
तृतीय सदा भोग, और मददहन शत्रुको ॥
पंचम सब छल जान, छठेंका भो मन भूले; ।
सप्त समझकर काम, अष्टमे चित्त न डूले; ॥
नवे निडर चल जाय सित, दशमधाम सभकरममे ।
कवि चंद कहे पृथिराजसों, दशगुन क्षत्रिय धर्ममे ॥ "

चंद.



नामांकित, कीर्तिवान् व यशस्वी होण्याची आकांक्षा सर्वांच्या हृदयांत समानरीतीनें वास्तव्य करीत असते हें खरें; परंतु ती मनकामना सफल करण्याचें कार्य. जगन्नियन्त्या परमेश्वरानें आपल्याच हातांत ठेविलें आहे. आजपर्यंत या भारतवर्षांत अनेक क्षात्रियवंश होऊन गेले; परंतु ते कोणत्याना कोणत्या तरी रीतीनें कमीजास्त प्रमाणानें कलंकित झाले आहेत. जर सर्वथा निष्कलंक असलेला एखादा क्षत्रियवंश असेल तर तो

मेवाडचें सिसोदिया क्षत्रियांचाच आहे व त्यामुळेंच त्यांच्या विश्वव्यापि कीर्तिचा डंका वर्तमानकालींही सर्वत्र कर्णगोचर होत आहे. लिआनिडास सारख्या शूरवीराला जन्म देण्याचा मान ग्रीसच्या भूमीला मिळाला. पण मेवाडच्या वीरजननी भूमीनें लिआनिडास सारख्या अनेक वीरांना जन्म दिला आहे व प्रतापी प्रतापराण्याच्या वेळपासून हळदीघांटाला "थर्मापिली" हें अखंड नांव प्राप्त झालें आहे. अरवली पर्वतांत अशी एकही खिंड नाहीं कीं, ती प्रतापाच्या एखाद्या विजयानें अगर त्याहूनहि अधिक यशप्रद अशा शौर्ययुक्त पराजयानें पवित्र झालेली नाहीं या मेवाडच्या सिंहाच्या शूरवीरतेचें किंचित् दिग्दर्शन करण्याच्या हेतूनेंच आज हा ऐतिहासिक कथाभाग हातीं घेतला आहे व तो आमच्या प्रिय वाचकांना मनोरंजक व ज्ञानप्रद होईल अशी आमची इच्छा आहे.

उदेपूरचा राणा उदयसिंह कैलासवासी झाल्यानंतर त्याचा कनिष्ठ पुत्र जगमल्ल हा सिंहासनारूढ झाला. जेष्ठ पुत्र जिवंत असतां कनिष्ट पुत्र सिंहासनारूढ होणें हें कृत्य धर्मशास्त्र व लोकाचार यांविरुद्धच आहे ही गोष्ट उदयसिंह जाणून नव्हता असें नाहीं. पण त्यानें ही व्यवस्था जाणूनबुजूनच केली होती. याचें कारण असें कीं, सर्व राण्यांपेक्षां जगमल्लच्या मातेवर त्याचें विशेष प्रेम होतें. रजपूत सरदारांना हें धर्मविरुद्ध कार्य रुचलें नाहीं. त्यांनीं उदयसिंहाचा जेष्ट पुत्र जो प्रतापसिंह त्यालाच गादीचा वारस ठरविलें प्रतापसिंह हा झालावाडच्या राजाचा भाचा. जाश्या महा बुद्धिवान्, तेजस्वी व साहसी असल्यामुळें राजपदास सर्वस्वी तोच पात्र होता. आपल्या भावाच्या

हक्काची पायमल्ली न व्हावी म्हणून सर्व रजपूतांना चिथावून त्यांना आपल्या पक्षांत आणण्याच्या प्रयत्नांत झालावाडच्या राजाचें मुख्य अंग होतें झालावाडच्या राजाच्या उत्तेजनानें प्रेरित होऊन एका मुख्य रजपूत सरदारानें हें कार्य करण्याचा विडा उचलला व सर्व कार्यभार आपल्या शिरावर घेतला. हा सरदार चंद्रावत् वंशांतील होता. त्याचें नांव चंद्रावत्कृष्ण, एके दिवशीं प्रताप, चंद्रावत्कृष्ण व त्याचा एक साथीदार यांचें परस्परांत पुढीलप्रमाणें संभाषण झालें: —

" मेवाडकुलदीपक महाराज! आपला ह्या हीनदीन दरिद्री वेषानें कुठें जाण्याचा मनोभाव आहे? " असें विचारित दोन तरुण रजपूत सरदार, कुमार प्रतापसिंहाच्या मार्गांत अवरोध करून उभे राहिले. त्या दोन सरदारांपैकीं एक म्हणाला " महाराज! आमच्या देहांत जीव असेपर्यंत आम्ही सिंहाचा भाग जंबुकाच्या अधिकारांत जाऊं देणार नाहीं आजपर्यंत आम्ही काय काय होत होतें हेंच पहात राहिलों होतों. पण आतां तसें स्वस्थ बसणें योग्य नाहीं. "

प्रताप एखाद्या मुग्ध माणसाप्रमाणें त्या सरदाराच्या मुखाकडे पहात उभा राहिला. इतक्यांत दुसरा तरुण सरदार म्हणाला-" महाराज! आजपासून आम्ही आपणाला महाराज याच नांवानें संबोधणार. महाराज! त्वरा करून चला आणि एकदां मेवाडच्या सिंहासनावर विराजमान होऊन सर्व सामंत, सरदार व प्रजाजन यांनां आनंदित करा. "

मेवाडच्या गादीवर कुमार जगमल्ल विराजमान झाला आहेना? " असा त्यांची प्रार्थना ऐकून उदारचित्त प्रताप-सिंहानं मोठ्या शांत व विनीत भावानें त्यांना उलट प्रश्न केला.

" महाराज! कृपाकरून त्यांच्या नांवाचा उच्चार करूं नका. अखिल मेवाड भूमींतील रहिवासी अत्यानंद पूर्वक आपल्या आगमनाची मार्गप्रतीक्षा करीत बसले आहेत. " असें चंद्रावत कृष्णानें तितक्याच विनीत भावानें उत्तर दिलें.

दुसऱ्या सरदारानें अतिस्नेहपूर्वक प्रतापसिंहाचा उजवा हात धरून तो स्मितहास्यकरून ह्मणाला- " आतां पाहूं आमच्या मार्गांत येऊन कोण आमच्या कार्यांत विघ्न उपस्थित करितो तें? "

आपलें स्वाभाविक गांभिर्य किंचित् शिथील करून प्रतापसिंह या दुसऱ्या सरदाराच्या तोंडाकडे पाहूं लागला. व पूर्ववत् शांत मुद्रेनें ह्मणाला- ' तुमच्या बोलण्याचा भावार्थ अजून माझ्या ध्यानांत आला नाहीं. काय असेल तें स्पष्ट सांगा. "

" योग्य समयीं आपल्याला सर्व कांहीं कळून येईल. या वेळीं मी आपल्याला इतकेंच मात्र सुचवून ठेवितों कीं, मेवाडचें राजछत्र व सिंहासन या उभय वस्तू आपल्या आहेत. जगमल्लाचा अगर दुसऱ्या कोणाचाही त्यांवर हक्क नाहीं. " दुसऱ्या सरदारानें उत्तर दिलें.

प्रतापसिंहानें पहिल्या सरदारास उद्देशून प्रश्न केला-- " तर मग आजवर हें अधर्मपर कार्य निर्विघ्नपणें कसें चालत आलें? व त्याचा तुह्मीं त्याच वेळीं निषेध कां नाहीं केला?"

" धैर्याची मर्यादा कोठवर आहे हेंच आह्मीं पहात

होतों. पण आतां त्याचें काय ? एकदां गोष्ट होऊन गेली. झालें. आपण आतां रजपूत जातीच्या वंशपरंपरागत चालत आलेल्या धर्ममर्यादेचें रक्षण करून धर्मशास्त्रानुसार मेवाडच्या सिंहासनास सुशोभित करा." चंदावतानें आपला भाव प्रदर्शित केला.

" पण मध्येंच कांहीं विघ्न उत्पन्न झालें तर ? कदाचित् राज्यांत अस्वस्थता होण्याचा संभव आहे." प्रतापानें शंका काढली.

" महाराजांस त्याची चिंता नको. धर्म, शास्त्र व लोकाचार याविरूद्ध आचरिलेलें कृत्य कोणत्याही काळीं यशस्वी होत नसतें. समजा, कदाचित् काळाच्या वक्र गतीमुळें असेंही घडून आलें. तरी त्याचा प्रतिकार करण्याचा सर्व भार मी माझ्या शिरावर घेतों. मग तर झालें ना ? माझ्या हाताखालील सर्व सरदार व रजपूत सैन्य आपल्या प्रतिपक्षाचा प्रतिकार करण्यास समर्थ आहे. व्यर्थ शंका काढित. बसण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं–" असें चंदावतानें आश्वासन दिलें.

" ठीक ! तर मग माझी आपल्या विचारास अनुमती आहे." असें प्रतापानें मोठ्या आनंदानें त्यांच्या म्हणण्यास अनुमोदन दिलें हें अनुमोदन मिळतांच प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागून चंदावत व त्याचा साथीदार आपल्या कार्यसिद्धिसाठीं तत्पर झाले. रजपूतांच्या या दुर्दैवघटनात्मक कथेला आज जवळ जवळ साडेतीनशें वर्षे होऊन गेलीं आहेत हें इतिहासप्रिय वाचकांच्या ध्यानींत आलें असेलच. त्यासंबंधानें येथें विशेष विवेचन करण्याची जरूरी नाहीं.

---

## द्वितीय परिच्छेद.

# सिंहासनीं प्रताप.

अकरुणत्वमकारण विग्रहः परधने परयोषितिच स्पृहा ।
सुजनबंधुजनेष्वसहिष्णुता प्रकृतिसिद्धमिदं हि दुरात्मनाम्
भर्तृहरिः



एकेदिवशीं राज्यलक्ष्मीनें मदोन्मत्त झालेला जगमल्ल आपले सरदार व सहचर यांसहवर्तमान महदानंदानें सिंहासन सुखोपभोगांत निमग्न होता; इतक्यांत, उदारचित्त चंदावत कृष्ण प्रतासिंहास आपल्याबरोबर घेऊन त्याठिकाणीं येऊन दाखल झाला. त्यामुळें जगमल्लाच्या आनंदांत अचानक विघ्न येऊन पडलें. चंद्रावत् कृष्णाची ती धीर गंभीर व निश्चयी मुद्रा पाहून जगमल्ल घाबरून गेला. तेजस्वि वीर चंदावत् हळुहळु सिंहासनापाशीं गेला आणि अति गंभीर वाणीनें जगमल्लाला म्हणाला—" कुमार! अजून आपण केवढ्या भ्रमांत अहां? " हें वाक्य ऐकतांच जगमल्ल शुद्धिवर आला-त्याच्या मनोराज्याचा लय झाला परंतु बाहेरून त्यानें पूर्वीचाच आविर्भाव दाखविला. तो कृत्रिम साहसानें बोलूं लागला-" काय? मी सिंहासनारूढ होऊन राज्यपद धारण केलें असूनही अजून आपण मला ' कुमार ' याचनांवानें संबोधितां याचें कारण काय? " गंभीरतेनें सरदार चंदावतानें प्रत्युत्तर दिलें " कुमार! आपण आपणाला सिंहासनारूढ झालेले मानतां हाच

आपला भ्रम आहे. कारण कीं हें सिंहासन आपलें नव्हे. सिंहासनाचे खरे मालक प्रतापसिंह महाराज आहेत एतदर्थ कृपा करून आपण सिंहासनावरून उतरून महाराणा प्रतापसिंह यांना तें स्थान द्यावें अशी माझी आपणाला नम्र व विनीत प्रार्थना आहे!"

'जगमल्ल जर समजंस असता तर तो तत्काळ सिंहासनावरून खालीं उतरता. त्याचें मंत्रिमंडळही जर शहाणें असतें तर तेंही त्याला तसेंच करण्याचा सल्ला देतें. परंतु जगमल्लाच्या आणि त्याचप्रमाणें त्याच्या मंत्रिमंडळाच्याही अंगीं अशी बुद्धि वसत नव्हती असेंच ह्मणावें लागतें. कारण कीं, त्यांना चंदावत् कृष्णाच्या स्वभावाची खरी परिक्षा झालेली नव्हती. ज्यावेळीं प्रतापशाली प्रतापसिंहास बरोबर घेऊन तो दरबारांत आला त्यावेळीं यांत कांहींतरी गूढ असलें पाहिजे, अशी कल्पना त्यांना शिवली नाहीं.

कार्यकुशल चंदावतानें अधिक कांहीं न बोलतां जगमल्लाचे दोन्ही हात धरून त्याला सिंहासनावरून खालीं ओढिलें व विनयपूर्वक प्रतापसिंहाचा उजवा हात आपल्या हातांत धरून त्या रिक्त सिंहासनावर त्याला विराजमान केलें. त्यावेळीं जगमल्ल व त्याचें मंत्रिमंडळ स्तंभवत् तटस्थ झालें होतें

प्रतापसिंहाला सिंहासनावर बसवून त्या वीरानें आपल्या हातांनीं राजमुकुट त्याच्या मस्तकावर घातला. व त्याच्या कटिभागीं एक तलवार बांधून गुडघे टेंकून भूमिला मस्तक लावून त्रिवार अभिवंदन केलें व तो प्रतापाला उद्देशून ह्मणाला-" मेवाडाधिपतीचा जयजयकार

असो! महाराणा प्रतापसिंहजीचा विजय असो !! क्षत्रिय कुलावतंसाचा जय असो !!! " लागलाच सर्वत्र प्रतिघोष झाला. सभागृहाच्या बाहेरील बाजूस त्यांचें सैन्य सज्ज होऊन राहिलें होतें; त्यानेंही त्याचा जयजयकार करून पृथ्वी कंपायमान करून सोडिली.

हें सर्व कार्य झाल्यानंतर जो तो आपआपलें कर्तव्य बजावूं लागला. ज्या छत्रचामरधारी दूतांनीं पूर्वीं जगमल्लच्या शिरावर छत्रचामरें धरलीं होतीं तींच छत्रचामरें ते आतां प्रतापसिंहावर ढाळूं लागले. जे भाट व बंदिजन जगमल्लचे गुणानुवाद गात असत तेच आतां प्रतापसिंहाच्या प्रतापाचें वर्णन करूं लागले. अशारीतानें सर्व लोक आपआपल्या कार्यांत मन्त्रप्रभावाप्रमाणें झटपट प्रवृत्त होऊन गेले. इतरांनीं असें केलें यांत कांहींच नवल नाहीं. पण जगमल्लही आपण स्वतः प्रतापाच्या नांवाचा जयघोष करूं लागला ही खरोखर आश्चर्यकारकच घटना होय!

भयंकर तुफाना नंतर समुद्र ज्याप्रमाणें स्थीर व शांत होत असतो त्याप्रमाणें आपला हेतू पारिपूर्ण होतांच चंदावत् कृष्ण मौन धारण करून कांहींवेळ उभा होता. नंतर तो मोठ्या नम्रतेनें जगमल्लाला ह्मणाला कुमार! दासाच्या या अपराधाबद्दल क्षमा असावी. आह्मीं धर्मशास्त्र व लोकाचार यांचा पूर्ण विचार करून स्वर्गस्थ महाराणा उदयसिंह महाराजांचें सिंहासन त्यांच्या जेष्ठ पुत्राला अर्पण केलें आहे. प्रतापसिंह महाराजच या सिंहासनावर विराजमान होण्यास योग्य आहेत. "

या नंतर प्रतापसिंहास उद्देशून चंदावत् मोठ्या गंभीर स्वरानें म्हणाला—" क्षत्रिय कुलतिलक महाराज!

आपल्याच हातून चितोडच्या उद्धाराचें कार्य शेवटास जाईल. जी तलवार मी आज या माझ्या हातांनीं आपल्या कटिभागीं बांधिली आहे. ती तलवार चितोडच्या अधिष्ठात्री देवीच्या हातची आहे. दुष्ट यवनांनीं चितोड काबीज करून देवीचें मंदिर भ्रष्ट केलें व तिची मूर्ति छिन्नविछिन्न करून टाकिली. वीर रजपूत जाति विद्यमान असतां नीच यवनांनीं जो प्रलय मांडला आहे त्याबद्दल त्यांना योग्य प्रायश्चित्त देण्याचें कार्य आपल्या हातूनच शेवटास जाईल. आई भवानी! हाय हाय! काय तुझी ही हीनदीन स्थिती!!"

हें भाषण चाललें असतां त्याचा कंठ भरून आला. त्याच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह वाहूं लागला. सर्व सभाजनांच्या मुखमंडळावर कोपाग्नीचें प्रखर तेज झळकूं लागलें. महाराणा प्रतापसिंहाच्या आरक्त नयनांतून जणूं काय अग्निकिरणांचाच वर्षाव होत आहे कीं काय असा भास होऊं लागला. त्याचें सर्व शरीर क्रोधानें कंपायमान होऊं लागलें व आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून त्यानें चंद्रावताकडे एक तीव्र दृष्टिपात केला.

चंद्रावत कृष्णानें पुनः आपलें भाषण सुरु केलें— "महाराज! तीच भवानीमातेची तरवार मीं आज स्वहस्तांनीं आपल्या कमरेंत बांधिली आहे व असें करण्याचें कारण हेंच आहे कीं, महाराजच फक्त या तरवारीचा योग्य मान राखतील अशी माझी पूर्ण खात्री आहे. आजपर्यंत ही तरवार अनेकांच्या हातीं पडली असून त्या सर्वांनीं चितोडच्या उद्धाराची प्रतिज्ञा करून ती यथाशक्ति पूर्ण केली. पण रजपूतांचें तें सौभाग्य चिरकाल

टिकलें नाहीं. दुर्दैवप्राबल्यामुळें स्वर्गतुल्य चितोड पुन्हां यवनांच्याच ताब्यांत गेलें! पण तें कसें? हें माझ्यानें आपणास सांगवत नाहीं. माझें मन, मला मात्र एवढीच साक्ष देत आहे कीं, महाराणे प्रतापसिंहच रजपूतजातीचें नांव राखतील. एतदर्थ महाराज! आपणहीं तें वीरव्रत धारण करून; दुष्ट यवनाच्या हातांतून राजस्थान मुक्त करून चितोड नगरीच्या वैधव्याचा नाश करा व अखिल मेवाडचे एक छत्री अधिपति व्हा!"

हें भाषण ऐकून गंभीरमुद्रा धारण करून स्थिर प्रतिज्ञ महाराणा प्रतापसिंह गंभीर आवाजांत ह्मणाला "सर्व सरदार लोकहो! आपण सर्वांनीं आपल्या माननीय चंद्रावतजांचें सर्व भाषण ऐकिलेंच आहे. आईभवानीच्या कृपेनें जर आह्मीं जिवंत राहिलों तर ही प्रतिज्ञा पूर्ण करूंच! या प्रसंगीं यापेक्षां अधिक बोलून दाखविण्याची आवश्यकता मला दिसत नाहीं."

## तृतीय परिच्छेद.

# कार्यं साधयामि देहं वा पातयामि!

"सूच्यग्रं नैव दास्यामि विना युद्धेन केशव"

महाभारत.

यक्षवैभवापेक्षांही विशेष वैभव व शौर्य प्रदर्शक असें विजयादशमीपर्व आज राजपुतान्यांत सर्वत्र प्रवर्तायमान होऊन गेलें होतें. समस्त राजस्थान आज आनंदसागरांत निमग्न झालेलें

दिसे. सहस्त्रावधि क्षत्रियवीर आज एक स्थलीं एकत्र झाले होते. अंगांत वीरवस्त्रें, हातांत वीरशस्त्रें, स्कंधभागीं धनुष्य, शिरोभागीं उज्ज्वल किरीट व भालीं रक्तचंदन तिलक धारण करून "हरहरमहादेव" अशा वीरोत्तेजक शब्दांनीं घनगर्जना करीत, वीर्यशाली अश्वांच्या पृष्ठभागीं आरूढ होऊन, सहस्त्रावधि रजपूतवीर आपल्या शौर्यानें पृथ्वीला कंपायमान करीत एकत्र जमत होते. विजयादशमी ह्मणजे क्षत्रियांच्या भाग्यपरिक्षेचा दिवस. संवत्सरांतील वीरव्रताचें शुभाशुभ जाणण्याचा हाच सुदीन असें रजपूतलोक मानतात. महापराक्रमानें वराह व्याघ्रादिकांची शिकार करून ती शिकार आपल्या इष्टदेवतेस अर्पण करण्यासाठीं व भविष्यकालीन शुभाशुभ समजून घेण्यासाठीं रजपूत वीर आज फार उत्सुक झाले होते.

महाराणा प्रतापसिंह राजकुटुंबांतील सर्व वीरांसह येऊन उत्सवांत सामील झाला. सर्वांचीं मुखकमलें आनंदानें प्रफुल्लित झालीं महाराणा प्रताप सर्व वीरांच्या मध्यभागीं उभा राहून बोलूं लागला:—

"क्षत्रिय वीरहो! आजच्या शिकारीवर-मेवाडची भाग्योदय-परिक्षा अवलंबून आहे हें तुमच्या चांगलें ध्यानांत असूं द्या. आजचा महोत्सव सर्व रजपूतांच्या वीरव्रत परिक्षेचा दिवस मानतात. वीरव्रतउद्यापनेंसाठीं प्राणार्पणही करणें हा रजपूतांचा धर्म आहे. फक्त देवीला असंख्य बलिदानें करित बसल्यानें आपली कार्यसिद्धी कोणत्याही काळीं होणें शक्य नाहीं. मोठ्या आनंदानें भवानी-मातेला असंख्य बलिदानें द्या. पण त्यावेळीं हेंहीं पक्के ध्यानांत असूं द्या कीं एवढ्यानेंच कांहीं व्रतोद्यापना

झाली असें नाहीं. रजपूत जातीचे शत्रु, रजपूतांच्या स्वातंत्र्याचे शत्रु, व अखिल मेवाडचे शत्रु जे दुष्ट यवन, त्यांच्या तडाक्यांतून मातृभूमीचा उद्धार करण्यासाठीं कायावाचामनें करून देवीची प्रार्थना करणें हाच या महोत्सवाचा मुख्य उद्देश आहे. आज किती दिवस दुष्ट पठाण व मोंगल लोक आपल्या या मेवाडची कशी दुर्दशा करित आहेत याचा विचार करा. अल्लाउद्दीनापासून अकबरापर्यंत मोंगल लोकांनीं मेवाडची कशी शोचनीय स्थिती करून सोडली आहे याचें चांगलें स्मरण करा. सुवर्णतुल्य मेवाडच्या चरणकमलांत पारतंत्र्यरूपी लोहशृंखला पडली आहे- सर्व राजस्थांन शत्रूंनीं पादाक्रांत करून टाकिलें आहे. क्षत्रियकुलभूषण सती पद्मीनीला यवनांच्या अत्याचारभयामुळेंच आपल्या पवित्र देहाची अग्निदेवाला आहुति द्यावी लागली. अशा एक दोन, नव्हे तर शेंकडों रजपूत स्त्रियांनीं यवनांच्या अत्याचारभयामुळें आपल्या प्राणांचीही पर्वा केली नाहीं. बापारावळाच्या पवित्र वंशांतील पराक्रमी भिमसिंहापासून तों संग्रामसिंहापर्यंत अनेक वीरांनीं स्वदेशोद्धारार्थ आपल्या प्रियमत प्राणाचें बलिदान केलें. तरी सुद्धां अद्यापि परमेश्वराच्या मनांत दया आली नाहीं ! अर्थात् आपली ही दुर्दशा परमेश्वरी क्षोभाचाच परिणाम आहे. असेंच ह्मणाव लागतें.

एक क्षणभर सर्व वीर पाषाणप्रतिमेप्रमाणें स्तंभित व तटस्थ होऊन गेले. थोड्या वेळानें प्रतापसिंह पुन्हां गंभीरस्वरानें बोलूं लागला.—

" शूर क्षत्रिय वीर हो! ह्मणूनच आपण सर्वांनीं जीवनप्रतिज्ञा केली पाहिजे. ईश्वराची आपल्यावर पुन्हां कृपा व्हावी एतदर्थ आपण घोर पराक्रम केले पाहिजेत. असें केल्याविना आपल्या उद्दिष्ठ हेतूची उद्यापना केव्हांही होणार नाहीं. भवानीमातेला संतुष्ट करणें हें आपलें आद्यकर्तव्य आहे. सर्वसिद्धिदायिनी माताभवानी संतुष्ट झाली कीं, आपले सर्व मनोरथ पूर्ण झालेच असें समजा. तुह्मीं सर्व शूरवीरांनीं असें पक्कें ध्यानांत राखिलें पाहिजे कीं, स्वातंत्र्याच्या महामंत्राविना आपली व्रतोद्यापना कोणत्याही काळीं होणें नाहीं. चला तर आज आपण मोठ्या उत्साहानें वनवराहाची शिकार करून ती देवीभवानीला अर्पण करूं व तिची यथाशास्त्र पूजा करूं, आणि मग आपल्या उद्योगास प्रवृत्त होऊं. सर्व वीर हो! बोला तर–"
" कार्यं साधयामि वा देहं पातयामि "

तेथें जमलेल्या असंख्य रजपूत वीरांनीं " कार्यं साधयामि वा देहं पातयामि " अशी गगनभेदक गर्जना केली. या गर्जनेचा जिकडून तिकडून ' देहं पातयामि ' असा प्रतिध्वनि ऐकूं येऊं लागला व सर्वत्र " कार्यं साधयामि वा देहं पातयामि " हाच ध्वनी दुमदुमून गेला.

यशापयश परमेश्वराधीन आहे. आह्मां माणसांच्या हातीं त्याचें काय? निर्मल अंतःकरणानें व भक्तिभावानें कार्यारंभ केला कीं, परमेश्वर खात्रीनें यश देतोच. जन्म अनंत आहेत. तद्वत काळही अनंत आहे. कदाचित् एका-जन्मीं कार्यसिद्धी झाली नाहीं; तर दुसऱ्या जन्मीं होईल अर्थात् उद्योगाचा कोणत्याहीकाळीं त्याग करूं नये.

## चतुर्थ परिच्छेद.

# बन्धु विग्रह.

"कालों के सरपे बार हय गोरों के बूटका;
फल पा रहा हय मुल्क ये आपसकी फूटका।"



गनचुंबित वृक्षसमूहयुक्त निबीड अरण्यांत प्रवेश करून रजपूत वीरांनीं वराहाची शिकार केली, व ती यथाविधि जगदंबेला अर्पण करून विजयादशमीचा महोत्सव साजरा केला. महाराणा प्रतापसिंहानें स्वदेशस्वातंत्र्यप्राप्तिसाठीं दृढप्रतिज्ञा केली व ती प्रतिज्ञा खरोखर सिद्धिस जाईल अशी सर्वांची मनोदेवता साक्ष देऊं लागली. परंतु "प्रथम ग्रासे मक्षिकापातः" या न्यायानें प्रतिज्ञेच्या प्रारंभींच अशी एक अशुभ घटना घडून आली कीं, तिच्या योगानें सर्वांच्या मनांत निराशेचा भास होऊं लागला. ही घटना अतिशय भयंकर व वास्तविक पहातां महा कष्टदायिनी होती. एतदर्थ तिचें येथें विस्तारपूर्वक विवेचन करणें फार अगत्याचें आहे.

ज्यावेळीं शिकार करण्यासाठीं रजपूत वीरांनीं अरण्यांत प्रवेश केला त्यावेळीं महाराणा प्रतापसिंह व त्याचा कनिष्ट बंधु शक्तिसिंह यांच्यामध्यें एक विचित्र वाद उपस्थित झाला. इतर सारे वीर आपआपसांतील उच्चनीच

भाव विसरून जाऊन शिकार करण्यांत अगदीं गुंग होऊन गेले होते. प्रतापसिंह व शक्तिसिंह हे दोघेहीं एकत्र शिकार करित होते; इतक्यांत जवळच एक रानडुकर त्यांच्या दृष्टिस पडला. शिकार करणाऱ्यांची दृष्टि आपल्यावर गेली आहे असें पहातांच भयभीत होऊन तो डुकर पलायन करूं लागला. परंतु त्या दुर्दैवी प्राण्याचे दिवस भरून चुकले होते. तेव्हां तो तरी त्यांच्या तडाक्यांतून सुटावा कसा? उभय बंधुनीं एकसमयावच्छेदेंकरून आपआपल्या तीक्ष्णबाणांचा अचुक नेम धरून त्या डुकरावर आपले बाण सोडले. त्यांतील फक्त एकच बाण डुकराच्या मस्तकांत शिरला व त्यामुळें तो तत्काळ तडफडत जमिनीवर पडला. इतकेंच नव्हे तर त्या भयंकर शराघातानें व्याकुळ होऊन तो क्षणार्धांत मृत्युवश झाला.

ते दोघेहि बंधु आपआपल्या अनुचरांसह त्या मृत वराहापाशीं येऊन दाखल झाले व त्याठिकाणीं विवादाचें बीज रुजलें. शक्तिसिंहाचा एक आवडता अनुचर मोठ्या आनंदानें ह्मणाला– " अहाहा! आमच्या कुमारश्रींची धनुर्विद्येंत ही केवढीं प्रविणता! पहा तर खरें. त्यांनीं एकाच शराघातानें एवढ्या मोठ्या प्रचंड प्राण्याचा क्षणांत संहार केला! याचेंच नांव धनुर्विद्या!! "

प्रतापसिंहानें त्या अनुचराच्या मुखाकडे किंचित् कोपयुक्त मुद्रेनें अवलोकन केलें. महाशयाची आपल्यावर कोपदृष्टि झालेली पहातांच तो अनुचर भयानें गर्भगळीत

होऊन गेला व पुन्हां वरडोकें करून प्रतापसिंहाकडे पहाण्याचें त्याच्यांत अवसान राहिले नाहीं. तो तटस्थ भावानें भूमिकडे पाहूं लागला.

आपल्याच बाणानें तो डुक्कर गतप्राण झाला असा प्रतापाचा दृढ समज होता हें वाचकांनीं ताडलेंच असेल. आपल्या अनुचराच्या भाषणानें प्रतापाच्या मनांत उत्पन्न झालेला क्रोधावेश शक्तिसिंहानें तत्काळ जाणला.

आपल्या अनुचराचें ह्मणणें यथार्थ आहे हें दाखविण्याच्या हेतूनें शक्तिसिंह अत्यानंदपूर्वक आपल्या अनुचरास ह्मणाला-" आतां याविषयीं अधिक वादविवाद करण्याची काय आवश्यकता आहे? जर माझ्या धनुर्विद्येची परिक्षाच करणें असेल तर त्या पलिकडल्या वृक्षाच्या असंख्य पर्णांपैकीं तिसरें पर्ण मी माझ्या बाणसामर्थ्यानें एका क्षणांत खालीं पाडतों " असें ह्मणून धनुर्विद्याविशारद शक्तिसिंहानें आपल्या बाणप्रहारानें तें पर्ण तोडून खालीं पाडिलें. तेव्हां त्यांचे अनुचर त्याचे धन्यवाद गाऊं लागले. त्या डुकरानें आपल्याच बाणानें स्वर्गी प्रयाण केलें अशी प्रतापसिंहाप्रमाणें शक्तिसिंहाचीही दृढ समजूत होती.

प्रतापाचा कोपाग्नि अधिकच भडकला आपल्याच बाणानें तो डुक्कर मृत झाला असें दोघांसही वाटत होतें. दोघांनेही बाण सारखेच होते. त्यांत यत्किंचितही फरक नव्हता तेव्हां डुकराला लागलेला बाण कोणाचा हें

ओळखण्यास कोणतेंच साधन नव्हतें. प्रतापाच्या हृदयांत एकसमयावच्छेदेंकरून क्रोध व अभिमान यांची जागृति झाली व कोपानलानें तो अगदीं दग्ध होऊं लागला.

अभिमानी प्रतापसिंह मोठ्या गंभीरतेनें शक्तिसिंहास संबोधून ह्मणाला—" अशारीतीनें तूं वृथाभिमान प्रकट करित आहेस. वृथाभिमान धरणें हें नीचाचें काम. सिसोदिया कुळांत जन्मलेल्या पवित्र पुरुषाला अहंता शोभत नाहीं ! "

या भाषणानें आश्चर्यपावून शक्तिसिंह आपल्या वडील बंधूस ह्मणाला—" दादा ! आपल्या तोंडून अशीं अप्रयोजक वाक्यें निघतील अशी मला स्वप्नींही कल्पना नव्हती. हा डुक्कर आपल्या बाणानें मेला व मी वृथाभिमान बाळगतों असेंच कीं नाहीं आपलें ह्मणणें ? "

" होय " असें प्रतापानें मोठ्या गंभीरतेनें उत्तर दिलें.

" छे-नाहीं-" असें ह्मणून शक्तिसिंहानें म्यानांतून आपली तरवार काढून जवळच असलेल्या एका प्रचंड पाषाणावर त्यानें एक प्रहार केला. तत्काळ त्या पाषाणाचे छिन्नभिन्न तुकडे झाले.

प्रतापसिंहाचे नेत्र लाल झाले व तो धमकी देण्याच्या उद्देशानें ह्मणाला-" शक्तिसिंह ! माझ्यासमक्ष अशी उच्छृंखलता ? अजून तरी आत्मसंयमन कर. नाहीं तर या माझ्या तरवारीशीं गांठ आहे. "

शक्तिसिंह तितक्याच जोरानें प्रतापास ह्मणाला—

"मातापित्याच्या आशिर्वादानें मला आत्मसंयमनाची दीक्षा मिळालीच आहे. परंतु नीच मनुष्याप्रमाणें अशारीतीनें सत्यापलाप करून असत्याचा पक्षपात करण्याची मला कोणी दीक्षा दिलेली नाहीं यालामात्र माझा नाईलाज आहे."

प्रतापसिंह पुन्हां निषेध करून ह्मणाला—"तूं हें अपमानदर्शक भाषण कोणासमोर करित आहेस याची तुला शुद्धि आहे? पुन्हां सांगतों कीं, अजून तरी विचार करून शुद्धवर ये"

बोलतां बोलतां दोघांचाही कोप अनिवार होऊन गेला. दोघांच्याही मनांत अभिमानरुपी वायुनें वेगपूर्वक संचार केला व त्याचा परिणामही अनिष्टच झाला. आपला सहोदर-संबंध विसरून व अधिकार मर्यादेचें उल्लंघन करून सर्वांसमक्ष शक्तिसिंह आपल्या जेष्ट बंधूस ह्मणाला—"अधिकार व लक्ष्मी यांची प्राप्ति झाली ह्मणजे स्वाभाविकपणेंच मनुष्याच्या मनांत एकप्रकारचा अनिवार्य अभिमान उत्पन्न होत असतो. व त्या अभिमानमदांत तो इतकीं अनन्वित कृत्यें करितो कीं, मग त्यामुळें ईश्वरासही त्याचा कंटाळा येतो. हें एक त्याचेंच प्रत्यक्ष उदाहरण आहे. हा अभिमान कोणी ल्हानसहान मनुष्यानें दाखविला नाहीं. तर तो प्रबलप्रतापान्वित प्रतापसिंह महाराज ह्मणजे मेवाडचे नूतन महाराणे यानीं दाखविला आहे ही गोष्ट खरोखर विचार करण्यासारखी आहे!."

हें भाषण विषयुक्त शल्याप्रमाणें प्रतापाच्या हृदयांत सलूं लागलें. आरक्तनेत्रांनीं प्रतापसिंहानें शक्तिसिंहाकडे दृष्टि लावली व महाक्रोधानें तो ह्मणाला—" बस! पुरे कर. आतां अमर्यादेची परमावधि झाली. आतां माझ्या अंगीं धीर धरण्याची शक्ति राहिली नाहीं, शक्तिसिंह! तूं आतां मरण्यास तयार हो आज भ्रातृशोणितानें मी—" अभिमानानें व कोपानें त्याचा कंठ भरून आला. त्याच्यानें पुढें बोलवेना.

या भाषणानें शक्तिसिंहही बराच चिडला. व स्थान-काल-मर्यादा वगैरेचा कांहींही विचार न करितां तो अति साहसपूर्वक ह्मणाला—" एका क्षत्रियानें आपल्याच सारख्या दुसऱ्या एका क्षत्रियास मृत्युचें भय घालणें ही एकप्रकारची हास्यप्रद गोष्ट समजली पाहिजे. माझ्या मनाचा व पराक्रमाचा परिचय आपल्याला आहेच. माझ्या बाल्यकाळांतील त्या प्रसंगाची आपल्याला आठवण नाहीं वाटतें? महाराज! ज्यावेळीं आपण दोघेही बालक होतों व एके दिवशीं ज्यावेळीं पित्यासमक्ष आमच्या शस्त्रविद्येची परिक्षा चालली होती त्यावेळीं हास्यविनोदांत मी माझ्या हाताचें बोट तरवारीनें केवढ्या सफाईनें छाटून टाकिलें होतें तें आपल्या ध्यानांत असेलच. जो पुरुष बाळपणापासूनच शूरवीर तो तरुणपणीं सत्य मर्यादेचें रक्षण करण्यासाठीं रणांत झुंजत असतां प्राणाची पर्वा करील असा विचार तरी आपल्या मनांत कसा आला? मी मरणास तयार आहे. मी मृत्यूची यत्किंचितही किंमत मानीत नाहीं."

हा प्रकार पाहून सर्व सरदार घाबरून जाऊन तटस्थ-वृत्ति धारण करून उभे होते. प्रतापाच्या रक्तवर्ण नेत्रांतून अग्निकिरणांचा वर्षाव होत आहे कीं काय असा भास होऊं लागला. तो फार संतापला व मोठी गर्जना करून म्हणाला " चल! तयार हो. व्यर्थ बडबड करण्याची काय जरूर आहे? महाराणा प्रतापसिंह व्यर्थ बडबड करण्यापेक्षां कृति करून दाखविण्यांतच अधिक पुरुषार्थ मानतो. समजलास ? "

" शक्तिसिंहाचीही कृति करून दाखविण्याचीच इच्छा आहे. आज या पृथ्वीतलावर प्रतापसिंहाचें अगर शक्तिसिंहाचें अस्तित्व अधिक वेळ विधात्याला मान्य आहेसें दिसत नाहीं. आज दोघांपैकीं एकाला तरी या नश्वर विश्वाचा त्याग केला पाहिजे. हें बहुतेक निश्चित आहे. " असें लेशमात्रही न डगमगतां शक्तिसिंहानें उत्तर दिलें.

निमिषार्धांत त्या दोघांही बन्धूंनीं म्यानांतून आपापल्या तलवारी बाहेर काढिल्या व एकमेकांच्या प्राण संहारार्थ ते एकमेकांवर हल्ला करूं लागले. त्या वेळीं उभय बन्धूंच्या भयंकर मुखमुद्रेचें अवलोकन करून सर्व सरदार दिग्मूढ बनून गेले. सर्वजण मनांतल्या मनांत आपापल्या इष्टदेवतेचें ध्यानपूर्वक स्मरण करूं लागले. काय करावें हें कोणालाही सुचेना. इतक्यांत जवळच उभा असलेल्या एका परहितार्थी वीरपुरुष्यानें परिणामाचा

विचार करून आपल्या जीवाची बिलकुल पर्वा न करितां निमिषमात्रांत त्या ठिकाणीं आगमन केलें

त्याची अत्यंत गंभीर व निश्चयी मुद्रा पाहून सर्वांनीं त्याला मार्गमोकळा करून दिला. त्यानंतर तो पुरुषसिंह ज्या ठिकाणीं ते दोघे बंधू हातांत तरवारी घेऊन परस्परांचे प्राण हरण करण्यास सज्ज होऊन उभे होते त्या ठिकाणीं येऊन त्या उभय बन्धूच्या अगदीं मध्यभागीं उभा राहिला व उभयतांसही उद्देशून ह्मणाला—" विचार करा ! थोडा तरी धीर धरा ! असा अविचार करूं नका ! तुह्मांला त्या जगदीशाची शपथ आहे." परंतु ते दोघेही बन्धु त्यावेळीं अगदीं मदोन्मत्त व हिताहित ज्ञानशून्य होऊन गेले असल्यामुळें त्यानीं त्या महापुरुषाच्या प्रार्थनेकडे यत्किंचितही लक्ष दिलें नाहीं इतकेंच नव्हे तर अधिक हट्टास पेटून ते आपला कृतसंकल्प पूर्ण करण्याची विशेष तत्परता दाखवूं लागले.

परस्परांचे प्राण हरण करण्यासाठीं जसा बन्धुद्वयाचा निश्चय झाला होता. तसाच त्यामध्यें पडणाऱ्या हितार्थी पुरुषानें त्यांच्या प्राणरक्षणाविषयीं, राजकुलाचें हित साधण्यासाठीं व मातृभूमि मेवाडच्या कल्याणासाठीं अपूर्व निश्चय केला होता. आपला हा निश्चय सफल करण्यासाठीं त्यानें एक अपूर्व उपाय शोधून काढला होता. हातांत एक तीक्ष्ण नग्न तरवार धारण करून तो पुरुष त्या उभयही बधूंस गंभीर व गौरवयुक्त वाणीनें ह्मणाला--

"तुह्मांपैकीं एकही या दीन विप्राची नम्र प्रार्थना ऐकत नाहीं ना? तुमच्या या अविचारी कृत्यामुळें तुमच्या मातृभूमीस भविष्यकाळीं केवढीं मोठीं संकटें भोगावीं लागतील याचा तुह्मीं थोडातरी विचार केला आहे काय? माझा असा अभिप्राय आहे कीं, वृथाभिमानांत गुरफटून जाऊन तुह्मीं हें दुष्कृत्य करण्यास उद्युक्त झालां यांत लेशमात्रही संदेह नाहीं. या उप्पर आपली मर्जी! तुह्मांस उपदेश करून मी माझें कर्तव्य बजावलें आहे. मी राजपुरोहित असून राजाच्या हितासाठीं प्राणार्पण करणें हें आमच्या वाडवडिलांपासून चालत आलेलें आमचें कर्तव्य आहे. महाराज! आतां माझ्या सांगण्याप्रमाणें वर्तन करणें अगर न करणें हें सर्वस्वीं आपल्या इच्छेच्या आधीन आहे!"

हा उपदेश ऐकून प्रताप कांहींसा नम्रतापूर्वक ह्मणाला—"पुरोहितजी! क्षमा करा. विचार करण्यास व उपदेश ऐकण्यास आतां समय राहिला नाहीं क्षणभर धीर धरा. माझें हें कार्य समाप्त होतांच मी आपले चरण वंदन करीन. या मिथ्याभिमानी व घमेंडखोर—" असें ह्मणून आपली तरवार परजीत परजीत तो शक्तिसिंहाच्या छातीस जाऊन भिडला.

"ठीक! मी मिथ्यावादी व घमेंड खोर! पण आपण मिथ्याभिमानी व मदोन्मत्त खरे ना?" असें ह्मणून शक्तिसिंहही युद्धास तयार झाला. दोघही बन्धु शस्त्रविद्येंत

महा निपूण असल्यामुळें जय अगर पराजयरूपी परिणाम जाणण्यास थोडाच अवकाश राहिला. दोघांपैकीं एक अगर दोघेही परस्परांच्या शस्त्राघातानें मृत अगर घायाळ झाल्याविना रहात नाहींत अशीसर्वांची खात्री होऊन चुकली.

राजापुरोहित शक्तिसिंहास विनंती करून सांगूं लागला - " कुमार ! माझी प्रार्थना तुह्मीं तरी मान्य करा व कृपा करून शांत व्हा. "

तलवार परजीत परजीत व खदखदां हंसत शक्तिसिंह ह्मणाला- " महाराज ! तुह्मीं दूर व्हा. मी कांहींही ऐकणार नाहीं. मी माझा अपमान करणाऱ्या माझ्या वडिल बंधूच्या प्राणाचा संहार करीन त्याचवेळीं माझ्या हृदयांत शांति होईल. अन्यथा शांति होणें नाहीं. "

भावांभावांच्या घोरतर युद्धास प्रारंभ होऊन चुकला.

महापुरुष राजपुरोहित त्या उभयही बंधूच्या मध्यभागीं जाऊन उभा राहिला. पण व्यर्थ. दोघांपैकीं एकही माघार घेईना. तव्हां तो मोठ्यानें ओरडून ह्मणाला- " राज वीरांनों तुह्मीं ऐकत नाहीं ना ? जशी आपली मर्जी ! आतां मी माझ्या कर्तव्याचा अंतिमभाग पूर्ण करितों. हे आकाशस्थ देवतांनों ! आतां तुह्मीं या राजबंधुद्वयाचें रक्षण करा ! राजवंशाचें कल्याण करा. व सिसोदिया वंशाच राजछत्र अखंड राखा ! ! हे जर जिवंत राहिले तर आज ना उद्यां तरी मोगलांच्या तडाख्यांतून देशाची मुक्तता करतील. देशांत पुन्हां स्वतंत्रतेची स्थापना करून

सर्व रजपुतांचें नांव अजरामर करतील. पण या भ्रातृद्रोहाचा परिणाम मात्र विपरीतच होणार हें तर नक्की ठरल्याप्रमाणें आहे आतां जर हा भ्रातृद्रोहरूपी अग्नि या ब्राह्मणाच्या रक्तपातानें शांत होत असेल तर तसें करण्यास मी तयार आहे. हे दयाघन परमेश्वरा!"

"अरेरे! या ब्राह्मणानें हें काय केलें? यानें आपली तरवार आपल्या छातींत खुपसली! हाय हाय! ब्रह्महत्या! ब्रह्महत्या! " असे उद्गार केव्हांच जवळ उभे असलेल्या क्षत्रियांच्या तोंडांतून निघून गेले. रक्ताच्या धारा वाहूं लागल्या. ब्राह्मणाच्या उष्ण रक्ताचे शिंतोडे त्या उन्मत्त होऊन गेलेल्या बंधुद्वयांच्या आंगावरही उडाले व त्यामुळें त्यांचीं वस्त्रें लाल झालीं. आतां कुठें ते दोघेही बंधु जरा भानावर येऊं लागले." आपल्यासाठीं या ब्राह्मणानें आत्महत्या केली! अहो ब्राह्मण कांहीं असा तसा नव्हता तर स्वधर्मपरायण, शास्त्रज्ञ, उदारचित्त व स्वामिनिष्ठ होता. त्याच्या रक्तानें आपलीं शरिरें कलंकित झालीं हें अगदीं योग्य झालें नाहीं." अशाप्रकारचे अनेक विचार उभय बन्धूच्या मनांत उद्भवूं लागले.

हा हृदयद्रावक व शोचनीय प्रकार पाहून उभय बन्धूंच्या हातांतून तलवारी गळून पडल्या. त्यांचे नेत्र अश्रूनीं पूर्ण भरून आले. कोप शान्त होऊन गेला. व आपल्या दुष्कृत्यासाठीं त्यांच्या मनांत अनुताप जागृति झाली. थोडावेळ ते प्राणहीन प्रस्तरमूर्तिप्रमाणें स्तब्ध

होऊन गेले. त्या मृत ब्राह्मणाच्या देहाकडे टकमक पहात ते मनांतल्यामनांत आपापल्या अविवेकासाठीं आपला धिःकार करूं लागले.

प्रतापसिंहाच्या आज्ञेनें मोठ्या समारंभानें त्या ब्राह्मणाच्या शवाचा अंत्यविधि करण्यांत आला. व त्या ब्राह्मणाच्या सन्मानार्थ त्याच्या चितेच्या जागीं प्रतापसिंहानें एक समाधिस्तंभ उभारून त्यावर त्या ब्राह्मणाच्या चरित्राचा संक्षेपानें उल्लेख केला. व त्याच्या कुटुम्बास निर्वाहासाठीं चांगलें वर्षासन करून दिलें. हें वर्षासन आजतागायतही त्या ब्राह्मणाच्या वंशजास मिळत आहे.

नंतर प्रतापसिंह शक्तिसिंहास ह्मणाला " शक्ति! तूं आतांच्या आतां येथून चालता हो कसा याउप्पर जर माझ्या राज्यात कोठेंही दृष्टीस पडलास तर तुला कारागृहांत घातलें जाऊन तुला तुझ्या त्या अपराधाबद्दल योग्य प्रायश्चित मिळेल. "

तुफानी मेघ पार नाहींसे झाले. कारण कीं, आपला परस्पर संबंध काय आहे हें आतां दोघांनांही कळून चुकलें होतें. अधिक काहीं न बोलतां शक्तिसिंहानें मोठ्या नम्रतेनें उत्तर दिलें—" राजाज्ञा शिरसावंद्य आहे. " आपल्या नोकरचाकरांस बरोबर घेऊन शक्तिसिंह त्याच घटकेस मेवाडभूमीचा त्याग करून चालता झाला.

प्रतापसिंह एकटाच आपल्याशीं बोलूं लागला— " हाय हाय! प्रारंभींच अपशकून! याचा परिणाम काय

होईल तें त्या परमेश्वरालाच ठाऊक! जें काय होणार असेल तें होईल मी प्रतिज्ञा तर केलीच आहे. व चितोड परत मिळविल्याशिवाय या प्रतिज्ञेची पूर्ति होणें नाहीं! चितोडचा उद्धार हीच माझी प्रतिज्ञा! ही प्रतिज्ञा पूर्ण करून मी माझ्या जीवनाचें सार्थक्य करीन! विजयदाता परमेश्वर आहे!"

# द्वितीय खंड—व्रतग्रहण

## प्रथम परिच्छेद.

## दीप निर्वाण.

"पसे मर्ग मेरे मजारपर जो दिया किसीने जलादिया!
उसे आह! दामने बादने सरे शामहीसे बुझा दिया॥"



दाता व त्राता परमेश्वर. तोच मेवाडचा स्वातन्त्र्य दाता व लक्ष्मी त्राता हें खरें. पण मनुष्यानें प्रयत्न केले पाहिजेत. उद्योग व कृति यांविना प्रयत्न कोणत्याही काळीं कोणाला यशस्वी झाला असें ऐकण्यांत नाहीं. तेव्हां अपाणाला ही आतां आपल्या प्रतिज्ञा पालनाच्या उद्योगास प्रवृत्त झालें पाहिजे. चितोड हांच आमची प्रतिज्ञा व राजभोग,

विलास, आनंद व विषयलालसा इत्यादिकांचा प्रतिज्ञापूर्ति होईपर्यंत त्याग करणें हेंच आमचें व्रत. संपत्तिशून्य राजा व वनस्पतिशून्य वसुंधरा हीं दोन्ही सारखींच. राजा ! राजा ! कोणाचा राजा ! माझें राज्य नव्हे ! माझी राजधानी नव्हे ! मला कोणी. सहाय्यकर्ता नाहीं ! संपत्ति माझी नव्हे ! माझें कांहींच नाहीं ! मी राजमुकुट शिरीं धारण केला तो व्यर्थ ! प्रयत्नांविना व साधनांविना मनुष्याच्या हातून कांहींही होणें शक्य नाहीं ! चितोडचा उद्धार करणें हाच आमचा जन्मप्रयत्न ! हेंच आमचें जन्मव्रत ! व हेंच आमचें ध्येय !!

एका निर्जन वनांत प्रतापसिंह आपल्या मनाशीं वरील प्रमाणें विचार करित होता. इतक्यांत चंदावत् कृष्ण त्या ठिकाणीं आला. त्याला पहातांच प्रतापसिंह मनांत अत्यंत आनंदित होऊन त्याला मोठ्या आतुरतेनें म्हणाला.—" चंदावतजी ! तुम्हीं आलां हें फार चांगलें झालें. माझ्या मनांतील एक हेतु मी आजपर्यंत कोणालाही कळविला नव्हता. पण तो आज प्रथम आपल्याला निवेदन करावा असा माझा मनोभाव आहे असें पहा ! पिंजऱ्यांत कोंडून ठेविलेल्या सिंहाप्रमाणें या उदयपुरांत निवास करणें माझ्या. मनाला यत्किंचितही बरें वाटत नाहीं. स्वातंत्र्याचा पूर्ण उपभोग घेतल्याविना माझ्या चित्तांत केव्हांही शांतता होणें नाहीं. मला असें वाटतें कीं, आजपर्यंत मोंगलांनीं केवळ कृपादृष्टि करूनच उदयपुरावर हल्ला

केला नाहीं. त्यांची इच्छा असती तर तसें करणें त्यांना केव्हांही अशक्य नव्हतें. पृथ्वीवरील नंदनवन व रजपूतांचेंअभिमानस्थान जें चितोड तें पादाक्रांत करून व रजपूतस्थानांतील कित्येक राजांस जिंकून केवळ उपहासच करण्याच्या हेतूनें मोंगलांनीं उदयपुराला अद्यापपर्यंत स्वतंत्र राहूं दिलें आहे. मी दुसरीं सर्व संकटें सुखानें सहन करीन पण शत्रुनीं केलेला अनुग्रह माझ्या हृदयांत शल्यवत् सलत आहे. चंदावतजी! आपणच मला सिंहासनीं बसविलें असून आज आपल्या समक्षच त्या सिंहासनाचा त्याग करण्याची माझी इच्छा आहे. बस्स! ठरलें. माझा हा निश्चय कायम झाला!

चंदावत् कृष्ण मोठ्या विचारांत पडला. प्रतापाच्या तोंडांतून असे उद्गार आजच कां निघाले याचें कारण त्याच्या ध्यानीं येईना. म्हणून मोठ्या उत्सुकतेनें त्यानें प्रतापास विचारिलें—" महाराज! झालें तरी काय, असें करण्याचें कारण? कृपा करून एकदां स्पष्ट कायतें सांगा! हा दास सुखांत, दुःखांत, संपत्तींत, विपत्तींत, रणांत अगर वनांत, प्रत्येक अवस्थेंत आपली आज्ञा शिरसावंद्य करून आपल्या सेवेस तयार आहे "

एक दीर्घनिःश्वास सोडून प्रतापसिंह म्हणाला— " सरदार! माझा अंतिम निश्चयच आतां अंमलांत आणला पाहिजे वनवासग्रहणाविना—माझ्या चित्तांत शांति होणें नाहीं. वनवाससुख हेंच माझें प्रकृत सुख आहे. व

म्हणून तें सुख मिळवून देण्याविषयीं मी आपणाला सांगत आहे. "

प्रतापाच्या विशाल व तेजस्वी नेत्रांतून अश्रू आलेले पाहून त्या स्वकार्यदक्ष व स्वामिनिष्ठ सरदाराच्या अंतःकरणांत खेदाचा प्रादुर्भाव झाला. एक दीर्घोष्ण निःश्वास सोडून प्रतापाच्या मुखाकडे पहात चंदावत्कृष्ण म्हणाला— " महाराज ! वनवासग्रहणाचा भावार्थ मी समजलों नाहीं. "

प्रतापानें पुन्हां बोलण्यास आरंभ केला - " वनवासाचे क्लेश सहन करणें ही कृति महानुभावांची असते. क्षुद्राचें हें कृत्य नव्हें. वनवासग्रहण करण्याचा माझा अगदीं ठाम निश्चय होऊन चुकला आहे व वनवास पत्करल्याशिवाय चितोडोद्धाराचा मला दुसरा एकही मार्ग दिसत नाहीं. अत्यंत कष्ट व संकटें सहन केल्याशिवाय कोणतेंही महत्कार्य सिद्ध होत नसतें. ज्याअर्थी चितोडचा उद्धार हीच माझी प्रतिज्ञा आहे त्याअर्थी आजपासून माझ्या सर्व सुखोपभोगाचा त्याग करून त्यांनां मला तिलांजलि दिली पाहिजे " महाराज ! हा विचार—"

चंदावत् बोलणार होता पण इतक्यांत प्रताप मध्येंच म्हणाला—" पहा. चंदावत्जी ! या भरतखंडांत महाप्रतापी पांडवानांही राज्यभ्रष्ट होऊन वनवासी व्हावें लागलें .त्यांची अशी दृढ प्रतिज्ञा होती कीं, एक तर राज्यप्राप्ति तरी करूं अगर निरंतर वनवास भोगूं. कारण

कीं वनवास अगर राज्यप्राप्ति यां खेरीज अन्य अवस्थेंत सुख नाहीं हें ते पूर्णपणें जाणून होते. अर्थात् मध्यम स्थितींतील सुखाची सुखांत गणना नाहीं. अतिशय कष्टांत व घोर वनवासांत जें सुख आहे, त्याची कल्पना फारच थोड्यांच्या डोक्यांत असते. आतां मला याच सुखाचा विचार केला पाहिजे.

आतां आपल्या बोलण्याचा भावार्थ माझ्या कांहींसा ध्यानांत आला. " असें चंदावतानें समानभावदर्शक मुद्रेनें संक्षिप्त उत्तर दिलें. तेव्हां प्रतापसिंह अत्यानंददर्शक मुद्रेनें म्हणाला- " सरदार ! तुह्मीं माझ्या बोलण्याचा भावार्थ समजलां हें ठीक झालें. या तुमच्या सत्कृत्याबद्दल मीं तुमचा फार ऋणी आहे. या ऋणाची फेड या जन्मीं तरीं माझ्या हातून होईल असें मला वाटत नाहीं."

" महाराज ! असे शब्द उच्चारूं नका मी केवळ माझें कर्तव्य बजावीत आहे, यांत ऋण कसलें ! " अशा भाषणानें चंदावतानें आपली नम्रता दर्शविली.

प्रताप व चंदावतकृष्ण यांचें या महत्वाच्या विषयावर संभाषण चाललें होतें इतक्यांत एक हेर त्याठिकाणीं धांवत धांवत आला व प्रणाम करून तो आज्ञेची वाट पाहूं लागला. त्याची मुखचर्या अगदीं म्लान दिसत होती- काय हकिकत आहे तें सांगण्याबद्दल त्याला प्रतापसिंहानें संकेतानें आज्ञा केली. तेव्हां तो सांगूं लागला- " महाराज ! मोंगलांची दृष्टि उदयपुरावर असून त्यांनीं हल्ल्या-

चीही तयारी चालविली आहे ते लौकरच उदयपूर उध्वस्त करून टाकतील असें दिसतें ! महाराज ! काय सांगूं ? या कामांत कित्येक राजद्रोही व देशद्रोही रज- पूतांचाही हात आहे व त्यांच्याच बळावर मोंगलांनीं उदयपूरावर चाल करून येण्याची हिम्मत धरली आहे अशी बातमी लागली आहे.

वा ! फार चांगलें ! ! पण असें झाल्याविना तरी पर- मेश्वराची लीला आपल्या कशी नजरेस पडणार ? जा ! तूं आपलें काम कर. " अशी प्रतापाची आज्ञा होतांच मोठ्या नम्रतेनें प्रणाम करून तो दूत तेथून निघून गेला.

दूत गेल्यावर चंदावत मोठ्या गंभीरतेनें प्रतापसिंहास ह्मणाला-" मला तर सगळीं अवलक्षणेंच दिसत आहेत. "

अवलक्षणें कसचीं ? मला सर्व सुलक्षणेंच दिसतात. जितकीं संकटें अधिक तितकी आपल्यावर परमेश्वराची कृपा अधिक असें समजावें. चातुर्य व दूरदर्शित्व यांचा आपल्या अंगीं अभाव आहे ते ह्मणून अशा प्रसंगीं प्राप्त होत असतात समजलें ? "

प्रतापसिंहाचें हे भाषण ऐकून चंदावतकृष्ण मोठ- मोठ्यानें हंसूं लागला तेव्हां प्रतापानें त्याला हंसण्याचें कारण काय ह्मणून विचारिलें

" आपण माझ्या हंसण्याचा काय अर्थ केला ? " असा उत्तर न देतां चंदावतानें प्रश्न केला.

" तर मग माझ्या मनांत जो तर्क आला तोच खरा ? "

असा प्रतापानें त्याचा मनोभाव जाणून मार्मिकरीतीन प्रश्न केला.

चंदावतानें मोठ्या गंभीरवाणीनें उत्तर दिलें—"महाराज! आपण जो तर्क केला तोच खरा. माझें हास्य हें आपल्या विचारांचें सर्वथैव प्रतिबिंबच आहे. महाराज! आपलें हृदय हें महत्तेचा एक सागर आहे रजपूतांचें नांव आपणच अमर कराल. आतां काय केलें पाहिजे त्याची आज्ञा व्हावी. हा दास स्वामींची आज्ञा परिपालन करण्यास तयार आहे."

"मी हेंच करणार होतों. आतां उदयपूराचा त्याग करावा हेंच अधिक योग्य दिसतें. जीवनाच्या भीतिमुळें जर माझ्या वाडवडिलांनीं चितोड सोडून दिलें नसतें व शेवटपर्यंत जर ते यवनाशीं शौर्यानें लढले असते तर आज मला अशी चितोडच्या उद्धारासाठीं वनवासग्रहण करण्याची आवश्यकता राहिली नसती. चंदावतजी! मघा ज्या गोष्टीचा मी विचार केला होता त्याचा थोडाबहुत अनुभव आपण दूतद्वारां ऐकलाच आहे व यापुढेंही आणखी कितीतरी गोष्टी आपल्या कानीं येतील. तेव्हां पहिल्यापासूनच आपण अशा प्रसंगासाठीं तयार असलें पाहिजे; त्यांतच आपला फायदा आहे. दोन दिवसांनीं जें अनिष्ट होणार त्याचा प्रतिकार करण्यासाठीं जर आपण आजपासूनच तयारी केली तर तें अनिष्ट आपणांस विशेष दुःखदायक होणार नाहीं. आजच्या आज उदयपूराचा

त्याग करून कोणत्यातरी एका घोर अरण्यांत वास करावा. हेंच आपणांस अधीक लाभकारक व फलदायक आहे."

"महाराजांची आज्ञा शिरसावंद्य आहे" असें ह्मणून चंदावतानें आपली अनुमती प्रकट केली.

"मला आपणाला आणखी पुष्कळ सांगावयाचें आहे. पण तें योग्य प्रसंगीं सांगेन. आतां आपणाला सर्व रजपूतांची एक मोठी सभा भरविली पाहिजे" असें ह्मणून प्रतापानें आपली इच्छा व्यक्त केली.

त्यानंतर प्रताप आपल्या मनाशींच बोलूं लागला—"पण माझा हा विचार सर्वांना पटेल काय? कां नाहीं पटणार? पटलाच पाहिजे!" असें त्यानें आपल्या प्रश्नाचें आपणंच उत्तर दिलें.

महापुरुष जो मार्ग पसंत करितात तो मार्ग पाहिजे तसा व पाहिजे तेवढा कठीण असला तरी त्यांचे अनुयायी त्याच मार्गाचें अनुकरण करितात व तसें होणें हें सर्वथैव स्वाभाविकच आहे.

---



## द्वितीय परिच्छेद.

# क्षत्रियांची सभा.

"यद्यदाचरति श्रेष्ठ स्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥"

सर्व क्षत्रियांची एक प्रचंड सभा उदयपुरच्या राजमहाला समोरील एका विस्तीर्ण पटांगणांत भरली होती राज्यांतील लहान मोठे सर्व क्षत्रिय एकत्र जमले होते. रजपूत वीरांची एवढी प्रचंड सभा पूर्वीं कधींही भरली नव्हती. प्रतापसिंहाची सर्व प्रजा एका विशिष्ट उद्देशानें आज एकत्र जमली होती.

महाराणा प्रतापसिंह राजवेशानें एका उच्च रत्नजडित सिंहासनावर विराजमान झाला होता, व कांहीं विशेष हेतूनें सर्व लोकांच्या मुखांचें सूक्ष्म निरीक्षण करित होता. त्याच्या दोहोंबाजूस त्याचे प्रधान व अन्य अधिकारीजन आपापल्या आसनांवर विराजमान झाले होते. कित्येक भाटही या प्रसंगीं हजर होते. महाराण्याचा मुख्य प्रधान भामासा महाराण्याच्या उजव्या बाजूस वीरासन ठोकून बसला होता. प्रतापसिंह त्या ठिकाणीं एकत्र जमलेल्या सर्व वीरांस उद्देशून गंभीरतेनें व मार्मिकपणानें म्हणाला—

क्षत्रिय वीरबंधूनो! अशा दीनदशेंत अजून तुह्मीं किती काळ घालविणार? तुमच्या हातून मोंगलांच्या तडाक्यांतून

चितोडचा उद्धार होण्यासारखा नाहीं काय? स्वर्गतुल्य चितोड नगरी कायमचीच पारतंत्र्य शृंखलेंत जखडून रहाणार काय सुवर्णपुरी चितोडनगरी एखाद्या विधवेप्रमाणें निरंतर रडत रहाणार काय? असें असेल तर आमचें जीवन व मृत्यु समसमानच! शूर क्षत्रिय वीरानों! स्वदेशोद्धाराच्या व स्वातंत्र्यप्राप्तिच्या कार्यांत जर अशारीतीनें आपण उदासीन होऊन बसलों तर हें पवित्र कर्तव्य क्षुद्रलोकांच्या हातून तडीस जाईल असें तुह्माला वाटतें.? आपल्या आंगांतील प्रत्येक शिरेंतून जें उष्ण क्षात्रियरक्त खेळत आहे. त्याचा मग काय उपयोग? उठा पहातां काय आजच्याच शुभमुहूर्तावर आपण सर्व एका कठीण व्रताचा अंगिकार करूं. जोंपर्यंत चितोडचा उद्धार होणार नाहीं तोंपर्यंत आपण अशौच धारण करूं. प्रियतम मातापिता अगर तसाच कोणी आप्तबंधू अगर इष्टजन मेल्यावर सर्वप्रकारच्या सुखोपभोगांचा त्याग करून ज्याप्रमाणें अशौच पाळतात त्याचप्रमाणें आपण आजपासून स्वदेशोद्धारार्थ अशौच पाळूं मेवाडवासी सर्व जनानीं जर हें सार्वजनिक शोकचिन्ह धारण केलें, इतक्या कठोर असिधाराव्रताचें पालन केलें, व आपल्या ऐक्याचें उत्कृष्ट उदाहरण जगाच्या निदर्शनास आणून दिलें तर कोणत्या ना कोणत्यातरी दिवशीं याचें फळ आपल्याला खात्रीनें मिळाल्यावांचून राहणार नाहीं. या व्रताचें अगर प्रतिज्ञेचें नांव ' कार्यं साधयामि वा देहं पातयामि " असें आहे. स्वदेशोद्धारार्थ

स्वज्ञातिकल्याणार्थ व स्वातंत्र्य रक्षणार्थ जरें आपण या व्रताचा अंगिकार केला तर परमेश्वर आपली मनःकामना खात्रीनें पूर्ण करील. मेवाड आपली मातृभूमी आहे, आपली जननी आहे. ती स्वर्गादपि गरीयसी जन्मभूमी आहे. सुवर्णतुल्य राजस्थानचा एक अंश आहे! स्वर्गतुल्य चितोड आज मोंगलांच्या ताब्यात आहे! आपली ही केवढी शोचनीय स्थिति!! हाय हाय अशा जन्मभूमीच्या उदरांत जन्मास येऊन आपण तिच्या पवित्र नांवास कलंक लावणारेच निपजलों याची आपणांस यत्किंचितही लज्जा वाटूं नये?

हें भाषण ऐकतांच त्याठिकाणीं एकत्र जमलेल्या अगणित क्षत्रिय वीरांनीं- " छे! नाहीं! असें कदापि होणार नाहीं. चितोडचा उद्धार हेंच आमचें जीवनव्रत आहे." अशी एकच गगनभेदक गर्जना केली.

प्रताप मनांतल्यामनांत अत्यानंदित होऊन पुन्हां बोलूं लागला- " तेजस्वी क्षत्रियवीरांच्या तोंडून असेच उद्गार नेहमीं निघावयाचे! असो. आतां मी या अशौच व्रताविषयीं थोडेसें विवेचन करितों त्याकडे तुमचें चांगलें अवधान असूं द्या जोंपर्यंत आपल्या हातून चितोडचा उद्धार होणार नाहीं तोंपर्यंत आपणापैकीं कोणीही कोणत्याही प्रकारचा आनंदोत्सव करूं नये. जननी जन्मभूमीस स्वातंत्र्यप्राप्ति करून देण्यासाठीं पितृमातृवियोगजन्य दुःखाप्रमाणें नित्य अशौचचिन्ह धारण करूनच रहावें.

सर्वांनीं तरुपत्रावर भोजन व तृणशय्येवर शयन करावं. सर्वप्रकारच्या विलासांचा त्याग करावा. आजंमितीपासून आपली विजयभेरी सैन्याच्या अग्रभागीं न राहतां पिछाडीस रहावयाची, सदासर्वकाळ हीनदीन व कंगालवृत्तींत राहून अनन्यभावानें जगन्नियंत्या परमेश्वराची करुणा भाकित असावें. असें केल्यानें तो दयाघन जगदीश आपणावर खात्रीनें कृपा करील. जर हें कठीण व्रत आपण निश्चयपूर्वक पाळलें तर आपल्या अंगीं भीषण पराक्रम करण्याची शक्ति येईल. मग चितोडचा उद्धारचसां काय तर अखिल भारतवर्षाचाही आपण सहज उद्धार करण्यास समर्थ होऊं."

"स्वदेशकल्याणासाठीं आम्हीं सर्वांनीं या जीवनव्रताचा स्वीकार केला" अशी सर्व रजपूतांनीं एकच गंभीर गर्जना केली.

या भाषणानें प्रतापाच्या अंगीं दुप्पट बळ आलें व तो अधिक उत्साहित होऊन पुढें बोलूं लागला—"मेवाडचा आनंददीप आजपासून विझून जावो व सर्वत्र अंधःकाराचें साम्राज्य होवो! आतां मेवाडांत हास्यमुख दिसावयाचें नाहीं. सर्व राज्य स्मशानवत् होवो. आनंदी मनुष्याचा आनंदध्वनि, दुःखितांचा रोदनध्वनि, संगीताचा कर्णमनोहर ध्वनि, बालकांचें हास्य, स्त्रीपुरुषांचें प्रणयसंभाषण व माता-पित्याचें वात्सल्यप्रेम यांपैकीं एकालाहीं यापुढें या राज्यांत थारा मिळणार नाहीं. कृषिकारांनीं

कृषिकर्म करूं नये व व्यापाऱ्यांनीं व्यापाराचा अवरोध करावा; मग असल्या या स्मशानवत् मेवाडाला हस्तगत करून मोंगल लोक काय लाभ मिळवितील हें तरी दिसेलच. ”

प्रतापाचे तेजस्वी व विशाल नेत्र अश्रूंनीं भरून गेले. सभास्थानांत सभासदांचीही तीच स्थिती होऊन गेली व ते अधोवदन होऊन दीर्घ निःश्वास टाकूं लागले. प्रतापानें अश्रू पुसून आपलें भाषण पुन्हां पुढें चालविलें— “ बांधवहो ! निराश होण्याचें कांहींही कारण नाहीं. हें व्रत आपणांस कायमचेंच पाळावें लागेल असें नाहीं. तें कांहीं मुदतीपर्यंत पाळावयाचें आहे. ज्याअर्थीं आपण स्वर्गतुल्य चितोडनगरी गमावून बसलों आहों त्याअर्थीं या स्मशानतुल्य राज्याचा व राजधानीचा त्याग करणें हें कांहीं फारसें दुःखदायक नाहीं. जन्मभूमीचा व पुरातन पितृगृहाचा त्याग करितांना प्रथमारंभीं हृदयांत खेद होणें हें स्वाभाविक आहे. परंतु या नवीन व्रताचें रहस्य एकदां समजलें व दोन चार दिवस गेले ह्मणजे मग त्याचें इतकें दुःख तुह्मांस वाटणार नाहीं अरवलीपर्वतावरील उच्च प्रदेशांतील कमळमीर नामक एका खिंडींत नूतन राज्याची स्थापना होणार आहे. या दुर्गमस्थलीं दुष्ट यवनाचें कांहींही शहाणपण चालणार नाहीं. आपल्या अशा या दुर्दशेंत जर आपण याचठिकाणीं अधीक दिवस राहिलों तर क्षणोक्षणीं आपणांस भयंकर त्रास सोसावे लागतील,

पुरातनकाळापासूनच मोंगलांची काकदृष्टि राजस्थानावर आहे व अलिकडे तर-हाय हाय! हा विचार मनांत आला कीं हृदय विदीर्ण होऊन जातें— कित्येक स्वदेश-द्रोही कुलांगार रजपूत, मोंगलांचे दासानुदास बनून स्वदेश नाशाचे कार्जांत तनमनधनेंकरून प्रवृत्त झालेले आढळून येऊं लागले आहेत."

वज्रहृदयी प्रतापसिंहाच्या नेत्रातून आतां उघडरीतीनें अश्रूप्रवाह सुरू झाला. त्याचा कंठ भरून आला. स्वज्ञा-तीच्या नीचतेचा विचार मनांत येतांच सर्व सभाजनही शोकाश्रू गाळूं लागले. त्यांना अश्वासन देणारा त्या ठि-काणीं कोणीही नव्हता.

थोड्यावेळानें मनाचा हा वेग किंचित् कमी कमी होतांच प्रतापानें आपलें उत्साहपूर्ण भाषण पुढें चालविलें. तो ह्मणाला—" सरदारलोकहो! तीक्ष्ण असिधाराव्रत स्वीकारण्याचा आपल्याला हा अनायासेंच योग सांपडला नाहीं काय? मारवाड, अंबर व बिकानेर येथील रजपूत जात्याभिमान सोडून देऊन परधर्मी मोंगलांचे गुलाम बनून गेले. आपल्या शिरांत्रांतून खेळत असलेल्या वंश-परंपरागत क्षत्रिय रक्ताचा कांहींच विचार न करितां आपल्या अस्तित्वाला विसरून जाऊन त्यांनीं जाति, धर्म, आचार, विचार व व्यवहार या सर्वांस तिलांजलि दिली आहे!. मी तुह्मांला अधिक काय सांगूं? अशा या कुलां-गारांनां आपल्या कन्या व बहिणी मोंगलांच्या चरणीं

अर्पण करण्यांत एकप्रकारचा पुरुषार्थच वाटतो. अशाप्रकारचें निःसत्व व पशुतुल्य जीवन तुह्मांला पसंत आहे काय? मला नाहीं वाटत कीं, अशाप्रकारचें जीवन स्विकारण्यास कोणी रजपूत तयार होईल."

"नाहीं! नाहीं! कधींही नाहीं!! अशा जीवनापेक्षां मरण सहस्रपट अधिक 'सुखदायक आहे" अशी चोहोंकडून सर्व वीरांनीं समुद्राच्या लाटेप्रमाणें एकच भीषण गर्जना केली.

"तर मग स्वदेशकल्याणार्थ या महाव्रताचा स्वीकार करून त्यांतच मरणें हें अधिक चांगलें नाहीं बरें?" असें प्रताप समयसूचकतेनें त्यांची उत्साहवृद्धी करण्यासाठीं ह्मणाला.

"आजपासून आह्मीं सर्वांनीं या महाव्रताची दीक्षा घेतली. स्वदेशाला स्वातंत्र्य मिळून चितोडचा उद्धार होईपर्यंत आह्मीं या व्रताचा भंग करणार नाहीं एतदर्थ आह्मीं महाराजांसमक्ष आमच्या पवित्र मनानें प्रतिज्ञा करितों." असें सर्वांनीं या व्रताचा स्वीकार करितांना उत्तर दिलें.

"तर मग सर्वांनीं एकवार 'कार्यं साधयामि वा देहं पातयामि' अशी गगन भेदक गर्जना करावी ह्मणजे माझ्या हृदयांत संतोष होईल." असें ह्मणून प्रतापानें स्वतःही त्या प्रतिज्ञेचा उत्साहपूर्वक उच्चार केला.

तत्काळ सर्वांनीं अंगांत एखाद्या दैवीकशक्तिने संचार

केल्याप्रमाणें उन्मत्त होऊन " कार्यं साधयामि वा देहं पातयामि " अशी गगनभेदक व पृथ्वी कंपायमान करून सोडण्यासारखी गर्जना केली व ही गर्जना बराच वेळ-पर्यंत दशदिशांत दुमदुमून गेली होती.

इतक्यांत प्रतापानें आपल्या एका मुख्य भाटांस नेत्र-संकेत केला. तेव्हां तो तत्काळ आपल्या इतर साथीदारां-सह अग्रभागीं येऊन एक शौर्ययुक्त पद्य गावूं लागला. त्याचा भावार्थ पुढें लिहिल्याप्रमाणें होताः—

" अहाहा ! शुभमुहुर्त ! खरा अपूर्वयोग ! असा शुभ-योग पुन्हां कधींही येणार नाही. या योगांतच व्रतग्रहण करा. स्वदेशोद्धार व्रतधारण करा व स्वातंत्र्य प्राप्तिसाठीं प्राणांचें बलिदान करण्यास तयार व्हा. आपल्या शेजारीं असलेली एक स्वर्गतुल्य सुवर्ण नगरी हीनदीन होऊन विधवा नारीप्रमाणें अश्रू ढाळीत बसली आहे. मेवाडच्या राज्यलक्ष्मीचा विधर्मी मोंगललोक अनेकप्रकारें छळ करित असून कित्येक कुलांगार रजपूतही या कार्यांत त्यानां सहाय करित आहेत हें तुम्हां सर्वांनां ठाऊक असूनही–तुम्ही सत्यवीर मौन धारण करून स्वस्थ कसे बसलां ? छे ! असें स्वस्थ बसून राहिल्यानें कोणतांही लाभ होणार नाही ! व्रतग्रहण करा, ऐक्यजाग्रती करा व रज-पूतांच्या नांवाची पवित्रता अखिल जगाच्या प्रत्ययास आणा. असा हा अपूर्व योग पुन्हां कधींही येणार नाही."

शौर्योत्पादक पद्य बंद झालें. सर्व क्षात्रिय वीरांच्या

अंगीं तत्काळ स्फूर्तीचा प्रादुर्भाव झाला. त्यांच्या ध्यानीं मनीं " शुभ मुहुर्त ! अपूर्व योग ! असा शुभयोग पुनः कधींही येणार नाहीं. " हेच शब्द वारंवार ध्वनित होत आहेत असा त्यांस भास होऊं लागला. अर्थात इतर सर्व विचारांचा लय झाला

---

## तृतीय परिच्छेद.

## वनवास.

एको देवः केशवो वा शिवो वा ।
एकं मित्रं भूपति र्वा यति र्वा ॥
एको वासः पत्तनें वा वने वा ।
एका भार्या सुन्दरी वा दरी वा ॥ १ ॥



त परिच्छेदांत वर्णन केलेली घटना होऊन गेल्या नंतर मेवाडच्या पूर्व स्थितींत हळु हळु परिवर्तन होऊं लागलें. सर्व क्षत्रियांनीं आपल्या आयुष्यक्रमांत फेरबदल केला. सर्व लोक आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें वर्तन करूं लागले. त्या दिवसापासून सर्वांनीं आपआपल्या घरादाराची मायाममता सोडून दिली. त्याच दिवशीं सर्व प्रजाजन महाराणा प्रतापसिंहाच्या आज्ञेनुसार उदयपूर व त्याच्या आसपासच्या समस्त प्रदेशांस प्रमाण करून अर-

वर्ली पर्वतावरील कमळमीर नामक एका खिंडीच्या आसपास झोंपड्या बांधून रहाण्यास गेले.

प्रतापसिंहानें कमळमीर ही आपली राजधानी केली, व त्यानें त्याच्या आसपास कांहीं किल्ले बांधिले. नूतन राजधानीं हें दीनता, कष्ट व सहिष्णुता यांचें मूर्तिमंत निवासस्थान होतें. समग्र राजधानींत घर असें नांव ठेवण्यासारखें एकही निवासस्थान नव्हतें. गवत व वृक्षपर्ण यांनीं आच्छादिलेल्या झोंपड्याच लोकांना आतां प्रिय वाटूं लागल्या. प्रतापसिंह स्वतःही अशाच एका पर्णकुटिकेंत रहात असे. तेव्हां इतर नरवीर रहात होते हें सांगण्याची फारशी आवश्यकता आहे असें नाहीं

उदयपूर व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत कोणीही हिंदु आढळून आल्यास त्याला देहांताची शिक्षा भोगावी लागेल, अशी सक्त राजाज्ञा होती आणि दुसरें असें कीं, सर्वांनीं महाराण्यासमक्ष तशी प्रतिज्ञा केली असल्यामुळें उदयपूरांत माणूस तरी कसें रहाणार? मूर्खपणानें राजाज्ञेचा भंग केल्यामुळें एका गरिब गुराख्याला विनाकारण प्राणदंडाची शिक्षा भोगावी लागून राजाज्ञेनें त्याचें शव एका वृक्षास लटकाविलें जाऊन अशी दंवडी पिटविण्यांत आली कीं, यापुढें राजनियमाचें कोणी उलघन करील त्याची याचप्रमाणें दुर्दशा होईल. आपल्या या आज्ञेचें काळजीपूर्वक पालन होतें कीं नाहीं, हें पहाण्यासाठीं प्रतापसिंह स्वतः वारंवार गुप्तवेशानें फिरत असे.

थोडक्याच दिवसांत तो विशाल व वसतियुक्त उदयपूरचा प्रदेश स्मशानवत् भयानक व उजाड बनून गेला. वीरांचा जयध्वनि व नागरिकांचा आनंद कोलाहल त्याठिकाणीं ऐकूं येईनासा झाला. वीथिका, नाटकगृहें व उद्यानें यांचा नामशेषही त्याठिकाणीं राहिला नाहीं. हिंस्त्रप्राणी सर्वत्र निर्भयतेनें संचार करूं लागले. अखिल प्रदेशांत दिवसा तसेंच रात्रौ शांतता व निःस्तब्धता यांचें साम्राज्य माजून गेलें. केव्हां केव्हां प्रतापसिंह या शांत व निःस्तब्धस्थळीं येऊन एकांतांत अश्रूविमोचन करित असे, व आपली प्रतिज्ञा पालन करण्याचा दृढ निश्चय करून मनांतल्यामनांत ह्मणे- " फक्त माझ्याचमुळें या राज्याची अशी दुर्दशा झाली ना ? वडिलोपार्जित राजधानीस मी स्मशानवत् करून सोडिलें. अँ ! पण माझ्या मनांत जो एक महान हेतू निवास करित आहे त्याला, हे परमात्मन ! तूंच एकटा साक्षी आहेस. कारण कीं, तूं अंतर्यामीं आहेस. मी या राज्याचा निरर्थक नाश केला नाहीं. या स्मशानस्थ भस्मराशींत जी एक ठिणगी अद्यापि वास करित आहे. तीच आज नाहीं उद्यां तरी समग्र मोंगल साम्राज्य भस्मीभूत करण्यास सर्वथैव समर्थ होईल ! प्राण गेला तरी बेहत्तर पण प्रतिज्ञापूर्ति केल्याविना मी असा स्वस्थ बसणार नाहीं. माझी मनोदेवताच मला सांगते कीं, प्रयत्न कर-ह्मणजे कार्य सिद्धि होऊन गतवैभव पुनः प्राप्त होईल. माते जन्मभूमि ! माझे हेतू सिद्धीस नेण्यास मला सामर्थ्य दे. "

" पिताजी! तुह्मीं असे रणभिरु कसे झालां? सिसोदियी वंशांत तुम्हीं जन्म न घेतां तर फार उत्तम झालें असतें. प्राणभयासाठीं चितोड सोडून जर तुह्मीं गेलां नसतां तर तुमच्या या बालकाला या वयांत अशा तऱ्हेचा संन्यास खात्रीनें पत्करावा लागता ना! पित्याच्या पापांचें प्रायश्चित्त आज पुत्राला भोगावें लागत आहे पण चिंता नाहीं. जगाच्या इतिहासांत या प्रतापसिंहाचें नांव अजरामर होईल यांत लेशमात्रही संदेह नाहीं. हाच माझ्या हृदयाला संतोष!!

---

## चतुर्थ परिच्छेद.

## शक्तिसिंह.

विवेक भ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः।

भर्तृहरि



सर्पवत् वक्रगति धारण करणाऱ्या शक्तिसिंहाला वाचक खात्रीनें विसरले नसतील. प्रतापापासून दूर झाल्यानंतर त्याची काय अवस्था झाली हें आपणास प्रस्तुत परिच्छेदांत पहाण्यास मिळेल. राजपुरोहिताच्या शोचनीय मृत्युनंतर प्रतापाच्या मनांत जितका खेद झाला तितकाच शक्तिसिंहालाही झाला. परंतु प्रता-

पानें त्याली राज्यांतून हांकून लाविलें हा अपमान त्याला सहन झाला नाहीं व हळुहळु त्याच्या या अपमानानें द्वेषाचें स्वरूप धारण केलें. वीरांचा परस्पर द्वेष–भावांभावांचा आपापसांतील द्वेष !–परंतु शेवटीं या द्वेषानें महागंभीरतेचा स्वीकार केला. हा द्वेषाग्नि आसनीं, शयनीं स्वप्नीं, ध्यानीं, मनीं, अंतःकरण जाळून भस्म करूं लागला.

अश्वारूढ होऊन व्यग्रचित्तानें शक्तिसिंह मार्गक्रमण करूं लागला. दिवसां मागून दिवस निघून गेले–अनेक पर्वत, अनेक अरण्यें व अनेक देश त्यानें उलंघन केले. त्यानें मनांत एक दृढप्रतिज्ञा केली; पण त्या अपमान पावलेल्या अभिमानी रजपूतवीरानें जो मार्ग स्वीकारला त्याचा ज्या ज्या क्षणीं आमच्या मनांत विचार येतो त्या त्या क्षणीं हृदय विदीर्ण होऊन गेल्यावांचून रहात नाहीं.

सारा दिवस प्रवासाचे श्रम, क्षुधा व सूर्यताप सहन करून संध्याकाळीं शक्तिसिंह एका निर्जन वनांत अश्वावरून उतरून एका वृक्षाखालीं बसला होता. जवळच एक निर्मळ पाण्याचा ओढा खळखळ शब्द करित वहात होता. प्रवाहाच्या या मंजूळ ध्वनीनें संध्यासमयीं दुसऱ्या कोणत्याही पुरुषाचें मन खात्रीनें प्रसन्न झालें असतें; परंतु दुर्दैवी शक्तिसिंहाच्या नशिबीं ती प्रसन्नता लिहीलेली नव्हती. उद्विग्न मनास शांत करण्याचे त्यानें अनेक प्रयत्न केले, पण व्यर्थ ! अश्वास एका वृक्षास बांधून व त्या ओढ्याच्या पाण्यानें हातपाय धुवून तो एका

शिलेवर गंभीरपणें विचार करित बसला. उन्नत पर्वतश्रेणी व रमणीय वनराजी यांनीं त्या निर्जन स्थानांत गंभीरतेचा विशेष प्रादुर्भाव झालेला दिसत होता. भगवान् सूर्य-नारायण अस्ताचलीं पोंहचला होता. हा नैसर्गिक गंभीर आदर्श पाहूनही शक्तिसिंहाचें मन शांत झालें नांहीं. उलट त्याचा द्वेष अधिकाधिक वाढतच गेला. बाह्यतः तो थोडा शांत झाला खरा पण त्याचा अंतःकरणस्थ दारुण दावानल द्विगुणित प्रज्वलित झाला. धिक्कार! या मलीन अभिमानाला सहस्त्रवार धिक्कार असो!!

शक्तिसिंह आपल्याशींच बोलूं लागला-" केवढा अपमान! भावाभावांत असें वर्तन! अधिकाराचा हा सर्व अहंकार! सत्यापलाप करण्यांत इतका गर्व! सत्यपराक्रमी पुरुष असत्याभिमानाच्या मदांत चुकून जाऊन कोणत्याही प्रसंगीं सत्यापलाप करूं शकेल काय?

थोडावेळ विश्रांति घेऊन व विचार करून शक्तिसिंह पुन्हां आपल्याशीं बोलूं लागला-" धिःकार असो या राण्याच्या नांवाला व त्याच्या राजत्वाला! सत्यमर्यादेच्या रक्षणाचा विचारही ज्याच्या मनांत येत नाहीं व दुसऱ्याचीं सुकृतीं झांकून आपलीच कृति जो जनाच्या दृष्टीस पडावी अशी इच्छा करितो असा मनुष्य सार्वभौम राजा असला तरी त्याला शतशः धिक्कार असो! बरें पण बन्धूनें केलेला अपमान मी विसरून जाऊं काय के! असें होणें शक्यच नाहीं. जो मार्ग प्रतापानें स्वीका-

रला. त्याच मार्गाचें मलाही अवलंबन केलें पाहिजे. विस्मृतीचा मार्ग त्यानेंही माझ्यासाठीं स्वीकारलेला नाहीं. उदयपुरचा राजा-माझा जेष्ठबन्धू पण त्यानें राजपुरोहिताच्या शोचनीय मृत्युनंतर जो—"

मनुष्याच्या मनांत एकदां अभिमानरूपी अग्नि पेटूं लागला ह्मणजे त्याच्या तापानें तो अशीं दुष्कृत्यें करण्यास तयार होतो कीं, त्याची कोणाला कल्पनाही होणें शक्य नसते. शक्तिसिंह पुनः आपल्याशींच बोलूं लागला—"हा माझा संताप शांत करण्यास एकच उपाय आहे. तो हा कीं, अकबरास शरण जाऊन त्याचें दास्य स्वीकारावें ह्मणजेच माझ्या मनाला शांति मिळेल पण —"

त्याच्या मनांत कांहीं विचार येऊन तो ह्मणाला—"पण मी विधर्मी यवनांचें दास्यत्व करावें काय? बंधूनें केलेल्या अपमानाचा सूड उगविण्यासाठीं स्वदेश व स्वज्ञाति यांचा द्रोह करून मी कुलांगार होऊं?"

बराच वेळ त्यानें विचार केला. पण शेवटीं समय साधून सैतानानें त्या पवित्र क्षत्रिय कुलभूषण शक्तिसिंहाच्या मनावर आपला पगडा बसविलाच. शक्तिसिंहाच्यानें या सैतानाच्या संचारानें पडलेल्या मोहाचा अवरोध करवेना. याचवेळीं अशी एक गोष्ट घडून आली कीं, ती पाहातांच तो रजपूत वीर स्वदेशद्रोही व कुलांगार बनण्यास अंतःकरणपूर्वक तयार झाला.

ज्या शिळेवर बसून शक्तिसिंह अनेक विचार करण्यांत निमग्न झाला होता तेथून जवळच एक भयंकर कृष्णसर्प

अन्य प्राण्याच्या मिषानें जर्जरित होऊन सूड उगवि ण्याचा प्रसंग न मिळाल्यामुळें एका पाषाणालाच दंश करण्याचा प्रयत्न करीत होता. पहिल्या दंशानें त्याच्या मुखांतून थोडेंसें विष खालीं गळून पडलेंच; तेव्हां अर्थी तच त्यानें त्या पाषाणास एकामागून एक असे अनेक दंश केले; पण त्या शीलेचा यत्किंचितही भंग झाला नाहीं. उलट अत्यंत श्रम केल्यामुळें त्या सर्पाचे दोन तीन दांत मात्र गळून पडले व त्याच्या तोंडांतून रक्तप्रवाह सुरू झाला. तेव्हां हतवीर्य होऊन तो सर्प जवळील झाडींत चालता झाला व कांहीं वेळानें मृत होऊन पडला.

सर्प व सैतान यांच्यांत किती साम्य आहे हें सर्वांनां माहित आहेच. तसेंच सैतानाचा पराक्रम सर्पापेक्षां कांहींअंशीं अधिक आहे हेंही सर्वांना विदित असेलच. हटवादी शक्तिसिंह आज अभिमानरूपी सैतानाच्या तडा-ख्यांत चांगलाच सांपडला!

सर्पाचा दृष्टांत पाहून तो पुन्हां विचार करूं लागला— “सूड उगविण्याच्या हेतूनें या सर्पानें पाषाणासही दंश कर-ण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं! मग मी मनुष्य असून वैऱ्याचा सूड उगवूं नये काय? वैऱ्याचा सूड अवश्य उगवावा! धर्माधर्म व पापपुण्य पडलें पाण्यांत! स्वदेशवा-त्सल्य व जात्याभिमान पडला धुळींत! मला, त्यांच्याशीं काय करावयाचें आहे? सूड घेण्यापलिकडे आज मला

कांहींच विचार कर्तव्य नाहीं! मी विधर्मी मोंगलांचें दास्यत्व स्वीकारून स्वदेशवात्सल्यास जलांजलि देणार! मेवाडचा शत्रू होणार -व सूड उगवणार!! प्रताप! आतां पाहूं तुझा अभिमान व तुझा गर्व किती दिवस टिकतो तो. मोंगल बादशहा अकबर यांच्या दरबारीं जाऊन तुला राज्यभ्रष्ट करून एखाद्या भिक्षुकाप्रमाणें दारोदार हिंडायला लावीन त्याचवेळीं शक्तिसिंह या नांवाची सार्थकता झाली असें समजेन.

अभिमानरूपी विष शक्तिसिंहाच्या सर्व शरिरांत भिनून गेलें. या विषाच्या प्राण घातक दर्पानें वनांतील सर्व पशु-पक्षी अस्थिर होऊन आसपासची गंभीर पर्वतश्रेणीही थरारूं लागली कीं काय असा भास होऊं लागला. शांतिप्रद व निसर्गतः रमणीय असें तें स्थान या वेळीं महा भयंकर भासूं लागलें.

स्वदेश व स्वज्ञाति यांच्या नाशासाठीं उद्युक्त झालेला शक्तिसिंह शेवटीं दिल्लीस गेला. व बादशहास प्रसन्न करून घेऊन तो तनमनधनेंकरून आपला उद्दिष्ट हेतू सिद्धीस नेण्याच्या उद्योगास लागला.

शक्तिसिंहाच्या या कृत्यास अभिमान असें नांव देतां येईल कीं काय? अभिमानानें ध्रुवानें अढळपद मिळविलें, पांडवानीं वनवासाची व अज्ञातवासाचीं अनेक दुःखें सहन करून व कौरवांशीं धर्मयुद्ध करून राज्यपद मिळविलें व दुष्टाचें निर्मूलन केलें. तसेंच विश्वामित्रानें घोर

तपश्चर्या करून त्रैलोक्यासही थरथर कांपविलें त्याला खरा अभिमान ह्मणतां येईल. अभिमान असाच असला पाहिजे. शक्तिसिंहाच्या अभिमानासारख्या दुरा-भिमानमदानें घेरून जाऊन मनुष्यानें आपल्या सत्वाचें विस्मरण करूं नये. हा सत्याभिमान नव्हे. याचें खरें नांव आत्मप्रवंचना होय. तुमच्या अंगीं हजारों दोष असोत पण तुह्मीं कधीं-काळींही आत्मप्रवंचक होऊं नका.

---

## पंचम परिच्छेद.

# पद्मावती.

---

सती चतुर गेहिनी वसत ज्या गृहीं सद्गुणी
अखंड सुख सोहळा नय विवेक तेथें गणीं,
सुहास्यवदनीं तिच्या गमति रम्य पुष्पें नवीं,
मनीं विविध पुस्तकस्थित सुबोध ती सांठवी



तन राजधानीची कमळमीरांत उदय-सागरच्या विशाळ सरोवराचे. कांठीं स्थापना करण्यांत आली. या दुर्गम अरण्यमयस्थलांत राजपरिवारजनही वास करित असे.

प्रतापसिंहाची राणी पद्मावती सर्वप्रकारें पतीला शोभेल अशीच स्त्री होती. पती हेतु सिद्ध्यर्थ ती पतिप्राणा

महासाध्वी आपल्या पुत्रकन्यांसह पतीसहवर्तमान घोर व्रताचें पालन करण्यास सदासर्वकाळ तत्पर असे. स्त्री-पुत्रादिकांची ही अवस्था अवलोकन करून प्रतापसिंहाची बालंबाल अशी खात्री होऊन चुकली कीं, आपला हेतू खात्रीनें सिद्धीस जाईल. त्यांची हीनदीन अशी दशा पाहून पहिल्या पहिल्यानें प्रतापाच्या हृदयांत अत्यंत खेद होत असे. एकेदिवशीं प्रताप पद्मावतीस म्हणाला—" प्रिये! आपण या अती कठोर व्रताचा स्वीकार केला असून आपल्या भाग्यावरच मेवाडचें शुभाशुभ अवलंबून आहे. परमेश्वराची काय इच्छा आहे, तें कांहीं समजत नाहीं "

" परमेश्वराची शुभच इच्छा असणार. शुभसंकल्पाचें शुभ फळ मिळाल्यावांचून रहात नसतें. " असें पद्मावतीनें पतीची उत्साह वृद्धि करण्याच्या हेतूनें उत्तर दिलें.

" रात्रंदिवस मी परमेश्वराची अशी प्रार्थना करीत असतों कीं जो महाहेतू मनांत धरून मी मेवाडचा आनंददीप मालवून समस्त मेवाडभूमी स्मशानवत् करून सोडली व मेवाडांतील आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस वनवास स्वीकारावयास लाविलें तो माझा हेतू हे जगदीशा! तूं सिद्धीस नेऊन मला यश दे. थोडक्याच दिवसांत चितोडोद्धार करून पूर्ण स्वातंत्र्योपभोग भोगण्याची माझी प्रबल इच्छा आहे. पण नशिबीं काय लिहिलें आहे तें एकट्या त्या जगदीशालाच ठाऊक!" असे प्रतापानें निराशेनें उद्गार काढिले.

पद्मावती पतीचरणसेवा करित करित नम्रस्वरानें ह्मणाली–" प्राणनाथ! अशी अमंगळ शंका मनांत आणून निराश होण्याचें कांहीं कारण नाहीं. माता भवानी आपले तसेच आह्मां सर्वांचे हेतू निःसंशय सिद्धीस नेल्यावांचून कधींही रहाणार नाहीं "

" पण मोठ्या दुःखाची गोष्ट ही कीं, आपली क्षत्रिय-जातच आपल्या नाशास कारण झाली आहे! याला उपाय काय करावा? शिवाय मी हल्लीं असेंही ऐकिलें आहे कीं, मी केलेल्या अपमानाचा सूड उगाविण्यासाठीं शक्तिसिंह शत्रूस जाऊन मिळाला आहे. माझ्या सहाय-कर्त्यांकडूनही अलिकडे कांहींच खबर समजली नाहीं. काय करावें व काय न करावें याच विचारांत मी सदा-सर्वकाळ निमग्न असतों.–मला सर्वत्र अंधःकारच दिसत आहे! " अशा भाषणानें प्रतापानें विशेष निराशा प्रकट केली.

" नाथ! आपल्या या नवीन व्रताच्या पुण्याईनें या अंधकाराचा प्रतिकार होऊन पुन्हां सौभाग्य दीप प्रज्वलित होईल. पण एकाएकीं आज आपण असें उदास व निराश होण्याचें कारण?" असें ह्मणून पद्मावतीनें प्रतापसिंहास धीर दिला.

इतक्यांत प्रतापाचीं दोन बालकें–पुत्र व कन्या खेळत खेळंतें त्या ठिकाणीं आलीं. पुत्राचें वय पांच वर्षांचें व कन्येचें तीन वर्षांचें होतें. पुत्र आपल्या मातेचा पदर

धरून तिला विचारूं लागला-" आई ! सीता ह्मणते आम्हांला आतां कायमचेंच येथें रहावें लागणार हें खरें काग ? "

कन्या पित्याच्या कंठास मिठी मारून प्रेमानें चुंबन घेत विचारूं लागली " बाबा ! आपला महाल केवढा सुंदर होता. निजण्यासाठीं तेथें किती नरम गाद्या होत्या ! पण हें काय ? बाबा ! आपल्या कपाळाला हा किती बरें घाम आला ? त्या दिवशीं दादाला मी हें विचारिलें त्या-वेळीं त्याच्यांही कपाळास असाच घाम आला होता. बाबा ! आजपासून मी त्याला किंवा तुह्मांला असें कधींही विचारणार नाहीं बरें. माझ्या विचारण्यानें आपल्याला त्रास होतो नाहीं ? "

पतीकडून कन्येला आपल्याकडे घेऊन विषयांतर कर-ण्याच्या हेतुनें पद्मावती ह्मणाली—" बाळ ! माझ्या डोळ्यांत काय पडलें तें पहा बरें ? "

" आई ! कांहीं नाहीं अं ! मी तुझ्या डोळ्यांत फुंक मारतें " असें ह्मणून त्या बालिकेनें मातेच्या नेत्रांत फुंकर मारला.. फुंकर डोळ्यांत गेला कीं नाहीं तें त्या परमात्म्या-लाच ठाऊक.. पण फुंकराचा ध्वनि झाला एवढें मात्र खरें

पद्मावती एवढा वेळ आपल्या मानसदर्पणांत आप-ल्याच प्रतिबिंबाचें अवलोकन करित होती. पण आतां खरोखरच तिला दर्पणांतील छाया आपल्या समोर उभी आहे असें दिसूं लागलें. तीनें आपलें मस्तक वर करून

पाहिलें तों तिला आपल्याच मुखारविंदाची चोरी करून सुकुमारी कन्या सीता आपल्या नेत्रांत फुंक मारित तशीच उभी असलेली दृष्टीस पडली. मातेच्या मांडीवरून झटकन् खालीं उतरून आपल्या मनाशींच कांहीं पुटपुटत सीता तेथून पळून गेली.

पुत्र अद्यापि त्याचठिकाणीं होता. मातापित्याच्या नेत्रांत अश्रु भरलेले पाहून त्याच्याही नेत्रांत पाणी आलें. प्रतापानें तें पाहिलें व प्रेमपूर्वक तो ह्मणाला-"किरण! तूं मोठा झालास ह्मणजे तुला या अश्रूंचें कारण समजेल बरें! तूं आतां मल्लयुद्ध शिक जा."

पुत्राच्या कपोलभागाचें चुंबन घेऊन पद्मावती ह्मणाली- "जा बेटा! तूं आतां अमरदादापाशीं मल्लविद्येचें शिक्षण घे जा."

"प्रिये! असा आदर्श-करुणोत्पादक आदर्श-पाहून पाषाणाचेंही हृदय द्रवेल मग आपलें मन द्रवलें तर त्यांत काय आश्चर्य? हाय हाय! हें मी काय केलें?" असें ह्मणून प्रतापानें एक दीर्घ निःश्वास सोडला.

"प्राणनाथ! आपण जें कांहीं केलें तें योग्यच केलें. सुंदर राजमहालाचा त्याग करून पर्णकुटींत वास करणें, सुग्रास अन्नाचा त्याग करून फलमूलादिकांनीं क्षुधा निवारण करणें, सुंदर शय्यासेवनाचा परित्याग करून तृणशय्येवर निद्रासुख घेणें, बहुमूल्य वस्त्राभरणा ऐवजीं मलीन वस्त्रें परिधान करणें, मूल्यवान सुवर्णपात्रां ऐवजीं पत्रावळींवर

भोजन करणें व जननीजन्मभूमीच्या उद्धारार्थ असल्या कठीण व्रताचें पालन करणें हें सिसोदिया कुळांत जन्म घेतलेल्या राजाला सर्वथैव योग्यच आहे. नाथ! आपण एके दिवशीं ह्मणालां होतां कीं, देशाच्या कल्याणार्थ जे लोक आपले प्राण अर्पण करण्यास तयार होत नाहींत त्यांचा मनुष्यजन्म व्यर्थ व निरर्थक आहे. प्राणेश! असा उपदेश करूनही अजून आपण स्वतःच कर्तव्य पराङ्गमुख होण्याजोग्या वचनांचा उच्चार कसा करितां? पुत्रकन्येविषयीं त्याचप्रमाणें मजविषयींही आपली चिंता व्यर्थ आहे. एखादी अगदीं गरिब भिकारीणसुद्धां आपल्या पतिपरिवारासह रहाण्यांत मोठा आनंद मानते मग माझ्या मनांत विषाद तो कसला असणार? नित्य वनवास करणारे भिल्लादि लोक कसकसे प्रयत्न करून आपल्या स्त्रीपुत्रांचें पालन पोषण करितात. तेव्हां आपल्याला विशेष चिंता वहाण्याचें तरी काय कारण? ते काय मनुष्य नव्हेत? त्यांच्या मनांत सुखदुःखाचे तरंग उठत नाहींत काय? मग आमचे कष्ट पाहून आपला कर्तव्यपराङ्गमुख होण्यांत काय हेतू? आपलें व्रत हें कांहीं बाह्यबंधनच नाहीं तर तें एक प्रकारचें अंतर्बंधनही आहे. मी कोण, पुत्र कोण अगर कन्या तरी कोण? मोंगलांच्या अत्याचाररूपी बंधनांतून जन्मभूमीचा उद्धार करणें हेंच आपलें मुख्य कर्तव्य व मुख्य व्रत आहे. या महत्कार्याचा भार जगदीशानें आपल्या शिरावर ठेविला

आहे. या महायज्ञांत यदाकदाचित् आम्हां सर्वांची प्राणाहुतिही देण्याचा प्रसंग आला तरीसुद्धां तसें करण्यास आपण केव्हांही मागें पुढें पाहूं नका. प्राणपति! आपण आतां जाऊन सर्व सामंतसरदारादि शूरवीरांनां उत्तेजित करा. आज नाहीं उद्यां अगर चार दिवसांनीं तरीं युद्ध हें निश्चित आहेच; गृहभेदी शक्तिसिंह भावोजी मोंगलांस जाऊन मिळाले आहेत तेव्हां युद्ध आमच्या नशीबीं आहेच आहे, मग व्यर्थ विलंब तरी काय म्हणून? गृहकृत्यांचा सर्व भार माझ्या शिरावर आहे. आपणाला त्याची लेशमात्रही चिन्ता नको. ”

पद्मावती राणीनें असें उत्साहजनक भाषण करून प्रतापाचा खचलेला उत्साह पुनर्जागृत केला. व तिनें आपल्या पतीला त्याच्या वीर कृत्यांची आठवण करून दिली. प्रतापाच्या मनांत महाधन्यता भासूं लागली व तो अत्यानंदानें पद्मावतीला म्हणाला—“ प्राणेश्वरी! मी आज खरोखर कृतार्थ झालों. माझ्या मनांतील महानहेतुरूप कुसुमाला विकसित करण्यास माझीच प्रतिमा धारण करून तूं माझ्या कक्षेंत उभी आहेस हें मला आजच कळलें. जगदीश तुला सुखी व आनंदी ठेवो! ”

---



## षष्ठम परिच्छेद.

# अम्बराधिपतीचा अपमान.

" रक्तत्वं कमलानां सत्पुरुषाणां परोपकारित्वम् ।
असतांच निर्दयत्वं स्वभावसिद्धं त्रिषु नियतम् ॥

भर्तृहरिः



शिर्वी 'विजय' शब्द धारण करून जन्मास आलेला मोंगल सम्राट प्रतापशाली अकबर एकामागून एक असे सर्व देश पादाक्रांत करूं लागला. अनुक्रमानें त्यानें सर्व राजांना आपल्या पक्षांत सामील करून घेतलें अंबर, बिकानेर, व मारवाड इत्यादि देशचे राजे स्वतंत्रतेला केव्हांच तिलांजलि देऊन मोंगलचरणीं आपलें जीवनसर्वस्व अर्पण करून स्वस्थ बसले होते. आज अजमिराधिपतीनेंही आपली जात, कुळ, मानमर्यादा इत्यादिकांचा परित्याग करून त्या परतंत्रतापरायण राजाचें अनुकरण केलें.

क्षत्रियांचें हें अधम कृत्य पाहून प्रतापाच्या मनांत असह्य दुःख होऊं लागलें. त्यानें प्रतिज्ञा केली कीं, सिसोदिया कुळाचा या जगांतून कायमचा लोप होणार असला तरी मी तें मोठ्या आनंदानें पत्करीन पण आचार-भ्रष्ट मुसलमानाशीं विवाहसंबंध करणाऱ्या स्वदेशद्रोह्यांशीं यापुढें केव्हांही कोणत्याही प्रकारें अन्नसंबंध किंवा शरीर-

संबंध ठेवणार नाहीं. यामुळें कदाचित् सिसोदिया कुळांत जन्मणाऱ्या पुत्र कन्यादिकांस आजन्म अविवाहित रहाणें भाग पडलें तरी बेहत्तर; पण सर्व या प्रतिज्ञेचें अवश्य परिपालन करतील; जातिभ्रष्ट कधींही होणार नाहींत.

इतक्यांत एक अद्भूत घटना घडून आली व त्यामुळें एक अकल्पित संकट महाराण्यावर येऊन कोसळलें. अगर त्यामुळें प्रतापाचें शौर्य जगाच्या चांगलेंच निदर्शनास आलें असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

अंबराधिपति भगवानदासाचा इतिहासप्रसिद्ध पुत्र व अकबर सम्राटाचासंबंधी ( अमात्य ) मानसिंह सोलापुरांत विजय संपादन करून अकबराची विजय पताका हवेंत फडका: वित मोठ्या धामधुमीनें पुन्हां दिल्लीस चालला होता. इतक्यांत एकवार प्रतापाच्या पर्णकुटिकेंत जाऊन त्याच्या आतिथ्यानंदाचा उपभोग घ्यावा व नंतर पुढें जावें असा मानसिंहाच्या मनांत एकाएकीं विचार येऊन त्यानें त्या प्रमाणें प्रतापसिंहाकडे आपला दूत पाठविला.

मनांत केवढाही वैरभाव असला तरी शिष्टाचारानुसार जें कर्तव्य आहे तें करण्याचा प्रतापसिंहानें निश्चय केला. मानसिंहाच्या दूतानें येऊन प्रतापसिंहाची प्रार्थना केली कीं, अम्बरराज मानसिंह आपण होऊनच आपलें आतिथ्य स्वीकारण्याकरितां येथें येत आहेत.

“ माझ्यावर त्यांचा हा मोठा अनुग्रहच म्हणायचा. आम्हीं आतिथ्याची सर्व तयारी करितों. त्यानीं खुशाल

यावें." असें प्रतापसिंहानें विनीतभावानें उत्तर दिलें. व दूत निघून गेला.

प्रतापाच्या नूतन राजधानींत उदयसागराच्या तीरीं अंबराधिपतीच्या आतिथ्याची मोठ्या धामधूमीनें तयारी सुरूं झाली. एकतर असें कीं, मानसिंहासारखा राज-अतिथी व दुसरें स्वेच्छेनें आलेला, तशांत मेवाडच्या चिरशत्रूचा अर्थात अकबर सम्राटाचा मुख्य अमात्य. एतदर्थ प्रतापसिंहानें आपल्या अनुचरगणांस फार चांगली तयारी करण्याची आज्ञा केली. व्रतधारी राजा प्रतापसिंह स्वतः तरुपत्रांवर कंदमूळांचाच आहार करीत असे तरी पण मानसिंहासारख्या अतिथीच्या सत्कारासाठीं त्यानें सर्वप्रकारचे पदार्थ सिद्ध करविले व भोजनप्रसंगीं सुवर्णादिकांचीं बहुमूल्य पात्रें वापरण्याची आज्ञा केली. महाराण्याचा जेष्ठ पुत्र अमरसिंह याच्या शिरावर या आदरातिथ्याचा सर्व भार सोंपविण्यांत आला होता.

उदयसागरच्या तीरावर एक भव्य मंडप उभारण्यांत आला. हळुहळू सर्व भोज्य पदार्थ त्या ठिकाणीं आणून ठेवण्यांत आले मानसिंहही येऊन दाखल झाला. अमरसिंह मोठ्या अदबीनें अतिथीचें आदरातिथ्य करूं लागला. कुमाराचें नम्र वर्तन व विवेक पाहून मानसिंह मनांत फार संतुष्ट होत्साता स्थानापन्न झाला. सर्व प्रकारच्या भोजनाची अपूर्व सिद्धता पाहून व आश्चर्यचकित होऊन मानसिंह हंसत हंसत म्हणाला- " एवढ्या अल्पावकाशांत

इतकी उत्कृष्ट भोजन सिद्धता कशी करतां आली. याचेंच मला राहून राहून आश्चर्य वाटत आहे. आतां इतक्या या पदार्थांतून कोणता खावा व कोणता खाऊं नये याचाच मला मोठा विचार पडला आहे, तुह्मीं घेतलेल्या या अपूर्व श्रमाबद्दल मीं तुमचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत."

"आपल्या योग्यतेनुरुप थोडीसुद्धां तयारी करितां आली नाहीं ह्मणून आह्मांला फार वाईट वाटतें तरी त्याबद्दल क्षमा असावी" असें अमरसिंहानें नम्रतापूर्वक उत्तर दिलें.

मानसिंह नेत्र मिटून, मनांत इष्ट देवतेचें ध्यान करून व तिच्या नांवानें थोडें अन्न भूमीवर ठेवून अन्नग्रहणास तयार झाला. हातीं घेतलेला ग्रास मुखांत घालण्याच्या बेतांत होता इतक्यांत त्याला कसलेंसें स्मरण झालें व त्यामुळें तो अमरसिंहास ह्मणाला- "वाः हें फार चांगलें दिसतें? महाराणाजी येथें कसे दिसत नाहींत?" असें ह्मणून तो अमरसिंहाचें मुखावलोकन करूं लागला.

इतक्यांत महाराणाजींच्या एका सरदारानें उत्तर दिलें- "आपण भोजनास सुरवात करावी. महाराणाजी इतक्यांत येथें येऊन पोंहचतील."

"हा खरोखर विलक्षण प्रकार म्हटला पाहिजे?" असे मानसिंहानें उद्गार काढिले व त्या नंतर तो अमरसिंहास उद्देशून ह्मणाला-"कुमार! आपले तीर्थरुप कुठें आहेत? त्यांना बोलावून आणा. त्यांच्या पंक्तिचा-लाभ मिळावा.

असा माझा मनोभाव आहे. " मानसिंहाच्या हातांतील ग्रास पुन्हां पात्रांत पडला. व तो मोठ्या-उत्कंठेनें स्तब्ध बसून राहिला.

अमरसिंह कांहींही न बोलतां अद्यापि भूमीकडेच दृष्टि लावून उभा होता.

" कुमार ! तुह्मीं उत्तर देत नाहीं याचें कारण काय आपले वडिल अद्यापि कसे आले नाहींत ? अतिथीचा अपमान करणें- "

" मानसिंहजी ! आपण असे कोपायमान होऊं नका. महाराणाजींचें आज मस्तक फार दुखत असल्यामुळें ते यावेळीं आपल्यासह भोजन करण्यास असमर्थ आहेत. या आकस्मिक दुःखाबद्दल त्यांच्या मनांत फार खेद होत आहे. पण निरुपाय आहे. काय करणार ? " मानसिंह रागावलेला पाहून त्याला शांत करण्याच्या हेतूनें अमरसिंहानें हें भाषण केलें.

वृष्टि होण्यापूर्वीं आकाश ज्याप्रमाणें मेघाच्छादित होऊन जातें, त्याप्रमाणें मानसिंहाचें मुखमंडल अनेक विचारांनी व्याप्त होऊन गेलें. तो गंभीर स्वरानें ह्मणाला- " कुमार तुह्मीं अद्यापि बालक आहां. तुह्मीं कोणाला फसवूं पहात आहां हें तुमच्या ध्यानीं आहे काय ? इतकी साधारण गोष्ट माझ्या ध्यानांत-पण जाऊंदे. तुह्मीं स्वतः महाराणाजींकडे जाऊन त्यांना कळवा कीं, आपल्या मस्तक व्यथेचें कारण मी समजून चुकलों आहें. जें होणार हो

तें होऊन गेलें-मग तें जाणूनबुजून होवो अगर चुकीनें होवो. ती गोष्ट निराळी. तें सुधारण्यास आतां उपाय नाहीं – कदाचित् असला तर त्यानींच स्वतः येऊन–"

मानसिंहाच्या भाषणसमाप्तिची वाट न पहातां व त्याला कांहींही उत्तर न देतां अमरसिंहानें जवळ उभा असलेल्या एका सरदाराला नेत्रसंकेत केला. तत्काळ तो सरदार तेथून चालता झाला व लागलाच परत येऊन ह्मणाला–खरोखरच महाराणाजींचें मस्तक फार दुखत आहे व त्यांच्या अंगीं उठण्याचेंही सामर्थ्य दिसत नाहीं." हा सरदाराचे तोंडचा निरोप मानसिंहास पटला नाहीं. तेव्हां तो अमरसिंहास चडफडत ह्मणाला–" कुमार!, आतां तुह्मीं स्वतःच महाराणाजीकडे जाऊन त्यांना सर्व वृत्तांत कळवा. व त्यांना सांगा कीं, तुह्माला आमच्या पंक्तीस भोजन केलेंच पाहिजे. जर तुह्मीं आमच्यासह भोजन केलें नाहीं तर दुसरा कोण रजपूत आमच्याशीं-समजलें का? ही सर्व हकिगत तुह्मीं राणाजींना सांगू शकालना?"

"होय" असें ह्मणून अमरसिंह तेथून निघून गेला.

इतक्यांत वरील सरदार ह्मणाला-" महाराज! माझें सांगणें आपल्याला असत्य भासून आपण कुमारजींना महाराणाजींकडे पाठविलें हें चांगलेंच केलें. आतां कुमार येऊन काय सांगतील तें ऐकल्यावर खऱ्याखोट्याचा निर्णय आपोआप कळून येईल."

या सरदारावर मानसिंहाची प्रथमच वक्र दृष्टि झाली होती. त्यामुळें त्याच्या या भाषणानें मानसिंहास फार चीड आली व मोठ्या कोपानें तो ह्मणाला– अरे ! निद्रित मनुष्याला कोणीही जागृत करूं शकेल. पण निद्रेचें मिष करून निजलेल्याला जागृत करण्याचें कार्य महा बिकट असतें. तुझ्या महाराण्यानें मस्तकशूलाचें निमित्त काढून आपल्या सत्यवादित्वाचा व व्रतधारकत्वाचा मला हा चांगलाच परिचय करून दिला ह्मणावयाचा. ”

“ हं व्रतधारकत्वाचा परिचय ? ” असे उद्गार काढित महाराणा प्रतापसिंह आपले मंत्रीं व इतर सरदार यांसह त्याठिकाणीं येऊन दाखल झाला व मानसिंहास संबोधून गंभीर स्वरानें ह्मणाला—“ व्रतधाऱ्याचें आपण असें कोणतें अधर्माचरण पाहिलें ? एवढा वेळ खरें कारण लपवून मस्तकशूलाचें निमित्य सांगून माझ्या पुत्राच्या हस्तें आपलें आदरातिथ्य केलें हाच माझा अक्षम्य अपराध काय ? अंबरराज ! आपण आपल्या वडिलांपासूनच आपलें सर्वस्व यवनांच्या चरणीं अर्पण करून चुकलां आहां तेव्हां आपल्याला समाजनीतिची माहिती नसावी हें स्वाभाविक आहे. कोणीही आर्य कारणाविना दुसऱ्याला कदापिही दुखवित नसतो. विशेषतः जो कोणी अतिथी आपण होऊन आपल्याघरीं आलेला असतो त्याला सर्व प्रकारें संतुष्ट करणें हा आर्यांचा परम धर्म आहे. अंबरराज ! याच कारणामुळें मी अद्यापि आपणास मस्तक-

व्यथेचें निमित्त दर्शविलें. आतां मी याठिकाणीं हजर. नंसण्याचें योग्य कारण काय हें आपल्या लक्षांत आलें असेलच.

यावर मानसिंहानें अभिमानपूर्वक उत्तर दिलें दिल्लीश्वराचा उजवा हात जो अंबराधिपति मानसिंह त्याला सत्य कारण ऐकण्याची फार इच्छा आहे. मेवाडाधिपतीच्या मुखांतून कधींकाळींही असत्यवचन बाहेर पडण्याचा संभव नाहीं."

प्रतापानें कारण दर्शविण्यास प्रारंभ केला– "तर मग मोठ्या आनंदानें श्रवण करा. ज्या रजपूतांनीं क्षात्र धर्माचा त्याग केला, आत्ममर्यादा व वंशाभिमानास विसरून जाऊन केवळ द्रव्य व अधिकार लालसेनेंच आपल्या भगिनी व कन्या यवनचरणीं अर्पण करून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष त्यांच्याशीं भोजन केलें, त्या भ्रष्ट रजपूतांसह पवित्र सिसोदिया कुळांत जन्मलेला हा प्रतापसिंह कधींही भोजन करून भ्रष्ट होणार नाहीं. एखाद्या जातिबहिष्कृतानें ज्ञातिपंक्तित बसून भोजन करण्याची इच्छा करणें यांत व या आपल्या हटवादित्वांत भेद तो काय ? आपला हा मिथ्या हट्ट आहे."

"महाराज ! पुष्कळ झालें. यापेक्षां अधिक ऐकण्याची आतां इच्छा नाहीं." असें म्हणून विद्युद्वेगानें मानसिंह पात्रावरून उठला. अपमानाग्नि व अभिमानाग्नि यांनीं त्याचें समस्त शरीर दग्ध होऊं लागलें. मुखमंडळ रक्तवर्ण

झालें; तथापि त्यावेळीं विलक्षण आत्मसंयमन करून त्यानें आपल्या मनांतील कोप व्यक्त केला नाहीं.

भोजनासाठीं आसनावर बसल्यानंतर इष्टदेवतेच्या नांवानें मानसिंहानें जें अन्न भूमीवर ठेविलें होतें तें त्यानें महाभक्तिभावानें उचलून घेऊन आपल्या पगडींत ठेवून दिलें. व त्यानंतर तो मनांतल्या मनांत ह्मणाला— " जें काय झालें तें बऱ्यासाठीं झालें. माझा अपमान मी माझ्या हातानींच करून घेतला आहे तेव्हां त्यांत दुसऱ्याचा काय दोष? प्रतापानें कांहीं आमंत्रण करून मला बोलाविलें नव्हतें. माझ्या अपकृत्याचें मला यथायोग्य प्रायश्चित मिळालें तेव्हां आतां निरर्थक कोप व्यक्त करण्यांत तरी काय अर्थ? " याप्रमाणें विचार केल्यावर तो प्रतापसिंहास संबोधून ह्मणाला—" महाराणाजी! आपणाला योग्य वाटलें तें आपण केलें तेव्हां आपल्या विरुद्ध मला कांहीं बोलायाचें नांहीं. तरीपण एवढें मात्र खूप ध्यानांत असूद्या कीं आपला लौकिक व मानमर्यादा यांचें चिरकाल रक्षण व्हावें एवढ्याचकरितां मी यवनांना शरण गेलों आणि अद्यापिही त्याचस्थितीला चिकटून आहें. "

तेजस्वी व स्पष्ट वक्त्या प्रतापानें त्यावर उत्तर दिलें— " ज्या मार्गाचा आपण अवलंब केला तो मार्ग फारच प्रशंसनीय आहे! अशी ही उदार नीति आपण कोणापाशीं शिकलां? आमच्या लौकिकाचें व मानमर्यादेचें चिरकाल रक्षण व्हावें एवढ्याच करितां आपण आपल्या

बहिणी व मुली यवनचरणीं अर्पण केल्या. असाच कीं नाहीं आपल्या भाषणाचा भावार्थ ? "

या भाषणानें मानसिंहाचा कोप अनिवार्य झाला. क्षुब्ध होऊन तो तत्काळ अश्वारूढ झाला व प्रतापसिंहा कडे एक तीव्र कटाक्ष फेंकून ह्मणाला-" महाराणाजी आपल्या या कृत्याचें योग्य प्रायश्चित आपल्याला सत्वर भोगावें लागेल हें खूप ध्यानांत ठेवा. मी कदाचित् खरा रजपूत नसेन पण आपल्याला जर योग्य प्रायश्चित दिलें नाहीं तर मात्र माझें-नांव मानसिंह नव्हे ! "

सिंहनाद करून प्रतापानें याचें उत्तर दिलें-" अस्सल वीर आपल्या मुखानें आपल्या पराक्रमाचें वर्णन करिंत नसतात. भविष्यकाळीं काय होणार असेल तें होईल. पण यावेळीं तरी मला आपल्याभाषणानें मोठा संतोष झाला हें निःसंशय आहे. युद्धक्षेत्रीं ज्यादिवशीं आपली गांठ पडेल तो दिवस मी मोठा सुदीन समजेन. "

यावर प्रतापसिंहाचा एक सरदार विनोदानें ह्मणाला- युद्धक्षेत्रांत आपल्या भगिनी सुतालाही बरोबर घेऊन या. तो अकबरा बरोबर असल्याशिवाय आपल्या शौर्याचा पडावा तसा प्रकाश पडणें शक्य नाहीं. "

सरदाराच्या या भाषणानें अट्टाहासाची कमाल झाली. क्षणाचाही विलंब न करितां मानसिंहानें आपल्या अश्वाला चाबुकाचा प्रहार करून आपल्या कोपाचें फळ त्या

निचाऱ्या तिर्याक् प्राण्याला चाखायला लाविलें व वायुगतीनें तो तेथून निघून गेला.

नंतर प्रतापसिंहानें आपल्या अनुचरांना अशी आज्ञा केली कीं, " सत्वर तें स्थान शुद्ध करून टाका व तें सर्व अन्न श्वानादि प्राण्यांना खायला घाला. " त्यानंतर तो अमरसिंहास ह्मणाला " अमर ! हीं सर्व वस्त्राभरणें काढून सत्वर स्नान करून शुद्ध हो. चल. मी सुद्धां स्नानाला निघालों. "

प्रतापसिंहाच्या सर्व माणसांनीं—अमात्य, सरदार व अनुचरादि जे जे भोजनमंडपांत हजर होते त्या सर्वांनींच नव्हे तर ज्यांनीं केवळ दृष्टीनेंसुद्धां मानसिंहास पाहिलें होतें त्या सर्वांनींही--स्नान करून आपलीं शरिरें शुद्ध केलीं व त्यानंतर पवित्र गंगाजलाच्या सिंचनानें तें मंडपस्थानही शुद्ध करण्यांत आलें

अशाप्रकारें अपमान सहन करून अंबरराज मानसिंह दिल्लींत दिल्लीश्वर अकबर सम्राटाकडे जाऊन पोंहोंचला. व प्रतापाच्या घरीं झालेल्या सर्व घटनेचा इत्यंभूत वृत्तांत त्यानें कांहीं कमजास्त फेरफार करून अकबराला सांगितला; हें वाचकांनीं ताडलेंच असेल. कारण ही गोष्ट सहज ध्यानांत येण्यासारखी आहे. असो. मानसिंहाच्या या अपमानाचा परिणाम काय झाला हें पुढील परिच्छेदांत समजून येईल.

# सप्तम परिच्छेद.

## युद्ध निश्चय.

" कबहू कलह न कीजिये; अपने घरमें आप;
घर फूटे घर जात है; होत पुनः संताप "



तुरबुद्धि चंडप्रतापी महाराणा प्रतापसिंहानें आजपर्यंत अकबरापुढें आपलें मस्तक नम्र केलें नव्हतें. दुसरें असें कीं त्यानें आपली स्वतंत्रता पूर्वीप्रमाणेंच राखिली होती. इतक्यांत त्यानें मानसिंहाचा अपमान केला. झालें! अग्नींत घृताहूती केल्याप्रमाणें झालें. अकबराच्या कोपास पार राहिला नाहीं. मानसिंहाचा अपमान ह्मणजे आपला स्वतःचाच अपमान असें बादशहानें बोलून दाखविलें कोपाग्नीनें त्याचे नेत्र खदिरांगारासारखे रक्तवर्ण झाले. तो ह्मणाला—" युद्धाची तयारी करा. दुष्ट प्रतापसिंहाला त्याच्या पापाचें योग्य प्रायश्चित मिळालेंच पाहिजे ! "

थोड्या वेळानंतर अकबर शांत झाला. तो मन्हां ह्मणाला—" मानसिंह ! तुह्मीं माझा उजवा हात. तुमच्या अपमानानें माझ्या हृदयांत भयंकर कोपाग्नि प्रज्वलित झाला आहे व या अग्नीनें थोड्याच दिवसांत मी प्रतापसिंहाला त्याच्या समस्त सैनिकांसह जाळून भस्म करून

टाकणार. माझ्या पुढें एवढा अहंकार व एवढा अभिमांन !! "

त्यानंतर तो आपल्या मनाशीं विचार करूं लागला— " एकटा एक प्रतापसिंहच माझी नीति छिन्नभिन्न करणारा आहे. इतक्या दिवसांच्या सतत प्रयत्नानें मी ही मुसलमानी राज्यरूपी इमारत उभारिली. हिंदुमुसलमानांना एक करण्याच्या हेतूनें रजपूतांच्या कन्या मुसलमानांच्या घरांत आणण्याचा उद्योग तडीस नेला. जातिभेदाचा नाश करण्यासाठीं मुसलमानांच्या हातचें अन्न हिंदूंच्या मुखीं घातलें. व माझें राज्य चिरस्थायी करण्याचा प्रयत्न केला. पण हे सर्व प्रयत्न आज प्रतापसिंहाच्या एकच वेळेच्या पद–प्रहारानें धुळींत मिळाले. कोणत्याना कोणत्यातरी उपायानें त्याच्या पापाचें योग्य शासन केल्याविना चित्ताचें समाधान अगर सांत्वन होणार नाहीं !

लागलेंच सम्राटाज्ञेनें प्रतापसिंहाच्या कित्येक गृहभेदी कुलांगारांना त्याठिकाणीं बोलावण्यांत आलें. प्रथम शक्तिसिंह आला. नंतर सागरजीचें आगमन झालें. त्यानंतर धर्मभ्रष्ट महब्बतखानाच्या आगमनानें त्या प्रसंगास विशेष शोभा आली. अशाप्रकारें सर्व देशद्रोही कुलांगार रजपूत एकामागून एक त्यास्थळीं येऊन दाखल झाले. वास्तविकपणें पहातां यांच्याच बळावर अकबरानें मुसलमानी साम्राज्यसदन उभारण्याची हिम्मत केली होती.

अकबर शक्तिसिंहास उद्देशून म्हणाला—" शक्तिसिंह !

थोड्याच दिवसांत मी तुझ्या दांभिक, अभिमानी बन्धूस शासन करून तुझी मर्मवेदना दूर करीन. अगदीं काळजी करूं नको. "

अशाप्रकारें सर्वांशीं गोड गोड भाषण करून कार्यचतुर अकबरानें सर्वांचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेतलीं. कोणाकोणाच्या काय काय मनोवेदना आहेत व प्रतापसिंहाविरुद्ध कोण कोण काय काय करूं शकेल हें तो पूर्णपणें जाणून होता. बुद्धिमान पुरुषांचें हेंच चातुर्य असतें. मनुष्य प्रकृति सर्वत्र समान तत्वांची बनलेली असते. तेव्हां अकबराच्या या स्वभावाबद्दल दोष काय ह्मणून द्यावा.

तुह्मीं स्वतःच आपल्या गृहास आग लावण्यास उद्युक्त झाल्यास त्यांत तुमच्या वैऱ्यांस कां बरें आनंद होणार नाहीं. ?

बादशहाच्या आश्वासनानें चढून गेलेला शक्तिसिंह, अकबर सम्राटास ह्मणाला—" जहांपनाह ! प्रतापसिंहाच्या नाशासाठीं आपणांस फारच मोठें सैन्य तयार करावें लागेल कारण कीं अजूनही प्रतापाजवळ . वीस बावीस हजार सैनिकगण तयार आहे. तशांत्—"

" काय ? तूं काय ह्मणालास ? प्रतापापाशीं अजून बावीस हजार सैन्य ? " असा अकबरानें शक्तिसिंहास मध्येंच प्रश्न केला.

" होय सरकार ! रजपूत, सामंत, सरदार व भिल्ल लोक मिळून इतकें सैन्य अवश्य असलेंच पाहिजे. तशांत

रजपूत वीर महापराक्रमी व मृत्युला न भिणारे असतात—खरे खरे रणशूर असतात. भिल्ललोक महाचपळ, उत्तम धनुर्वेत्ते व पर्वत प्रदेशांत मोठ्या दक्षतेनें युद्ध करणारे असतात. पर्वताच्या खिंडींत व गुहेंत ते इतक्या चलाखीनें छपून बसतात कीं तेथें त्यांना शोधून काढण्याचें काम फारच बिकट असतें. तीरंदाजींत त्यांची बरोबरी करण्याचें काम कोणाच्यानेंही होणार नाहीं. प्रसंगीं ठिकठिकाणीं लहान लहान दगडांच्या राशी करून त्यांच्या आड बसून ते लढत असतात. व शत्रूंची दाणादाण उडवितात अशा लोकांची प्रतापाला पूर्ण मदत आहे. ” असें बोलून शक्तिसिंहानें गूहरहस्य उघडें केलें.

शक्तिसिंहाचें भाषण अकबर ध्यानपूर्वक ऐकत होता. शक्तिसिंहाचें ह्मणणें अक्षरशः खरें आहे. अशी त्याची खात्री झाली. त्यामुळें प्रतापसिंहाला पराजित करण्यास कोणत्या उपायांची योजना करावी हें शक्तिसिंहापासूनच जाणून घ्यावें अशा हेतूनें अकबर त्याला ह्मणाला—“ शक्तिसिंह ! तूं आजवर मला अनेक गुप्त गोष्टी सांगितल्या आहेस व त्यांबद्दल मी तुझा आभारी आहे. आतां आपण प्रथम प्रस्तुत कार्यसिद्धीचा विचार करूं. कार्यसिद्धी झाल्यावर तुला तुझ्या श्रमांचा योग्य मोबदला मिळेल. ”

“ जहांपनाहची कृपा हीच मी अमूल्य देणगी समजतों. पण मी जी गोष्ट सांगितली ती ध्यानांत ठेवलीच पाहिजे. प्रतिपक्षाकडे पराक्रमी रजपूत सैन्य व पर्वत युद्ध-

प्रवीण वीर्यवंती भिल्लसेना आहे. तेव्हां दोघांनाही जिंकण्यास आपणांस कांहीं निराळीच युक्ति लढविली पाहिजे" शक्तिसिंह ह्मणाला.

त्याच्या भाषणानें अकबर मनांतल्या मनांत फार आनंदित होऊन ह्मणाला—"तुझी सल्ला सर्वथैव मान्य आहे. पण काय युक्ति योजावी हें सूचीव ह्मणजे मी तावडतोब तशी व्यवस्था करून टाकितों. जें काय सांगायचें असेल तें सत्वर सांग कारण आतां दीर्घकाळपर्यंत विचार करण्यास अवधी राहिलेला नाहीं."

"माही तेंच सांगण्याच्या विचारांत होतों; परंतु हुजूरच्या हुकुमाची वाट पहात होतों. रजपूतांचें सर्व बळ काय तें तरवार, भाला व बरची यांवर अवलंबून. केव्हां केव्हां ते धनुष्यबाणांचाही उपयोग करितात. भिल्लांच्या खास अस्त्राचें नांव मी आपल्याला सांगून चुकलोंच आहे. तेव्हां या युद्धांत आपणाला कांहीं निराळ्याप्रकारच्या अस्त्रांचा उपयोग केला पाहिजे." असा शक्तिसिंहानें स्वगृहनाशाचा उपाय सुचविला.

"पण असें कोणतें अस्त्र तुझ्या ध्यानीं आहे?." अकबरानें पुन्हां प्रश्न केला.

"हो! तोफांच्या व बंदुकींच्या गोळ्यांचा वर्षाव! शेंकडों प्रकारच्या शस्त्रांनीं जें कार्य होणें अशक्य असतें तें तोफेच्या एकाच गोळ्यानें होतें. क्षत्रिय सैन्यांतील सैनिक कितीही पराक्रमी असले व भिल्ल आपल्या धनुर्विद्येंत कितीही पारंगत असले; तरी तोफांच्या व बंदुकींच्या माऱ्यापुढें

त्यांची टिकाव न लागून क्षणमात्रांत संहार होऊन जाईल. यांत लेशमात्रही शंका नाहीं. यासाठींच सरकार! माझें असें म्हणणें आहे कीं, जितक्या तोफा व बंदुका आपणांस मिळवितां येतील तितक्या आपण मिळविण्याच्या खट- पटीस लागावें " गृहभेदकानें स्वगृहभेदाचा पुरा पुरा उपाय सूचविला.

शक्तिसिंहानें सुचविलेला उपाय ऐकून अकबराच्या मनांत केवढा व किती आनंद झाला असेल याची कल्पना वाचकांनींच करावी.

अनुक्रमानें सर्व कुलांगार रजपूतांची सल्ला ऐकून घेऊन युद्धप्रसंगीं त्यांच्यापैकीं कोणाला आपल्या सेनापतीबरोबर पाठवावें याचा अकबरानें आपल्या मनाशीं घाट घातला व तो मनुष्य म्हणजे कैलासवासी महाराणा उदयसिंहाचा एक पौत्र-सागरजींचा धर्मभ्रष्ट पुत्र महब्बतखान होय!

साहस, वीर्य, बाहूबल व बुद्धिमत्ता, या गुणांनीं मह- ब्बतखान बादशहाचा उजवा हात होता व स्वज्ञातिद्रो- हांत त्याकाळीं त्याची तरी निदान अखिल भारतवर्षांत दुसरा कोणी बरोबरी करणारा नव्हता. युद्धप्रसंगीं अशा मनुष्याची कोणत्या पदावर योजना करावी याचा अक- बरास मोठा विचार पडला. शेवटीं, ज्यावेळीं आपल्या पुत्रास—सेलिमास-सेनापतीचें पद द्यावें असा त्यानें विचार ठरविला त्यावेळींच या अनुपम रत्नाला त्याच्या- बरोबर पाठविण्याचा त्याचा निश्चय ठरला. कारण कीं, ज्या ठिकाणीं पुत्राच्या शिरावर सर्व भार संपविण्यांत आला

त्याठिकाणीं महब्बतखानासारखा सल्लामसलतगार दुसरा कोण मिळणार ? हें नररत्न जर अकबराला लाभलें नसतें तर त्याची जी एवढी मोठी कीर्ति झाली ती झाली असती कीं काय याचीच मोठी शंका आहे.

स्वदेशद्रोही नीच प्राण्यानों ! स्वतःचें अल्पसें हित साधण्याच्या लालसेनें कर्तव्यविन्मुख होऊन, स्वज्ञातीला पदप्रहारानें धुळीस मिळवून तुम्ही मोंगलांचे दास बनून गेलां तेव्हां तुम्हांला शतशः धिक्कार असो ! मानसिंह ! तूं एकटा जरी मेवाडच्या पक्षास असतास तरीसुद्धां खरोखर विधिनियमाचाही भंग झाला असता !

थोड्या दिवसांत युद्धाची तयारी झाली व पुढीलप्रमाणें व्यवस्था करण्यांत आली. सेलिमला सेनापति नेमिलें. महब्बतखान त्याचा अंगरक्षक व मानसिंह सल्लागार. यांशिवाय शक्तिसिंह व तशाच दुसऱ्याही कांहीं सरदारांस युद्धास जाऊन योग्यतेनुरूप कार्य बजाविण्याची आज्ञा झाली.

अगणित मोंगल सैन्य व विपुल युद्धसामुग्री घेऊन निश्चित दिवशीं सेलिम युद्धासाठीं मेवाडवर स्वारी करण्यास निघाला. अश्वांचें खिंकाळणें, हत्तींचे चीं चीं शब्द व मुसलमान सैनिकांचा ‘दीन दीन’ यांहींकरून दश दिशा कंपायमान होत आहेत कीं काय असा भास होऊं लागला.

हळदीघाट नामक एका दुर्गम गिरिपथांत शूरवीर व रणधीर रजपूतांच्या भाग्य परिक्षेला आरंभ झाला.

# अष्टम परिच्छेद.

## हळदीघाटचें युद्ध.



तु मूल युद्धविहार भूमि हळदीघाट हें इतिहास-प्रसिद्ध स्थान असून याचठिकाणीं सहस्रावधि रणोत्साही क्षत्रियवीरांनीं स्वदेश स्वातंत्र्याच्या रक्षणार्थ आपल्या प्रियतम प्राणांची आहुति दिली. हीच ती वीरजातीची पुण्यक्षेत्र भूमि! ज्या स्थलीं चौदा हजार क्षत्रियवीरांनीं असाधारण पराक्रम गाजवून स्वदेशोद्धारार्थ देहत्याग केला तीचवीररक्तवाहिनी धरा ही! काळ आपल्या चंचलगतीनें निघून गेला पण त्याची स्मृति अद्यापि मनांत विक्षोभ उत्पन्न करते. याच स्मृतीला मानसीं अग्रस्थान देऊन अनेक सहृदय कवीनीं व स्वदशवत्सल इतिहासकारांनीं काव्य व इतिहासाची रचना करून ही स्मृति जगांत चिरस्थायिनी करून ठेविली आहे.

हळदीघाटच्या दुर्गम गिरिपथांत मोगलांचें अगणित सैन्य येऊन दाखल झालें होतें. या गिरिपथाच्या एका बाजूस कमलमीरचा दुर्ग व दुसऱ्या बाजूस मीरपूरचा उच्च-शैलशृंग विभाग येऊन राहिला आहे. अरवली पर्वताची विस्तीर्ण गिरिश्रेणि फार दूरवर विस्तारली आहे. त्याच्या आसपास चोहोंबाजूस निबिड अरण्यें माजलीं आहेत. हें स्थान इतकें कांहीं रमणीय व मनोहर आहे कीं, त्याला

निसर्गदेवीचें मूळ जन्मस्थान ह्मणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. हें पर्वतमय दुर्गमस्थान हळदीघाट या नांवानें संबोधिलें जातें. रजपूतवीरांच्या अलौकिक पराक्रम पुण्यानें हें स्थान चिरस्मरणीय होऊन राहिलें आहे.

ज्या दिवशीं नूतन राजधानींतील भोजन मंडपांत मानसिंहाचा अपमान झाला, त्याचदिवशीं प्रतापानें युद्धनिश्चय करून ठावला होता. आपल्या सर्व सामंत सरदारांना बोलावून आणून त्यानें युद्धासाठीं ज्या क्षणीं आवश्यकता भासेल त्याक्षणीं सर्वांनीं तयार असावें अशी त्यांस आज्ञा केली.

पर्वतवासी भिल्लांना प्रतापसिंहानें हीच आज्ञा केली होती. भिल्ललोक प्रतापाला केवळ परमेश्वरासमान मानित असत. प्रतापसिंहाची आज्ञा मिळतांच सर्व भिल्ल आनंदानें नृत्य करूं लागले व गंभीर स्वरानें प्रतापसिंहाचा जयजयकार करूं लागले.

प्रतापानें निर्विकार चित्तानें त्या सरल सत्यहृदयी व निष्कपट भिल्लांना आलिंगन दिलें. व ते साधेभोळे लोक आपल्या अंगाला देवाचा स्पर्श झाल्याप्रमाणें मानून स्वतःला धन्य व कृतार्थ समजूं लागले.

एकेदिवशीं दूतानें अशी बातमी आणिली कीं अरवली पर्वताच्या पायथ्याशीं शत्रूचें विशाळ सैन्य युद्धासाठीं येऊन पडलें आहे.

आकाशांत जो एक लहान कृष्णवर्ण मेघ आला होता तो विस्तार पावून त्यानें भयंकर स्वरूप धारण करून हां

हां म्हणतां समस्त आकाशाला व्यापून टाकिलें. लौकरच युद्धप्रसंग ओढवणार हें रजपूतलोक समजून होते इतक्यांत शत्रुसैन्य येऊन थडकल्याची त्यांनीं बातमी ऐकिली. दूत मुखांनें शत्रूच्या आगमनाची वार्ता ऐकतांच सहस्रावधि क्षत्रियवीरांच्या त्याचप्रमाणें पराक्रमी भिल्लजनांच्या अंगीं एकाएकीं महावेशाचा आविर्भाव झाला व ते भीषणतेनें घोष करूं लागले.

हळदीघाटच्या युद्धप्रसंगाचें वर्णन करण्याची आमच्या लेखणीच्या अंगीं शक्ति नाहीं. प्राचीनकाळीं कुरुक्षेत्रांत कौरवपांडवानें जें दारुणयुद्ध झालें त्या प्रसंगाचें चित्र वाचकांनीं महाभारताच्याद्वारें पाहिलेंच आहे तेंच चित्र त्यांनीं याहीप्रसंगीं आपल्यापुढें ठेवावें एवढीच त्यांना आमची प्रार्थना आहे ...रा अक्षौहिणी सेना, रक्ताचा भयंकर प्रवाह,. विजयीपक्षाचें आनंद तांडव, मृत्युद्वारीं पडलेल्या सैनिकांचा आर्तनाद, कोणाचा हात तर कोणाचा पाय तुटला आहे, कोणाच्या मुखांतून रक्तप्रवाह सुरू आहे तर कोणी आनंदपूर्वक प्राणत्याग करित आहे, इत्यादि दृश्यें मनांत आणिलीं असतां या युद्धाची कांहींशी कल्पना होईल. ”

“ प्रभंजनापेक्षांही वेगवान वायु भयंकर रितीनें वाहूं लागला. एकामागून एक असे तीव्र बाण विद्युद्वेगानें सटासट सुटूं लागले. अग्न्यस्त्रानें दशादिशा कंपायमान होऊं लागल्या. अंधःकारामुळें आकाश व अवनी यांची एक

स्वरूपता होऊन गेली. अश्वांचें खिंकाळणें, अग्न्यस्त्रांचा प्रचंड ध्वनि, शृगालांचा अशुभ कंठरव इत्यादिकांनीं दश-दिशा व्याप्त होऊन गेल्या. रात्रंदिन विकट चित्कार व आक्रंदन रवच ऐकूं येत. सतत वाहणाऱ्या रक्तांत-नररक्तांत-पृथ्वी जणुं काय बुडून जाण्याची तयारी करित आहे असा सर्वत्र भीषण देखावा दिसूं लागला. "

हळदीघाटचें युद्ध ह्मणजे भारतीययुद्धाची पुनरावृत्तिच असें ह्मटल्यास यत्किंचितही अतिशयोक्ति होणार नाहीं. एका बाजूला जलप्रवाहाप्रमाणें अगणित यवनसैनिक पुढें चालले होते. व दुसऱ्या बाजूस महा पराक्रमी रजपूत-सैनिक त्यांच्या गतीचा अवरोध करण्याच्या हेतूनें मार्गांत आड येऊन पर्वतावर स्थिर उभे होते. या आदर्शामुळें जणूं काय दोन उन्मत्त ऐरावत परस्परांशीं लढण्याकरितां तयार होऊन उभे आहेत असा भास होत असे. या दुर्गम व संकुचित स्थानीं अगणित हिंदु मुसलमान वीर परस्परांचा विध्वंस करण्यासाठीं छाती वर करून महावेशानें तयारी करून उभे होते. असा हा भयंकर आदर्श पाहून वनवासी पशुपक्षीगणही दूर पळून जाऊं लागला व मोठ-मोठे भयंकर सर्पही आपआपल्या बिळांतुन लपून राहिले.

भयंकर वादळ सुरू होण्यापूर्वीं ज्याप्रमाणें समुद्र स्थिर व शांत असतो त्याप्रमाणें अल्पकाळपर्यंत उभय सेना मोठ्या गंभीरतेनें परस्परांकडे पाहूं लागली. इतक्यांत उभय सैन्यांच्या सेनापतींनीं आपआपल्या सैनिकांस

संकेतपूर्वक आज्ञा केली. उभय सैन्यांत रणवाद्यें वाजूं लागलीं. रणवाद्यांचा गगन भेदक ध्वनि ऐकतांच हत्ती, घोडे व पायदळ मस्त होऊन शत्रूसैन्यावर चढाई करूं लागले. मुसलमान सैन्यांत "दीन दीन" व रजपूत सैन्यांत "हरहर महादेव" असा गंभीर घोष होऊं लागला.

"दीन दीन" व "हरहर महादेव" या गंभीर घोषाचा आकाशांत, पर्वतकंदरांत व आसपासच्या वृक्ष श्रेणींत प्रतिघोष होऊं लागला व त्यामुळें सैनिकांच्या शरिरांत अधिक आवेश संचार करूं लागला.

हां हां ह्मणतां उभयपक्षाच्या घोरतर युद्धास प्रारंभ झाला. व निमिषमात्रांत त्याठिकाणीं रक्ताची प्रबल नदी वाहूं लागली. त्या उष्ण रुधिर प्रवाहांत उभे असलेले अश्व विकट चित्कार करूं लागले. हत्तींची गर्जना सुरू झाली व सैनिकगण तारस्वरानें आपआपल्या पक्षाचा द्योतक असा जयघोष करूं लागले.

प्रथम असियुद्धास प्रारंभ झाला. सत्य व पराक्रमी वीर नेहमीं असियुद्धच करीत असतात. रजपूतांसारखे असियुद्ध करणारे योद्धे साऱ्या पृथ्वींतही आढळणें शक्य नाहीं. असियुद्धविद्या त्यांचीच. असियुद्धांत मोंगल लोक रजपूतांपुढें टिकाव काढूं शकतील ही गोष्ट स्वप्नांतही कोणी खरी मानणार नाहीं, रजपूतांच्या प्रचंड खड्गघातानें अनेक मोंगल सैनिक छिन्नविछिन्न होऊन धरणीतलावर लोळूं लागले. आपल्या सैनिकांची होत अस

लेली ही दुर्दशा पाहून मानसिंह व मोहब्बतखान यांच्या सल्ल्यानें सुलतान सेलिमानें आपल्या सैन्यास बंदुकीचा उपयोग करण्याचा हुकूम केला. ज्या रजपूत वीरांनीं अनेक यवनांना आपल्या असिधारांचा परिचय करून देऊन यमसदनीं रवाना केलें होतें तेच क्षत्रिय वीर आतां यवनांच्या गोळीबारानें पटापट भूतलशायी होऊं लागले. मोंगल सैन्याला कळून चुकलें कीं, याच एका उपायानें आपण रजपूतांवर मात करूं. यांना जिंकण्यास दुसऱ्या उपायाची गरज नाहीं.

मोंगल सैन्यांतून रजपूत सैन्यांत जलवृष्टिप्रमाणें गोळ्यांची वृष्टि होऊं लागली. असियुद्ध केव्हांच बंद पडलें होतें. रजपूतांचें बाहूबळ पाहून मुसलमान आश्चर्यचकित होऊन गेले होते, व मनांतल्या मनांत एकभावानें ते रजपूतांच्या शौर्याची प्रशंसा करित होते.

पण या प्रशंसेचा अर्थ काय? रजपूतांचीं युद्धसाधनें ह्मणजे तलवार, भाला, कट्यार व कांहीं प्रसंगीं धनुष्यबाण. भिल्लांची सर्व भिस्त काय ती धनुष्यबाण व लहान लहान दगड यांवर. प्रतापसिंहाच्या सैन्यांत तोफा बंदुका वगैरे अग्न्यस्त्रें बिलकुल नव्हतीं. रजपूत सत्यवीर या नांवानें ओळखिले जात व त्यांना खड्गविद्येविना दुसरें कोणत्याही प्रकारचें युद्ध शिक्षण मिळत नसे. तोफांच्या व बंदुकींच्या गोळ्यांनीं मोंगलांचें इतकें फावेल अशी रजपूत वीरांच्या मनीं कल्पनाही नव्हती.

महा अलौकिक वीरता प्रकट करून रजपूतांनीं खड्ग-युद्ध बंद केलें. त्यांच्या या अलौकिक पराक्रमाचें वर्णन भाट कवींनीं काव्यबद्ध करून अमर केलें आहे.

" हे पराक्रमी क्षत्रिय व भिल्लवीरांनो ! तुह्मी कितीही उत्तम लढवय्ये असा. यवनांच्या अग्न्यस्त्रांपुढें तुमचा कसा टिकाव निघणार बरें ? कदाचित् अद्भुत शौर्य प्रकट करून त्यांच्यावर एकाएकीं आक्रमण करून तुह्मीं त्यांची एखादी तोफही हरण कराल पण तेवढ्यानें तुह्मांला काय लाभ ? आतांपर्यंत तुह्मीं जो यवनापुढें टिकाव धरिला तो केवळ तुमच्या असाधारण युद्धशिक्षणाचा परिणाम. खरोखर धन्य आहे तुमच्या जन्माची ! तुमच्या दैवानें विपरित गतीचें अवलंबन केल्यामुळेंच तुह्मीं अपयशाचे वांटेकरी झाला. तरीपण, एवढें मात्र आमच्यानें सांगितल्यावांचून रहावत नाहीं कीं हळदीघाटच्या युद्धांत तुह्मीं जें अद्भूत शौर्यप्रदर्शन केलें त्यासमान शौर्याची प्रतिमा समस्त जगाच्या इतिहासांत कोठेंही मिळणें शक्य नाहीं.



## नवम परिच्छेद.

# हळदीघाटचें युद्ध.



जोगुण 'प्रभावाचा आज शेवटचा दिवस. श्रावणशुक्ल सप्तमी संवत १६३२ ( इ. स. १५७६ जुलै ) हा दिवस भारतवर्षाच्या इतिहासांत एक मोठा दिवस ह्मणून लिहून ठेविलेला आहे. पराक्रमी रजपूतांचा इतिहास वाचणाऱ्या कोणाही वाचकाच्या स्मरणांतून हा दिवस कधींकालींही विस्मृत होणार नाहीं, इतका या दिवसाचा प्रभाव आहे.

गतकाळा ! धन्य आहे तुझी ! तूं आपल्या अनंत उदरांत आजपर्यंत काय काय संग्रह करून ठेविला आहेस याची आह्मांला कल्पनाही होणें नाहीं. प्रतिक्षणीं व प्रतिनिमिषांत तूं आपल्या कराल दाढेंत विश्वांतील सर्व वस्तू भयंकर वेगानें आकर्षण करून घेत आहेस, ही तुझी लहान सहान शक्ति काय ? तुझ्या पराक्रम वर्णनांत जितका काळ व्यतित झाला तितक्या अल्पावधिंतही तूं आमची किती चिंता, प्रेम, आशा, आयुष्य इत्यादिकांची चोरी करून तीं आपल्या अनंतउदरांत लपवून ठेविलीस. सारांश तुझ्या पराक्रमापुढें दुसऱ्या कोणाच्याही पराक्रमाचा केव्हांही निभाव लागणार नाहीं.

## हळदीघाटचें युद्ध.

संवत् १६३२ श्रावणशुक्ल सप्तमीदिवशीं हळदीघाटच्या प्रथमयुद्धाची समाप्ति झाली. या युद्धाचें संक्षिप्त वर्णन करण्याचा 'आह्मीं या स्थलीं यथा शक्ति व यथा बुद्धि प्रयत्न करतों.

यवनांच्या अविरत अग्न्यस्त्रांच्या वृष्टिनें आपले सैनिकवीर पटापट पृथ्वीवर पडतांना पाहून व्रतधारी वीराग्रणी प्रतापसिंह महा भीषणतेनें—भयंकर नाद करून आपल्या सैनिकांस संबोधून म्हणाला—" बंधुजनहो ! चला आपण एक वेळ अंतिम प्रयत्न करून मोंगलांचीं अग्न्यस्त्रें हस्तगत करण्यासाठीं बलपूर्वक आक्रमण करून परमेश्वर आपणावर कांहीं कृपादृष्टि करतो कीं काय तें पाहूं ! चला, त्वरेनें चला. विचार करण्याचा समय आतां राहिला नाहीं."

या भाषणाचा प्रतापाच्या सैनिकांवर व्हावा तसा परिणाम घडला. त्यांना दुप्पट अवसान आलें. व सहस्रावधि रजपूतवीरांनीं खरोखर संहारमूर्ति धारण करून मोंगल सैन्यावर अकस्मात् चढाई केली. क्षणमात्रांत हजारों यवन गतप्राण होऊन पृथ्वीवर शयन करूं लागलेले दृष्टिगोचर होऊं लागले. त्यांच्या हातांतील बंदुका रजपूत आपल्या कबजांत घेऊं लागले. पण यानें रजपूतांना कोणताही लाभ झाला नाहीं. रजपूतांचे ग्रह फिरले होते ! तेथें मनुष्याचें काय शहाणपण ?

मुसलमानांचें लष्कर संख्येनें अपार होतें—रजपूतांपेक्षा कितीतरी पटीनें अधिक होतें व अग्न्यस्त्रांचा संचयही त्यांच्यापाशीं भरपूर होता. रजपूत घेऊन घेऊन

किती अस्त्रें घेणार. कदाचित् त्यांनीं तीं घेतलीं तरी ते दारूगोळा कोठून आणणार ? यदा कदाचित् दारू-गोळाही मिळाला तरी त्याचा उपयोग करणें त्यांना अवगत नसल्यामुळें त्यांत लाभ तरी काय होता ? कांहींच नाहीं. असी सर्वप्रकारें निराशा झाली असतांही प्रतापानें धैर्याचा त्याग केला नाहीं. तो एखाद्या खिजवलेल्या सिंहाप्रमाणें गर्जना करित आपला कट्टावैरी जो स्वदेश-द्रोही मानसिंह त्याचा शोध करूं लागला. ज्या दिवशीं मानसिंहाच्या आतिथ्याचा समारंभ करण्यांत आला होता. त्यादिवशीं प्रतापसिंहानें मानसिंहाला स्पष्ट सांगितलें होतें कीं, युद्धप्रसंगीं मी आपली अधिक संभावना करीन आपल्या या भाषणाची स्मृति अद्यापि त्याच्या मनांत जागृत होती.

आपले नेत्र विशेष विस्तृत करून प्रतापसिंह देशद्रोही व मातृयौवन वनकुठार मानसिंहाचा यवन सैन्यांत सर्वत्र शोध करूं लागला. त्याची मनोवृत्ति सर्वथा तन्मय झाल्या-मुळें तो वारंवार चतुर्दिशांत उन्मत्त जनाप्रमाणें तीव्र दृष्टि-पात करित फिरत होता. पण अद्यापि त्याला मानसिंह कोठेंही दिसला नाहीं.

चैतक नामक एका उत्कृष्ट अश्वाच्या पृष्ठभागीं प्रताप-सिंह आरूढ झाला होता. चैतक महातेजस्वी, साहसी, असाधारण पराक्रमी व इतरही सर्व गोष्टींनीं प्रतापसिंहाला योग्य असाच अश्व होता. आपल्या स्वामीच्या नित्य सह-वासानें चैतकाला युद्धाचेंही चांगलेंच शिक्षण मिळालें

होतें. अशा या चैतक नामक अश्वावर आरोहण करून निर्भय व भीमपराक्रमी प्रतापसिंह मानसिंहाच्या शोधार्थ सर्वत्र हिंडत होता. तोही कांहीं अशा तशा स्थळीं नव्हे तर सभोंवार अगणित शत्रूसैन्याचा वेढा पडला असतां. मध्यभागीं " मी प्रतापसिंह मेवाडचा महाराणा " असा घोष करित क्रुद्धसिंहासमान रक्तनेत्र करून फिरत होता. त्याच्या मस्तकीं किरीट व श्वेत राजछत्र हीं अखंड विराजित दिसत होतीं. समोर ताम्रवर्णी विजयपताका हवेंत विहार करित होती. त्याचे अंगरक्षक आपल्या प्राणांचीही पर्वा न करितां त्याच्या मागून तो जिकडे जिकडे जाई तिकडे तिकडे भ्रमण करित होते. एखादें बालक ज्याप्रमाणें आपल्या हस्तांतील छडीच्या प्रहारानें वृक्षावरील अनेक पर्णे झपाट्याबरोबर लीलीनें छाटून टाकितें त्याप्रमाणें प्रतापसिंह आपल्या मार्गीं आड येणाऱ्या यवन सैनिकांचीं मस्तकें धडापासून सपासप वेगळीं करित सुटला होता. यावेळीं त्यानें इतकें कांहीं हस्तकौशल्य दाखविलें कीं, यवनसैनिकांना आपल्या प्राणरक्षणाचें कार्य अत्यंत कठीण व अशक्य भासूं लागलें. शेवटीं प्रतापसिंहाचे सर्व अंगरक्षक एकामागून एक यवनांच्या अस्त्रांना आपले प्राण बलिदान करून स्वर्गीं प्रयाण करूं लागले. तरीही आपल्या निश्चयापासून न ढळतां प्रताप मानसिंहाच्या शोधांतच चालला होता.

चालतां चालतां व लढतां लढतां शेवटीं प्रतापसिंह यवनसैन्याच्या अगदीं मध्यभागीं येऊन उभा राहिला.

त्याठिकाणींही मानसिंह दृष्टीस पडला नाहीं. दुसरा एक शत्रु दृष्टीस पडला. तो शत्रू ह्मणजे दिल्लीश्वर अकबराचा प्रिय पुत्र सेलिम.

" इतका शोध करूनही क्षत्रियकुलकलंक मानसिंह हातीं न सांपडतां त्याच्याऐवजीं सुलतान सेलिम सांपडला हेंही एकप्रकारें चांगलेंच झालें. !" असें पुटपुटत प्रतापसिंह एकदम शहाजाद्या समोर येऊन उभा राहिला.

शहाजादा सेलिम हत्तीच्या अंबारींत बसून आपल्या सेनानायकांना युद्धाविषयीं कांहीं सूचना करण्यांत गुंग झाला होता इतक्यांत आपल्या समोर प्रतापसिंहाची भयंकर मूर्ति पहातांच तत्काल तो भयभीत होऊन गेला व आपल्याशीं विचार करूं लागला. " अहाहा ! केवढें अचाट साहस ! केवढा अद्वितीय पराक्रमशाली वीर !! सैन्य अगर शरीरसंरक्षक यांपैकीं कोणी बरोबर नसतां यानें एकट्यानेंच आमच्या असंख्य सैन्यांत निर्भयतेनें संचार करावा ही किती आश्चर्यकारक घटना ! याला देव ह्मणावें कीं मनुष्य ह्मणावें हेंच मला समजत नाहीं ! खरोखर रजपूत वीरमातांची धन्य खरी ! कीं, त्या अशा या नररत्नाला जन्म देऊन आपली जीवन–सार्थकता करून निघून जातात !! "

क्षणमात्रांत प्रतापानें सेलिमाच्या सर्व अंगरक्षकांचा संहार करून टाकला व तदनंतर भाला उगारून मूर्तिमान यमराजाप्रमाणें त्यानें सेलिमच्या अंगावर एकदम आक्रमण केलें. अशी ही भयंकर मूर्ति समोर आलेली पाहून सेलि-

मचा हत्तीही चकित होऊन स्तब्ध उभा राहिला. चैतक आपल्या स्वामीचा मनोभाव जाणून आपले पुढचे पाय हत्तीच्या सोंडेवर टेंकून उंच उभा राहिला. कार्य-कुशल प्रतापसिंहानें एका क्षणाचाही विलंब न करतां आपल्या हस्तांतील कालांतक शूलाचा सेलिमच्या अंगावर वार केला.

सेलिमचें भाग्य महा प्रबळ खरें कारण कीं, तो या संकटांतून-यमराजाच्या तावडींतून सुरक्षित सुटला. नाहीं-तर, आज त्याचीं शंभर वर्षें भरून चुकलींच होतीं. हत्ती-वरील हौदा लोखंडी पत्र्याचा असल्यामुळें प्रतापसिंहाचा भाला त्या हौद्याला लागून खालीं जमिनीवर पडला तरी पण त्याचा प्रहार सर्वथैव व्यर्थ गेला नाहीं. हौद्याच्या आघातानें खालीं पडतां पडतां तो माहताच्या माथीं लागला व त्यामुळें माहतानें अवनीतलाचा आश्रय केला. माहूत पडलेला पहातांच तो मदोन्मत्त मातंग भयानें पळूं लागला.

सेलिमच्या सत्यानाशाच्या कार्यांतसुद्धां अपयश आल्यामुळें खिजून गेलेला प्रतापसिंह गंभीर गर्जना करून शक्य तितक्या त्वरेनें मोंगल सैनिकांचा संहार करूं लागला. परंतु कसेंही झालें तरी तो एकटा होता! त्याचें सैन्य, त्याचे सरदार, किंवा त्याचे देहरक्षक यांपैकीं कोणीही त्याच्या सहायास जवळ नव्हते. पळतांपळतां सेलिमनें ही गोष्ट इषारा करून आपल्या सैनिकांस कळविली व

असेंही बोलून दाखविलें कीं जो कोणी प्रतापसिंहास ठार करून, अगर जिवंत धरून आणील त्याला मोठें इनाम मिळेल.

यामुळें मोंगल सैनिकांना फारच स्फुरण चढलें. त्यानीं आपले निरनिराळे चार विभाग करून चोहोंबाजूनीं प्रतापसिंहास घेरून टाकिलें. प्रतापसिंहास तरवारीचे तीन व भाल्याचे दोन मिळून पांच वार लागले होते. त्याचें सर्व शरीर रक्तानें माखून गेलें होतें. तरीसुद्धां यत्किंचितही न डगमगतां तो एकसारखा शत्रुसंहाराच्या उद्योगांत निमग्न होता. त्याच्या शिरोभागीं दीव्य किरीट व राजछत्र हीं अद्यापिही विराजित दिसत होतीं. आल्पावकाशांत रजपूतांची सर्व आशा नष्टप्राय होण्याची वेळ अगदीं जवळ येऊन टेपली.

एकाएकीं एक पराक्रमी रजपूत सरदार प्रतापसिंहा जवळ येऊन त्यानें त्याला संकेतपूर्वक कांहीं विनंति केली. प्रतापानें त्याची ही विनंति मान्य केली नाहीं. यामुळें निराश होऊन तो वीर मनांतल्यामनांत म्हणूं लागला— " गोष्ट होऊन गेली ! आतां प्रतापसिंहास ती कळविण्याइतकाही अवकाश राहिला नाहीं, मेवाडच्या उज्ज्वल दीपाचा निर्वाणसमय अगदीं समीप येऊन टेपला असेंच वाटतें ! पण नाहीं जोंवर माझ्या शरिरांत चेतना आहे तोंवर मी असा अशुभ प्रसंग येऊं देणार नाहीं. रजपूतांना मृत्यु म्हणजे–कांहीं भयंकर पदार्थ वाटत नाहीं. तरी पण माझ्या व देशहिताच्या दृष्टीनें प्रतापसिंहाचें मरण इतकें तुच्छ मानतां येण्यासारखे खास नाहीं. माझ्यासारखें अनेक रजपूत अहर्निश जन्मतात आणि मरतात. माझ्या-

सांरख्याच्या जन्मानें जगाला कांहीं लाभ नाहीं त्याचप्रमाणें मृत्युनेंही कांहीं हानी नाहीं. पण प्रतापसिंहाची तशी स्थिती नाहीं. तेव्हां शक्य तितके जीवापाड प्रयत्न करून प्रतापशाली प्रतापसिंहाचे प्राण रक्षण केलेच पाहिजेत. प्रतापसिंह जीवंत राहिला तर मेवाडचें अखंड कल्याण अवश्य होईल. मेवाडला कदाचित् पूर्वसौभाग्य प्राप्त होणार नाहीं—चितोडचा उद्धार कदाचित् होईल, न होईल, व्रतोद्यापनेंत कदाचित् विघ्नेंहीं येऊन पडतील—तरी पण रजपूतांच्या पवित्र कुळाचें नांव यानेंच अमर होईल. व आर्य कुमारिकांच्या नशिबींचा मोंगलांच्या बेगमा व दासी होण्याचा दुःखद प्रसंग प्रतापसिंह जिवंत असला तरच टळेल. ”

थोड्यावेळानें त्याला पुन्हां विचार सूचला “ जर महाराणाजींचा जीव बचावला पाहिजे तर तसें करण्याचा हाच प्रसंग योग्य आहे. याचक्षणीं प्रतापसिंहाचें प्राणरक्षण केलें पाहिजे. माते जन्मभूमी ! मला सहाय्य कर व मरणांपूर्वीं माझ्या हातून तुझी कांहीं तरी सेवा घरून घे ”

त्याचे हे विचार वर्णन करण्यास आह्मांस किती तरी वेळ लागला. पण त्याच्या मनांत ते क्षणमात्रांत येऊन गेले. मुखानें कांहींच उच्चार न करितां तो प्रतापशाली वीर हळु हळु प्रतापापाशीं आला व त्यानें अनुचरांच्या हातून राजछत्र व विजयध्वज आपल्या हातीं घेतला. त्यानंतर तो प्रतापसिंहास विनंतिपूर्वक ह्मणाला—“ महाराणाजी ! सावध व्हा ! ” असें बोलून त्यानें आपल्या

सोबतच्या दोघांचौघां सामंतांस संकेतपूर्वक सूचविलें कीं; आपल्या आज्ञेचें सत्वर पालन करा. विलंब करूं नका.

हा प्रतापशाली वीर झालापतीमान्ना होय. प्रतापाच्या शिरावरून उतरलेलें राजछत्र आपल्या मस्तकीं धरण्याची त्यानें आपल्या सेवकांस आज्ञा केली व सेवकांनीं आपल्या प्रभूचा हेतू जाणून थोडीसुद्धां हरकत न करितां आज्ञेप्रमाणें वर्तन केलें. त्यानंतर पूर्वसंकेतानुसार सर्व सेवकगण झालापतीलाच मेवाडाधिपतीच्या नांवानें संबोधूं लागले. यवनसैनिक, झालापतीलाच प्रतापसिंह मानूं लागले. कारण कीं, एक तर त्याच्या शिरीं राजछत्र होतें व दुसरें असें कीं त्याच्या पक्षाकडील लोक झालापतीला महाराणा याच अभिधानानें संबोधित असतांना ऐकूं येत होतें. कितीही बुद्धिवान् मनुष्य असला तरी तो छलभेदानें घडीभर तरी भ्रमांत पडतो. तेव्हां जडमति यवन शिपायी गडी या योगानें फसले यांत आश्चर्य नाहीं.

प्रतापसिंह या कपटनाटकाचें रहस्य समजून चुकला. आपल्या प्राणरक्षणासाठीं व स्वदेश कल्याणासाठीं स्वदेशभक्त झालापतीनें स्वतःचा जीव धोक्यांत घातला आहे, ही गोष्ट प्रतापाच्या ध्यानीं येऊन चुकली.

इच्छेविरुद्ध प्रतापसिंह समरभूमीचा त्याग करून चालता झाला. शारिरिक व मानासिक व्यथेनें तो अगदीं पीडित होऊन गेला होता. त्याच्यासाठीं ज्या सहस्रावधि क्षत्रिय वीरांनीं आज रणभूमीवर अखंड शयन केलें होतें.

त्यांच्या विषयीं मनांत विचार येतांच एक प्रकारचें अनिवार्य दुःख त्याच्या हृदयाला शल्यवत् पीडा देऊं लागलें.

कांहींअंशीं मानासिक व्यथेनें व कांहींअंशीं शारीरिक व्याधीनीं किंकर्तव्यतामूढ होऊन प्रतापसिंहानें समरांगणाचा त्याग केल्यावर कित्येक राजभक्त विश्वासू भिल्ल व रजपूत सरदार एकत्र होऊन त्यानीं त्याला सुरक्षित स्थलीं आणून पोंहंचविलें.

प्रतापाच्या गमनानंतर झालापतीनें अलौकिक व असाधारण पराक्रमानें युद्ध करून हजारों मुसलन सैनिकांना यमाच्या घरचा मार्ग मोकळा करून दिला. मारा! धरा! कापा! ठार करा! हरामखोरांना मारा! दुष्टांना कापा, शत्रूंचीं हृदयें विदारण करा. हीच गर्जना सर्वत्र ऐकूं येत आहे, काफरांना मारा! अशाही आरोळ्या ऐकू येत आहेत. हरहर महादेव जय भवानी! या घोषानें दश दिशा व्यापून गेल्या आहेत, दीन दीन या नादानें रणमैदान गाजून गेलें आहे. रजपूत सपासप कापले जात आहेत, मुसलमानांचीही तीच अवस्था चालली आहे, एकएकटा रजपूत वीर तीन तीन मुसलमानांचा बळि घेत आहे सलिम आश्चर्यानें रजपूतांचा पराक्रम पाहून दंग होऊन गेला असून त्याच्यावर रजपूत वीरांनीं आक्रमण केलें आहे व झालापती त्यांना उत्तेजन देत पुढें मार्गक्रमण करीत चालला आहे इतक्यांत एका प्राणसंहारक

गोळीनें झालपती पडला व रणरंग अगदीं बदलून गेलां. मातेची कूस जगवंद्य करून स्वामिभक्त झालावती रणांगणीं शयन करून अक्षय कीर्ति संपादन करून परलोकीं चालता झाला !

महावीर झालपतीचें पतन झाल्यावर रजपूतांचा पूर्ण पराजय झाला व विजयश्रीनें मोंगलांच्या गळ्यांत माळ घातली.

अशा रीतीनें हळदीघांटचें युद्ध समाप्त झालें. या युद्धांत चौदाहजार रजपूत वीरांनीं आपले मंगल देह रणभूमीला अर्पण केले असें बहुतेक सर्व इतिहासवेत्त्यांचें एक मत आहे !



## दशम परिच्छेद.

# पश्चात्ताप.

दिनकर कुलचंद्र ! चंद्र केतो !
सरभसमेहि दृढं परिष्वजस्य ।
तुहिनकलशीतलैस्तवाङ्गैः
शममुपयातु ममाऽपि चित्तदाहः ॥

उत्तर रामचरितम्.





भुजंगस्वरूप दुर्दैवाच्या दंशानें जो परिणाम व्हावयाचा तो होऊन चुकला. परंतु या घोरतम युद्धप्रसंगीं एक कल्पनातीत स्वर्गीय दृश्य पहाण्यांत आलें. हळदीघाटच्या युद्धांत प्रतापसिंहाचा झालेला पराजय त्याच्याच अक्षयकीर्तिस कारण होऊन राहिला. या युद्धांत प्रतापसिंहाचें शौर्य-साहसादि गुण सर्वांच्या चांगलेच निदर्शनास आले. प्रतापाचे चिरवैरी जे मोंगल त्यांच्याही मुखांतून त्याच्या शौर्याची स्तुति होऊं लागली.

शत्रुमुखांतून निघालेली आपली प्रशंसा ऐकण्यापेक्षां अधिक भाग्य तें दुसरें काय असणार? लज्जावंतमुखी प्रियकर भार्येचा स्मितहास्य प्रभावही या प्रशंसेपुढें तुच्छ आहे. पाषाणाचेठायीं प्रेमांकुर, वाळवंटांत विकासित पद्म, नास्तिकांचे मनांत भगवद्भक्तीचा विकास इत्यादि गोष्टी

ज्याप्रमाणें अलौकिक असतात त्याचप्रमाणें आज शक्तिसिंहाचें हृदय प्रतापासाठीं प्रेमार्द्र होऊन गेलें.

प्रतापसिंहाचा अतुलपराक्रम, विस्मयकारक शौर्य व स्वदेशोद्धारार्थ केलेली दारुणप्रतिज्ञा व प्रतापसिंहाच्या प्राणरक्षणासाठीं एका भूपालानें केलेला आत्मयज्ञ इत्यादि आदर्श अवलोकन करून शक्तिसिंहाच्या अंधःकारमय हृदयांत एकाएकीं ज्ञानज्योतीचा आविर्भाव झाला. तो स्वतःशीं विचार करूं लागला-" मी क्षत्रिय ? सिसोदिया कुळांतील एक कीर्तिमान पुरुष ? प्रतापाचा कनिष्ट बन्धू ! असें असूनही माझ्या हृदयांत स्वदेशभक्तिचें व स्वज्ञातिप्रितीचें अस्तित्व कसें नाहीं. ? माझे पराक्रम आज कुठें पलायन करून गेले ? मी क्षत्रिय असून क्षत्रियांच्याच नाशासाठीं माझे प्रयत्न ना ! ! खरोखर धिःकार असो माझ्या जीवनाला ! ! "

" माझा जेष्ट बन्धू पवित्र सिसोदिया वंशाचा अलंकार—कुलप्रदीप-पवित्रतेचा आधार-रजपूतांचें विश्वास स्थान व धर्माचा स्तंभ आहे. तेव्हां अशा बन्धूवर कोप करून व त्याचा द्वेष करून मी नरकाचाच अधिकारी झालों ना ? स्वदेशद्रोही कुलांगार बनून मी भ्रातृहत्येची प्रतिज्ञा केली ! धिःकार ! धिःकार ! माझ्या या दुष्कर्माबद्दल, माझ्या मनुष्यपणाला शतवार धिःकार असो ! माझ्या मनांतील वैरवन्हि जळून भस्म होवो ! मत्सर व क्रूरता दूर पळून जावो ! आज मी पाषाणांतून प्रेमप्रवाह उत्पन्न करणार ! हे जगदीशा ! माझ्या पातकांची मला क्षमा कर. "

असे अनेक विचार मनांत घोळूं लागतांच शक्तिसिंहाच्या नेत्रांतून खळखळ अश्रूप्रवाह सुरु झाला. ज्यावेळीं प्रतापानें समरभूमीचा परित्याग केला त्याचवेळीं त्याला न समजेल अशारीतीनें दोन मोंगलसैनिक त्याच्या मागें लागले. शक्तिसिंहानें हें पाहिलें. आपला जेष्ठ बंधु संकटांत आहे हें तो समजून चुकला.

पुन्हां शक्तिसिंह विचार करूं लागला—" ज्याच्या शिरावर रजपूतांचा सर्व भरिभार आहे, ज्याच्या अद्वितीय शौर्यावर विश्वास ठेवून स्वदेश स्वातंत्र्यप्राप्तिसाठीं हजारों रजपूत वीर या पुढेंही शस्त्रधारण करण्याचा संभव आहे अशा एका महापुरुषाच्या प्राणरक्षणासाठीं शक्य तितका प्रयत्न करणें अवश्य आहे. व माझा हा परमधर्म आहे."

अशाप्रकारें विचार करून तत्क्षणींच शक्तिसिंह त्या दोघां मोंगल सैनिकांच्या मागें एकदम आपला घोडा फेंकित चालता झाला. भग्नहृदय प्रताप आपल्या चैतक अश्वावर आरूढ होऊन आपला मार्गक्रमण करित होता. त्याच्या मनाची यावेळीं कशी काय अवस्था झाली होती हें त्याचें त्यालाच ठाऊक. हळु हळु ते मोंगलसैनिक प्रतापसिंहाच्या अगदीं समीप आले. मार्गांत एक नदी आड आली. पण चैतकानें एका उडीसरशीं आपल्या धन्याला सुरक्षित पैलतीरीं पोंहचाविलें. मोंगल सैनिक इतके भाग्यवान् कोठून असेणार? त्यांचे अश्व चैतकाप्रमाणें कर्तव्यपरायण

नव्हते. शिवाय त्यांना युद्धशिक्षणही नव्हतें. तेव्हां नदी पार करण्यास त्यांना स्वाभाविकच विलंब लागला.

नदी उल्लंघन करतांच ते मोठ्या त्वरेनें प्रतापसिंहाकडे येऊं लागले. प्रतापाप्रमाणेंच चैतकाचें शरीर शस्त्राघातानें क्षतविक्षत झालेलें असल्यामुळें त्याच्या अंगीं आतां पूर्वीप्रमाणें पूर्णवेगानें धांवण्याचें त्राण राहिलें नव्हतें. मोंगल सैनिक महावेगानें आपले घोडे भरधांव पिटाळीत प्रतापसिंहाच्या पाठीमागें येऊन उभे राहिले. अस्याघात करून प्रतापाला ठार करण्याचा त्यांचा दृढनिश्चय झाला होता.

इतक्यांत, वायुवेगानें आपला अश्व पिटाळित शक्तिसिंह त्यास्थानीं येऊन पोंहचला, व कमरेंत अडकविलेली आपली तरवार काढून तो शुद्ध रजपूत भाषेंत म्हणाला—
"हे नीलाश्वरूढा! जरा उभा रहा!"

शक्तिसिंहाचा स्वर प्रतापसिंहाच्या कानीं पडला. अशा दारुणप्रसंगीं मातृभाषेंत उच्चारलेले शब्द त्याला अमृताप्रमाणें मिष्ट भासले. परंतु या मिष्टपणाबरोबर त्याच्या मुखमंडलावर तिरस्कार व द्वेषभाव स्पष्टपणें उमटला. कारण त्यानें मागें वळून पाहिलें तों शक्तिसिंह अश्वारूढ होऊन आपल्यामागें उभा आहे असें त्याला दिसलें. पण हें काय? क्षणाचाही विलंब न लावितां शक्तिसिंहानें हें काय केलें. त्यानें आपल्या तरवारीच्या अचुक वारानें प्रतापाच्या मागें लागलेल्या त्या दोघांही यवन सैनिकांचा क्षणमात्रांत संहार करून त्यांना अखंड निद्रासुख उपभोगायला लावलें.

"..शक्तिसिंहानें या यवन सैनिकांचा काय हेतूनें संहार केला असेल बरें? मोंगलांच्या पक्षास असतांना त्यानांच ठार मारण्यांत याचा काय हेतू असेल? हे दोन मोंगल माझ्याच नाशासाठीं माझ्यामागून येत होते काय? कदाचित् तसेंही असलें तरी पण शक्तिसिंह त्यांचाच वध करितो याचें कारण काय बरें? आपल्या हातांनीं माझा वध करून वैराचा सूड उगवावा अशी तर शक्तिसिंहाची मनोभावना नसेल ना? शक्तिसिंहाची हीच अधम नीच-दुष्ट प्रतिज्ञा ना! हे मोंगल सैनिक त्याच्या मार्गांत विघ्न-कारक होते. म्हणून आपला मार्ग निष्कंटक करण्यासाठींच यानें त्यांना ठार मारून टाकलें असावें. "होय! हाच त्याचा हेतू! दुसरें काय?"

निमिषसहस्त्रांश वेळांत प्रतापसिंहाच्या मनांत वरील व दुसरे अनेक विचार झटपट येऊन गेले. मनांत हे विचार आले खरे. पण तो क्षत्रियवीर मरणाची भीति बाळगून एक पाऊलही मागें सरला नाहीं. शक्तिसिंहाच्या आगमनाची वाट पहात तो तेथेंच तसा उभा राहिला.

एकाएकीं त्याच्या मनांत एक दुसराच विचार आला. व मनांतल्या मनांत तो स्वतःस धिक्कार देत म्हणूं लागला— "हाय हाय! मी पराजित होऊन नीच मनुष्याप्रमाणें समरभूचा त्याग करून पळून जाण्यास तयार व्हावें काय? पलायन करण्यापेक्षां प्राणत्याग करणें हें सहस्रवार उत्तम. पण आत्महत्येचें पातक काय म्हणून शिरावर घ्यावें! आजवर शक्तिसिंहानें आपल्या मनांतील फार दिवसांचा

हेतू सिद्धीस नेण्यास अवसर दिला आहे तेव्हां माझ्या मनांतील हेतूही पण आतां आपोआप सिद्धीस जाईल."

मनांत अशाप्रकारचे अनेक शुभाशुभ विचार करित दृढनिश्चयानें प्रतापसिंह एखाद्या दिग्मुढाप्रमाणें उभा राहिला. अल्पावधित त्यानें आपल्या हातांतील तरवार दूर फेंकून दिली व जवळ आलेल्या शक्तिसिंहापुढें आपली छातीपुढें करून तो गदगद कंठानें त्यास ह्मणाला "शक्तिसिंह! चल ये. व माझ्या छातींत आपली तरवार खुपसून आपली फार दिवसांची मनःकामना सिद्धीस ने! चल. तयार हो! असा अमूल्य वेळ तुला पुन्हां कधींही मिळणार नाहीं! स्वदेश स्वातंत्र्यकार्यापासून विन्मुख होऊन जे रजपूत प्राणभयानें समरभूमीचा त्याग करून निघून जातात. त्यांना हें प्रायश्चित मिळालेंच पाहिजे. अशी माझी मनोदेवता मला सांगते!!

शक्तिसिंहानें कांहींही उत्तर न दिल्यामुळें प्रताप पुन्हा त्याला सांगूं लागला-" शक्तिसिंह! विचार कसचा करतोस? माझ्या तोंडाकडे पहात तटस्थ उभा कां राहिलास? असें एकांत स्थल व असा सुंदर प्रसंग पुन्हां केव्हांही येणार नाहीं. त्वरा कर व या पापी व अभागी नराला मुक्ति दे."

शक्तिसिंह निरुत्तरच राहिला तेव्हां प्रताप त्यास पुन्हां ह्मणाला-" माझें बोलणें तुला ऐकूं येत नाहीं काय जर माझी इच्छा अमान्य करण्याचीच तुझी इच्छा असली तर तुझी तरवार माझ्या हातीं दे. मी पुन्हां

अश्वावरून खालीं उतणार नाहीं. तुझ्याच तरवारीनें आत्मघात करून या क्षणींच या सर्व संकटांतून मुक्त होतों!"

शक्तिसिंह कोणत्या हेतूनें आपल्या बन्धुपाशीं आला होता हें वाचकांना ठाऊक आहेच. तेव्हां आपल्या परमपूज्य भ्रात्याचें हें असें भाषण ऐकून त्याच्या मनाची कशी काय स्थिती झाली असेल याची सहृदय वाचकांनीं आपल्या मनाशींच कल्पना करावी.

शक्तिसिंहाच्या नेत्रांतून भीषण अश्रुप्रवाह ढळढळां निघूं लागला. तो आपल्या अश्वावरून खालीं उतरला व आपली तरवार जमिनीवर फेंकून देऊन हात जोडून त्यानें गुढघे टेंकले व तो प्रतापाच्या तोंडाकडे पाहूं लागला.

प्रतापसिंहाला आतां सर्व कांहीं समजून चुकलें ह्मणून तत्काळ घोड्यावरून खालीं उतरून व शक्तिसिंहाचा हात धरून त्यानें त्याला वर उठविलें, व मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन त्याला आनंदित केलें.

या अपूर्व विधिघटनेनें उभय बन्धूंचे कंठ भरून आले. नेत्रांतून शोकाश्रूंऐवजीं हर्षाश्रू पतन-पावूं लागले. शक्तिसिंह प्रतापसिंहाची पदधुली मस्तकावर धारण करून सद्गदित कंठानें त्याला ह्मणाला—"दादा! प्रत्यक्ष परमेश्वरदर्शन मला कधीं झालेलें नाहीं; पण मी तुलाच आतां प्रत्यक्ष परमेश्वर समजतों, आजवर मी नेत्र असूनही

अंध होतों. आज माझे नेत्र उघडले व ह्मणूनच मी आज तुला व तुझ्या सत्यशक्तिला ओळखण्यास समर्थ झालों.

प्रतापाचें रोदन अनिवार्य होतें.

शक्तिसिंह पुढें बोलूं लागला—" दादा ! माझ्या सर्व अपराधांची क्षमा करून मला असा आशिर्वाद दे कीं, मी यावज्जीव तुझ्या चरणीं लीन राहून तुझ्या आश्रयाचा त्याग करण्याची दुष्टबुद्धि माझ्या मनांत कधींही उत्पन्न होणार नाहीं. "

प्रतापसिंहानें मोठ्या प्रेमानें आपल्या बन्धूच्या शिरास हस्तस्पर्श करून " तथास्तु " असें ह्मटलें. शक्तिसिंहाला आज आपण कृतार्थ झालों असें वाटूं लागलें. तो पुन्हां विनितभावानें प्रतापास ह्मणाला—" दादा ! आजच्या युद्धांत जय मिळाला नाहीं ह्मणून आपणास धिःकार असो–आपलें जीवन व्यर्थ आहे असें मानण्याची अवश्यकता नाहीं. तुझ्यासारखा भाग्यशाली आज दुसरा कोण आहे ? पराजय झाला असूनही एखाद्या दिग्विजयी योद्धयाप्रमाणें तुझ्या कीर्तिकुसुमगंधाचा आज सर्वत्र प्रसार होऊन गेला आहे. तुझे प्रत्यक्ष शत्रूहीं तुझ्या अलौकिक पराक्रमाची सहस्त्रमुखांनीं प्रशंसा करित आहेत. अधिक काय सांगूं ? समरभूमीवरील तुझे अतुल पराक्रम पाहून माझ्यासारख्या अधमाच्या मनांतही तुझ्याविषयीं भक्तिभाव उत्पन्न झाला तेव्हां सज्जन तुझी स्तुति करतील यांत काय आश्चर्य ? मला असा आशिर्वाद दे कीं, मीही तुझ्यासारखे पराक्रम करून स्वदेशस्वातंत्र्यासाठीं माझ्या प्राणाची

आहुति देण्यास समर्थ होईन. याशिवाय मला माझ्या पातकांबद्दल दुसरें एकही प्रायश्चित दिसत नाहीं."

प्रतापाच्या आशावृक्षाला आतां अंकुर फुटूं लागला. सद्गदवानें प्रताप त्याला ह्मणाला–शक्तिसिंह! आज माझ्या सद्भाग्यास सुरवात झाली. माझ्यावर परमेश्वराची पुरी पुरी कृपा झाली! प्राणप्रिय बंधु! तूं याच उद्देशानें त्या दोन मोंगल सैनिकांस ठार केलेंस काय? तुझ्या या वर्तनानें मला पुन्हां जिवंत रहावें असें वाटूं लागलें आहे. झाला! माझा जगण्याचा निर्धार झाला! काय पाहिजे तसा प्रसंग येवो पण मी माझ्या जिवनव्रताची उद्यापना अवश्य करून प्रतिज्ञा पालन करीन. मोंगलांपुढें कधींही मस्तक नम्र करणार नाहीं. व्रतोद्यापनेसांठीं अंतःकरण-पूर्वक प्रयत्न करीन. मग जें फळ नशिबीं असेल तें मिळेल!"

"जगदीश तुला खात्रीनें यशस्वी करील" असें शक्तिसिंहानें अंतःकरणपूर्वक प्रोत्साहन दिलें.

उभय बंधूंचें पुष्कळ संभाषण झालें. पण आतां संभाषणांत अधिक वेळ घालविण्याचा समय नव्हता शक्तिसिंहाला पुन्हां मोंगलांच्या छावणींत जावयाचें होतें. जर तो तसें न करता तर सेलिमच्या मनांत त्याविषयीं भयंकर शंका येण्याचा सोळा आणे संभव होता.

संभाषण पुरें झालें. व त्याच क्षणीं प्रतापसिंहाच्या प्रियतम चैतकानें प्राण त्याग केला. प्रतापाचें चैतकावर अतो-

नात प्रेत होतें, सुखांत, दुःखांत, रणांत, वनांत, सर्व स्थानीं व सर्व प्रसंगीं चैतकानें आपल्या स्वामीला अनेक वेळां मदत केली होती. त्या सर्वांचें स्मरण होऊन आपला एक खरा सोबती आपणांस अखंड सोडून गेला ह्या विचार मनांत येऊन प्रतापाचे नेत्र अश्रूंनीं परिपूर्ण झाले. तो एखाद्या बालकाप्रमाणें ढळढळां रडूं लागला.

ज्या वेळीं चैतक समरभूमीचा त्याग करून आपल्या धन्यास घेऊन निघाला त्यावेळीं त्याचें शरीर क्षतविक्षत झालें होतें व त्याच्या शरिरांतून फारच रक्तस्राव झाल्यामुळें त्याचें देहावसान झालें.

मृत्युसमयीं चैतकानें एकवार आपल्या धन्याकडे दृष्टिपात करून आपली कृतज्ञता दर्शविली. व त्यानें या क्षणभंगुर देहाचा त्याग केला.

प्रतापसिंह आपल्या मनांत ह्मणूं लागला— “ ज्यावेळीं दुर्भाग्य प्रबल होतें त्यावेळीं एकामागून एक संकटें येत राहून दुःखाला सुरवात होते. युद्धांत पराजय झाला, समर भूमीचा त्याग करून पलायन करणें भाग पडलें व शेवटीं हा जीवनाधार चैतक मृत्युवश झाला. विश्वांतील सारे अशुभ प्रसंग विधात्यानें फक्त माझ्याच कपाळीं लिहिलें आहेत काय ? होय ! असें दिसतें खरें ! तसें नसतें तर अशा या अशुभघटना वरचेवर घडल्या ना !

प्रतापाच्या दुःखाचा अतिरेक झाला. शक्तिसिंहानें त्याच्या मनाचें योग्यरीतीनें सांत्वन करून आपला अश्व

त्याला दिला व आपण स्वतः त्या मृत मोंगल सैनिकांच्या घोड्यापैकीं एकावर आरूढ होऊन त्यानें विद्युद्वेगानें सेलिमच्या छावणीकडे प्रयाण केलें. प्रतापसिंहाचें चैतकावर किती प्रेम होतें हें इतिहासप्रिय वाचकांना ठाऊक आहेच. ज्या चैतकाचा अंत झाला त्या स्थलीं त्याच्या स्मरणार्थ प्रतापानें एक भव्य स्मारकस्तंभ उभारला.

शक्तिसिंहाची व प्रतापाची भेटाभेट झाली याविषयीं सर्व वृतांत कळूनही सेलिमनें शक्तिसिंहाला यत्किंचितही दोष दिला नाहीं! या अपराधाची त्यानें त्याला क्षमा केली. पण पुढें त्याला आपल्यापाशीं ठेविलें नाहीं! यावरून सेलिमच्या सत्योदारतेचा वाचकांना चांगला परिचय होईल. लौकरच शक्तिसिंह आपल्या बंधूला येऊन मिळाला. व त्याच्या सुखदुःखाचा समभागीं होऊन आयुष्यांतील दिवस कंठूं लागला. अशा या दुःखद दिवसांत उभय सहोदरांच्या परस्पर आनंदामिलनानें सर्वांच्या मनांत महदानंद निवास करूं लागला.

---



# तृतीय खंड-प्रेमदर्शन.

## प्रथम परिच्छेद.

## यमुना व जोधाबाई.



जेवल्यावर आपण आज गम्मत तर पुष्कळच केली! मी तर हंसून मेलें!!

" तें कसेंही असो पण तुला तर फसविलें खरें?"

" असें केल्यानें कोण फसणार नाहीं? तुमचं लग्न झाल्यावर आपले प्राणनाथसुद्धां फसून जातील. समजलं?"

" त्या गोष्टी आतां असूं दे."

" कां? कां बरें असूं दे?"

" दिवसा कधीं चंद्रिकेचा उदय होत नसतो व चकोराचें नृत्यही दृष्टीस पडत नसतें. तेव्हां विनाकारण वाद कशाला?"

" पण मला वाटतें कीं दिवसा चंद्रिकेचा प्रकाश पडेल व चकोरही नृत्य करील. त्याचें कसें?"

" पण मला तसें वाटत नाहीं."

" कधिंही नाहीं-आपलें वाटणें खोटें आहे."

" खोटें ह्मणजे? काय-तुह्मीं चिरकाल कौमार्यावस्थेंतच रहाण्याचा निश्चय केला आहे वाटतें?"

.माझा निश्चय काय उपयोगाचा? या गोष्टी मी सांगून तरी काय फायदा? त्या तुझ्या नवऱ्यालाच चांगल्या ठाऊक आहेत."

एका सुंदर व विस्तृत भवनांतील एका विशाळ दिवाणखान्यांत दोन युवती वरीलप्रमाणें विनोद करीत बसल्या होत्या. एक पूर्ण युवती व दुसरी किशोरी होती. युवतीचें वय अठरा वर्षांचें होतें. तिचा वर्ण गौर, मुख दिव्य व नेत्र हरिणाप्रमाणें सतेज व प्रभावशाली होते. ही युवती पृष्टभागीं मोकळे सोडलेले आपले कृष्णसर्पवत् भासणारे केशकलाप हस्तीं घेऊन ती आपल्या भुवनमोहिनी प्रतिमेचें दर्पणांत दर्शन करीत होती. तिनें एक उंची नीलवर्ण रेशमीवस्त्र परिधान केलें होतें. गळ्यांत एक बहुमोल रत्नांचा हार व कर्णी हिरेजडित सुवर्ण पुष्पादि अलंकार शोभत होते. ही युवती व दुसरी किशोरी यांचा परस्पर नणंद भावजईचा संबंध होता.

कुमारिकेचें वय अवघें चौदा वर्षांचें होतें. तिची शरिर-कांति गौर व सुंदर होती. मुखाकृति चंद्राप्रमाणें गोल, नेत्र विशाल व चंचल व शरिर फार कृशही नाहीं व फार स्थूलही नाहीं असें अर्थात् पूर्ण मनोहर होतें. यावेळीं ही कुमारिका पुरुषवेष धारण करून आपल्या भावजईबरोबर विनोद करण्यांत निमग्न होती. भावजईनें प्रथम तिला ओळखलें नाहीं. घरांत कोणी परपुरुषानें प्रवेश केला आहे असें वाटून पहिल्यानें ती फारच त्राबरली. भावजईचें नांव जोधाबाई होतें. व कित्येक

तिला अहिल्याबाई याही नांवानें संबोधित असत.. कुमारिकेचें नांव यमुना होतें. जोधाबाईचा व यमुनेचा जो परस्पर हास्यविनोद चालला होता त्याचें अल्प दर्शन आम्हीं या परिच्छेदाच्या प्रारंभीं वाचकांना केलेंच आहे..

यमुनेला पुरुषवेष फारच सुंदर शोभत होता. रजपूत स्त्रिया स्वभावतः जसलीं वस्त्रें परिधान करितात तसलींच. वस्त्रें यमुना नेहमीं परिधान करित असे, असें नाहीं. ती निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या तऱ्हेच्या वसनांनीं आपल्या सुंदर देहाला भूषवीत असे. ती कधीं गुर्जर पद्धतीचा तर कधीं मोंगलीथाटाचा, कधीं रजपूत स्त्रियांचा तर कधीं मराठा स्त्रियांप्रमाणें पोषाख करित असे. कधीं तब्यत लागली तर ती रजपूत वीराप्रमाणेंही पोषाख करून सर्वांच्या हृदयांत एकप्रकारचें कौतुक उत्पन्न करण्याचा प्रयत्न करी. आपल्या बंधूसहवर्तमान तिनें अनेक देशांतून प्रवास. केला असल्यामुळें भारतवर्षांतील सर्व लोकांच्या रीतिरिवाजांची तिला पूर्ण माहिती होती. जात्या फार तीव्र बुद्धीची असल्यामुळें तिच्या अंगीं अनुकरणाचा अद्वितीय गुण होता. तिच्या बन्धूचें तिच्यावर विलक्षण प्रेम होतें. तिचे आईबाप तिच्या बाल्यावस्थेंतच निवर्तले होते.

विनोदी यमुनेनें आज गुर्जर पुरुषाचा वेष धारण केला होता. असें करण्यांत भावजईचा विनोद करावा हाच तिचा अंतस्थ हेतू होता. जोधाबाईचें आपल्या नणंदेवर भगिनीप्रमाणें प्रेम होतें. जोधाबाई स्वभावतःच

धीर व गंभीरवृत्तीची स्त्री होती. परंतु तिच्या धीराचा व गंभीरतेचा यमुनेच्या विनोदी स्वभावापुढें कांहींच टिकाव लागत नसे. शक्य तितक्या उपायांनीं यमुना आपल्या भ्रातृपत्नीचा गांभीर्यनाश करित असे.

पृष्टभागीं मुक्त सोडलेला आपला केशकलाप हातीं धरून दर्पणांत मुखावलोकन करित असलेली जोधाबाई कोकिल-समान मधुर स्वरानें यमुनेला उद्देशून ह्मणाली– " वन्सं ! वारंवार तुह्मीं लग्नाची गोष्ट उडवाउडवीवर नेतां याचें कारण तरी काय ? " असें ह्मणून पूर्ण स्नेहानें तिनें चंद्र बिंबाशीं स्पर्धा करणाऱ्या यमुनेच्या मुखाचें चुंबन केलं या चुंबनसमयीं जणुं दोन सजीव चंद्रांचें मिलन झालं आहे कीं काय असा भास होऊं लागला. नंतर ती नणं-देस ह्मणाली— " वन्सं ! लग्नाशिवाय आपण असे किती दिवस काढणार ! सांगा तर खरें ? "

" पुन्हां तूं ही गोष्ट काढलीस ? अग ! लग्न हें ईश्वरसूत्र आहे. तें उल्लंघन करण्याची शक्ति तुझ्या, त्याचप्रमाणें माझ्याही अंगीं नाहीं. " यमुना ह्मणाली.

" ईश्वरी सूत्र तर खरेंच ! पण आपण प्रयत्न तर केला पाहिजे ! शिवाय मुळांत आपला लग्न करण्याचा विचारही पाहिजे. जर आपल्या मनांत लग्नाची इच्छा नसली व आह्मीं पाहिजे तेवढे प्रयत्न केले तर त्यांत काय फायदा ? " असें बोलून जोधाबाईनें तिच्या विचाराचें खंडन केलें.

" इच्छा असली कीं इच्छित वस्तू प्राप्त होते असा सृष्टीचा नियम आहे कीं काय ? जर असा नियम असता तर मग कोणाला चिंता करण्याचें कारणच नव्हतें. " यमुनेनें बुद्धिवाद केला.

" आपलें हें बोलणें व्यर्थ आहे, तुमच्या बन्धूंनीं किती किती स्थळें पाहिलीं ह्मणून सांगूं पण आपणाला एक तरी रुचलें कां ? यांत आतां आमचा दोष काय ? " जोधाबाईनें बोलणें पुढें चालविलें.

" हं ! तुझें चालूं दे. तुला कोण अटकाव कां करतें आहे ? " असें बोलून विषय बदलण्याच्या उद्देशानें— मुखमुद्रेत परिवर्तन करून यमुना ह्मणाली—" तें आतां असो ! पण हळदीघाटच्या युद्धांत महाराणाजीचा पराजय झाल्यावर काय काय झालें तें तुला कळलें कां ? तुझ्या वडिलांविषयीं तरी कांहीं समाचार कळला ? "

" अशा प्रकारें गोष्ट बदलण्याचा आपला प्रयत्न माझ्या- पुढें शेवटास जाणार नाहीं हें खूप समजून असा. मी आपली चोरी पकडली आहे. माझें सुदैव पाहून आपल्या मनांत विषमता वाटली कीं काय ? तर मग आपण तसें कां त्यांनां सांगत नाहीं ? " जोधाबाईनें हास्य करून हे विनोदमय शब्द उच्चारिले.

अत्यंत अनुरागानें जोधाबाईच्या गालावर अंगुलिप्रहार करून यमुना ह्मणाली—" वहिनी ! तुला जरासुद्धां विनोद आवडत नाहीं नव्हे ? तूं तर गांभीर्याचा फारच दंभ

दाखवूं लागलीस. पण महाराणाजींनीं अशी प्रतिज्ञा केली आहे कीं पतित रजपूतांशीं शरीरसंबंधच करूं नये. तेव्हां आतां आपला तरी काय उपाय ? "

हंसत हंसत जोधाबाईनें मोठ्या प्रेमानें उत्तर दिलें— " वन्सं ! आतां आपली गोष्ट टाळण्याकरितां काय पाहिजे तें बोला. पण बोलण्यांत आपण घसरलांच. आपले बन्धुराज जसे शूरवीर आहेत तसे पति आपल्याला कोठून मिळणार हीच कीं नाहीं आपल्या मनांतील शंका ? "

यमुना कांहीं सहजासहजीं अशा भाषणानें हरेल अशी नव्हती. जोधाबाईपेक्षांही ती अधिक बुद्धिवान् व चतुर होती. मनांत कांहीं विचार करित महा गंभीरतेनें ती जोधाबाईस ह्मणाली-" आतां मी तुला खरोखरी गोष्ट सांगतें. कोणाही लेंच्यापेंच्या रजपूताशीं मी विवाहसंबंध बिलकूल करणार नाहीं. माझा भावी पति शूर, वीर, पराक्रमी, व स्वतंत्र राजा असला पाहिजे. पारतंत्र्यशृंखलेनें तो बद्ध नसला पाहिजे. जर असें असेल तरच माझ्या पित्याच्या कुलकीर्तिचें रक्षण होण्याचा संभव आहे. व ह्मणून अशा गुणी पतीचीच अर्धांगना होण्याचा मी दृढनिश्चय केला आहे. समजलें ? "

थोडा वेळ विचार करून जोधाबाईनें उत्तर दिलें. " वाः ! खूप केलें वन्सं ! तर मग समस्त राजस्थानांत आपणास वरतां येईल असा गुणवान राजपुत्र महाराणा प्रतापसिंहाशिवाय दुसरा कोणीही मिळणार नाहीं. महा-

राणाजी शिवाय राजस्थानांतील इतर सर्व रजपूत पतित व पराधीन असून त्यांनी दिल्लीश्वराचें दास्यत्व स्वीकारलें आहे. वत्सं ! तुह्मीं वाट पहात बसाल पण असा वर आजकाल कोणाला मिळेल इतकें कोणाचें भाग्य असेल असें मला नाहीं वाटत."

"नाहीं मिळाला तरीही कांहीं चिन्ता नाहीं. तुझ्याशींच हास्यविनोद करून मी माझे दिवस आनंदांत घालवीन" असें यमुना म्हणाली.

"परंतु हें किती दिवस? तारुण्यवेगाचा अवरोध करणें हें कांहीं—"

जोधाबाईला पुढें बोलूं न देतां यमुना ह्मणाली "कृपा करून हा विषय आतां असूं दे. अशा निरर्थक गोष्टी बोलत बसण्यापेक्षां चल आपण थोडावेळ दांपत्यप्रणयोपभोग घेऊं"

"दांपत्यप्रणयोपभोग! म्हणजे तो तुम्हांला ठाऊक आहे कां? जर असेल तर त्याचा उपभोग कसा घेण्याचा आपला विचार आहे?" जोधाबाईनें विचारलें.

"समज कीं मी तुझा पति व तूं माझी पत्नी. तूं माझ्यावर रुसून बैस व मी तुझ्या विनवण्या करून तुझ्या कोपाचें निवारण करत्यें, इतर खेळांपेक्षां हा खेळ तुला आवडेल, खरें ना?" यमुनेनें युक्तिसूचन केलें.

"छे: बाई! हें मला कांहींच समजत नाहीं. तुह्मांला जें आवडेल तें करा." असें बोलून जोधाबाई मनांत ह्मणूं

लागली-" यांचा विवाह पाहून माझें नेत्रसार्थक्य केव्हां होईल ? " पुनः ती यमुनेला ह्मणाली-" वन्सं ! हा पुरुषवेष आतां उतरा. या वेषानें आणखी किती वेळ काढणार ? "

" पुरुषवेष एव्हां कसा उतरणार. या वेषानें तर आपल्या खेळांत सगळा रंग भरणार आहे " असें बोलून यमुना जोरानें ह्मणाली-" वहिनी ! जरा थांब तर खरी तुझ्या प्रश्नाचें सव्याज उत्तर मी आतां देणार आहे. "

" ही पहा ! मी तुमच्या वामभागीं उभी राहिल्यें. आतां काय करायचें तें सूचवा. " जोधाबाईनें खेळास प्रारंभ करतांना ह्मटलें.

यमुनेनें सुंदर पुरुषवेष धारण केला होता. अर्थात ती पती बनून जोधाबाईच्या दक्षिणभागीं उभी राहिली. व रूपवती युवती जोधाबाई सलज्ज मुखानें पत्नी होऊन यमुनेच्या वामभागीं उभी राहिली. प्रथम एकवार जोधाबाईकडे दृष्टिकटाक्ष फेंकून यमुना ह्मणाली-" हे विधुवदने ! आतां मी माझ्या मृदुप्रार्थनेला प्रारंभ करितों " असें बोलून तिनें प्रार्थना करण्यास सुरवात केली.

" ज्या वेळीं तूं आपल्या कोकिलसमान कंठानें मृदुशब्दांचा उच्चार करत्येस त्या वेळीं तुझ्या धवल दंतपंक्तिरुप कौमुदीच्या प्रकाशानें माझ्या हृदयांतील घोरतम अंधःकाराचा एकाएकीं प्रतिकार होऊन जातो. माझ्या नेत्रचकोराची तुझ्या मुखचंद्राच्या दर्शनानें कधिंही तृप्ती होत नाहीं एतदर्थ हे चारुशीले सुंदरि ! तूं आतां आपला मान एकीकडे ठेव. मदनानलानें माझें हृदय जळून भस्मी-

भूत होऊन जात आहे त्याला विलासवारिशिंचनानें शांत कर. स्मररुपी विषाचें निवारण करण्यास माझ्या कंठांत आपले कर धारण कर व मला स्वपदपल्लवांचा उदार आश्रय दे ! ''

जोधाबाईला या भाषणानें एकाएकीं हंसू आलें व ती ह्मणाली—" पण तुह्मीं इतका हा विनोद शिकलां तरी कुठें ! खरोखर जर तुह्मीं पुरुष झालां असतां तर तुह्मीं काय काय केलें असतें याची मला कल्पनाही होत नाहीं. "

" असें हें मध्यें बोलण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं. यानें विनाकारण रसभंग मात्र होतो ! " असें ह्मणून यमुनेने प्रश्न केला—" तूं मला खरोखर पुरुषच समजतेस ना ! ''

" होय. मी तुह्मांला पुरुषच समजतें. " जोधाबाईनें उत्तर दिलें—" पण आतां पुढें काय केलें पाहिजे तें मला सांगा. माझ्यानें अधिक वेळ असें दिग्मूढाप्रमाणें उभें राहवत नाहीं. "

" प्राणेश्वरी ! तूं माझी प्राणप्रिया राधा आहेस. माझ्यावर तूं इतका कोप करूं नको. प्रिये चारुशीले ! प्रसन्न हो ! तुझ्यापेक्षां या जगांत मला दुसरी कोणतीही वस्तु प्रिय नाहीं. तूं अशी दिग्मूढ होऊन कां उभी राहिलीस ? हा समय माझ्या तोंडाकडे पहात मौन्य धरून उभें रहाण्याचा.कां ? वस्त्रानें मुखाच्छादन करून मुखमंडळ फिरव व कोपाचा आविर्भाव आण ह्मणजे अधिक रंग भरेल. "

" कोपाचा आविर्भाव आणणें माझ्यानें कांहीं होणार नाहीं. दुसरा कांहीं उपाय असला तर सांगा. " असें बोलून जोधाबाईनें मधेंच रसभंग केला.

" तर मग असेंच चालूं दे " असें बोलून यमुनेनें पुनः प्रेम भाषणास प्रारंभ केला— " प्राणेश्वरी ! माझें तुझ्यावर अतोनात प्रेम आहे ! "

हंसत हंसत जोधाबाई स्तब्ध उभी होती.

" प्रिये ! मला उत्तर तरी दे " अशी यमुनेनें पुनः प्रार्थना केली.

जोधाबाई पूर्ववत निरुत्तरच होती. त्यानंतर यमुनेनें जोधाबाईच्या कपोलाचा चुंबनास्वाद घेतला. एकाच चुंबनानें जोधाबाईच्या गुलाब पुष्पाप्रमाणें सुकुमार कपोलावर रक्तवर्णाचा भास होऊं लागला. मुखानें कांहींही न बोलतां तिनें यमुनेकडे एक प्रेममय, दृष्टिपात केला व ती पुन्हा गंभीरपणें तशीच उभी राहिली.

परंतु यमुनेच्या मनांत मात्र चुंबनास्वादानें संतोष झाला नाहीं. म्हणून ती म्हणाली—" तुला माझी अर्धांगी होणें बरोबर आवडलें नाहीं. तूं आपला पाठ पाहिजे तसा करून दाखविला नाहींस. मी म्हटलें प्राणेश्वरी माझें तुझ्यावर अतोनात प्रेम आहे तेव्हां तूं आपली स्तब्धच राहिलीस. त्यावेळीं तूं असें म्हटलें पाहिजे कीं प्राणेश्वर ! माझें जीवन सर्वस्व आपणच आहां ! कदाचित् असेंही म्हणणें आवडत नसेल तर तूं आपली पतिका चुंबनानें तरी रंजीत कर. "

जोधाबाईनें उत्तरही दिलें नाहीं किंवा चुंबनही घेतलें नाहीं. ती आपली पूर्ववत् गंभीरपणें उभी होती.

यमुना मनांत म्हणूं लागली–" आतां असा व्यर्थ वेळ दवडूं नये. वहिनींनें केलेल्या विनोदाचा सव्याज मोबदला दिला पाहिजे. " असा विचार करून यमुनेनें पुरुष-वेषांतच जोधाबाईला आलिंगन दिलें व आपले दोन्ही हात तिच्या गळ्यांत घातले.

" असें काय करतां? कांहीं शुद्धिवर या! मला सोडा. माझा गळा अगदीं जखडून गेला." बळ सहन न झाल्या-मुळें जोधाबाई ओरडली.

जोधाबाईचे हे शब्द पुरे होतात न होतात तोंच यमु-नेनें आरड मारली–" अरे! कोणी धांवा! वहिनीच्या अंतःपुरांत कोणी परपुरुषानें प्रवेश केला असून तो वहि-नीवर बलात्कार-करित आहे. "

आपला गळा सोडविण्यासाठीं व यमुनेचें तोंड बंद करण्यासाठीं जोधाबाई जसजसा अधिकाधिक यत्न करूं लागली तसतसा तिचा गळा अधिक दाबून यमुना अधिक-मोठ्यानें ओरडूं लागली.—

" अरे कोणी जलदीनें धांवा! घात झाला! हायरे जगदीश! अरे कोणी दुष्ट पुरुष वहिनीच्या पातिव्रत्याचा भंग करित आहे. अरे धांवा! "

यमुनेचा हा उच्छृंखलपणा पाहून जोधाबाई शेवटीं हरली व ती रडूं लागली. तरी पण तिला न सोडतां

विनोदी यमुना पुन्हां पुन्हां तिला विचारूं लागली—"काय म्हटलेंस—तुमच्या बंधुप्रमाणें पति असं पुन्हां म्हणशील का ?"

या विनोदाचा परिणाम असा झाला कीं, यमुनेनें ओरडून मारलेल्या हांका ऐकून बाहेर बसलेले कांहीं अनुचर आंत धावून आले. व गृहस्वामी पृथ्वीराजही त्या ठिकाणीं येऊन दाखल झाला. आंत येतांच त्यानें "काय झालें !" असा प्रश्न केला. ही मंडळी आंत यण्यापूर्वींच यमुनेनें आपल्या खोलींत पलायन केलें होतें. व पुरुष वेष उतरून निद्रेचें मिष करून ती आपल्या शय्येवर पडून हाती.

बिचारी जोधाबाई तरी काय उत्तर देणार ! तिनें हंसत हंसत मात्र एवढेंच म्हटलें—"कांहीं नाहीं. यमुना वन्संच्या विनोदाचा हा परिणाम"

"यमुनेचा विनोद. हं ! तर मग ठीक ! चालूं दे ! आतां माझ्या जीवांत जिव आला. मला वाटलें कोणी दुष्ट पुरुष दिवसाढवळ्या माझ्या घरांत शिरला कीं काय ! यमुना बिचारी भोळी उच्छृंखल पोर. अजून तिला संसाराचें तरी इतकें काय ज्ञान असणार कीं ती सारासारविवेक करील !" असें बोलून पृथ्वीराजानें गोष्ट संपुष्टांत आणून सर्वांच्या मनाचें समाधान केलें.

---



## द्वितीय परिच्छेद.

# पृथ्वीराज राठोड

—:०:—

" जखमी हो जीगर और दिले हमराज न बोले !
मिजराब लगे तारमें और साज न बोले ? "



कविद्याविशारद अकबरशहाच्या राजधानींत ह्मणजे दिल्लींत होणाऱ्या कित्येक गोष्टींचें आपणास आतां दिग्दर्शन केलें. पाहिजे ह्मणून थोडा वेळ आपणास राजस्थानास विसरलें पाहिजे. गतपरिच्छेदांत वर्णन केलेली घटना दिल्लींतच घडली होती. तेव्हां यमुना कोण, जोधाबाई कोण व पृथ्वीराज कोण हें समजून घेण्याची वाचकांच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न होणें हें स्वाभाविकच आहे. वाचकांची ही जिज्ञासा तृप्त करण्याच्या हेतूनें आह्मांला येथें पृथ्वीराज व त्याचा परिवार यांचा संक्षिप्त वृत्तांत देणें आवश्यक आहे.

अकबर सम्राटानें कपट, युक्ति व चातुर्यादि गुणांनीं अनेक रजपूत राजांना स्वाधीन करून घेतलें होतें व कित्येकांना कारागृहांतही ठेविलें होतें. हीं गोष्ट इतिहासज्ञांस अवगत आहेच. बिकानेरचा राजा पृथ्वीराज राठोड हा दुसऱ्या वर्गांतील अर्थात कारागृहवासी राजा होता. दुर्दैवानें पृथ्वीराजाचें बाह्यस्वातंत्र्य तर नष्टच झालें होतें. पण त्याची मानसिक स्वतंत्रता केशमात्रही न्यूनता

पांवली नव्हती. कारण कीं त्यानें 'महादुर्लभ' असें मानलेल्या कविजीवनाचा स्वीकार केला होता. सत्य कवि व उदार मनाचा पुरुष दुर्भाग्यवशात् केवढ्याही संकटांत पडला असला तरी तो आपलें मानसिक स्वातंत्र्य, तेज व न्यायपरायणत्व यांचा कधिंही त्याग करित नसतो. शिवाय सरलता, सहृदयता, गुणग्राहकता व औदार्य हे कवींचे अलंकारभूत गुण त्याच्या अंगीं अवश्य निवास करित असतात. बिकानेरचा राजा पृथ्वीराज राठोड याचे अंगीं हे गुण पूर्ण वास करित होते. त्याचीं सुंदर, मनोहर, उत्साहवर्धक व शौर्योत्पादक काव्यें सर्वांचीं मनें एक सारखीं मोहित करून टाकित. त्याच्या काव्यांत एक प्रकारचा अलौकिक शक्तिप्रभाव दिसून येत असे.

दिल्लीश्वरानें या रजपूत कवीश्वराला महा कौशल्यानें बंदिवान करून आपल्या दरबारांत स्थान दिलें होतें. आपण बंदिवान आहों असें वाटून पृथ्वीराजानें दुःख करूं नये एतदर्थ अकबर सम्राटानें त्याची फार चांगली व्यवस्था केली होती व म्हणूनच त्याचा तो फार चांगला मानसन्मान राखित असे; परंतु आनंदपूर्वक स्वच्छंद विहार करणाऱ्या स्वतंत्र पक्षाला सुवर्णाच्या पिंजऱ्यांत ठेवून त्याला उत्तमोत्तम पदार्थ खाऊं घातले तरी ज्याप्रमाणें त्याच्या मनाला आनंद वाटत नाहीं त्याचप्रमाणें पृथ्वीराजाला इतर सर्व गोष्टी अनुकूल असूनही स्वातंत्र्याभावामुळें त्याचें मन रात्रंदिवस खिन्न असे. प्रेममयी सती सहधर्मिणी, दासदासी, तसेंच स्नेहमयी भगिनी

इत्यादि सर्व गोष्टी अनुकूल असतांही केवळ स्वदेशस्वातंत्र्यासाठीं आत्मत्याग करण्याची शक्ति स्वतःचेठायीं नसल्यामुळें त्याचे मनोव्यथेला पार राहिला नव्हता. स्वतः रजपूत असूनही कवित्वाचा स्वीकार करून युद्धविद्येचा परित्याग करण्याबद्दल त्याला फार खेद होत असे. अनेकवार निराश होऊन, स्वतःचा धिःकार करून तो म्हणत असे " हाय हाय! धिःकार असो मला व माझ्या दुर्दैवी जीवनाला! दुष्ट मोंगलांनीं मेवाडचें सर्वस्व हरण करून घेतलें आहे. पण मी मेवाडवासी असूनही त्यांचा अनुग्रहाभिलाषी होऊन जीवितधारणा करून स्वस्थ राहिलों आहे! स्वदेशस्वातंत्र्यरक्षण व जन्मभूमीचा उद्धार हे विषय माझ्या मनांत केवळ कल्पनामय होऊन राहिले आहेत!! धन्य! धन्य त्या प्रातःस्मरणीय पुण्यश्लोक प्रतापी प्रतापसिंहाची! एकटा असूनही स्वदेशोद्धार कार्यांत अखून तो तनमनधनें करून निमग्न राहिला आहे! अरेरे! जर मला या वेळींही त्याच्या विजयपताकेचें संरक्षण करण्याचा प्रसंग लाभला असता तर माझें जीवन अल्पांशानें तरी सफल होऊन माझी मानसिक व्यथा दूर झाली असती. हाय हाय! क्षत्रियवीर्योत्पन्न असूनही माझ्या हातून स्वदेशोद्धाराचें कार्य होऊं नये! माझी आवेशयुक्त कविता ऐकून रजपूतवीरांच्या मनांत द्विगुणित आवेश व अवसान उत्पन्न होण्याचा संभव होता; व त्या काव्यश्रमानें पराक्रमी प्रतापसिंहाच्या मनांत स्वकर्तव्य बजाविण्याचे कामीं अधिक जागृति व उत्साह उत्पन्न

झाला असता. पण त्या काव्याचा मी जो बिकानेरचा राठोड पृथ्वीराज तोच अकबराचा अंकित! या दुर्दैव दुर्विलासाला काय ह्मणावें? "

फक्त एकाच गोष्टींत पृथ्वीराज महा भाग्यवान होता. त्याची पत्नी अद्वितीय गुणवती होती. अर्थात तिच्या सहवासानें आपलीं अनेक दुःखें विसरून जाऊन तो आनंदात असे. रूपगुणांनीं पृथ्वीराजाची पत्नी सर्वथैव सुशील होती ही केवळ कवि कल्पना नव्हे तर इतिहासही याबद्दल पाहिजे तशी साक्ष देत आहे.

या रमणीय रत्नाचा वाचकांना गत परिच्छेदांत परिचय झालाच आहे. अर्थात गत परिच्छदांतील जोधाबाई हीच पृथ्वीराजाची पत्नी. जोधाबाई सर्व उत्तम गुणांनीं विभूषित होती. तिच्या अंगीं अणुरेणु एवढाही दोष नव्हता. प्रिय वाचक कदाचित् अशी शंका घेतील कीं आह्मीं अतिशयोक्ति करित आहों पण खात्रीनें सांगतों कीं, आमची ही प्रशंसा अक्षरशः खरी आहे; व हळु हळु तिचा वाचकांना अनुभवही येत जाईल.

जोधाबाई ही महाराणा प्रतापसिंहाची पुतणी अर्थात शक्तिसिंहाची कन्या होती. जोधाबाई जितक्या उच्च कुळांत जन्मली होती तितक्याच उच्च कुळांतील तिला पती मिळाला होता. पृथ्वीराज महा सुंदर, गुणवान्, शूर, वीर व विद्वान होता. अशाप्रकारचा मणिकांचनयोग कधीं काळीं तरी निष्फल होईल काय?

असो. त्या नंतर इकडच्या तिकडच्या अनेक गोष्टीं संबंधीं बोलणें झाल्यावर पृथ्वीराज पुनः ह्मणाला—" प्रिये ! तुझें मुखकमल पाहिलें कीं मी सर्व दुःखें विसरून जातों. सुखांत तसेंच दुःखांत, संपत कालीं तसेंच आपत् काळीं तूं माझी सहचारिणी आहेस. तेव्हां आतां यमुनें विषयीं काय करावें तें सांग. यमुनेला अशी कौमार्यावस्थेंत किती दिवस ठेवायची. ?

पतीचा हस्त आपल्या स्कंधभागीं ठेवून जोधाबाईनें मधुरस्वरानें उत्तर दिलें.-" प्राणनाथ ! मी सुद्धां याच विचारांत आहें. त्यांच्या नाशिबीं काय लिहिलें.आहे कोण जाणें. आपण इतकीं स्थलें पाहिलीं,कित्येक ठिकाणांहून मागणीं आलीं. पण कुठेंच कांहीं निश्चित होत नाहीं. "

एक दीर्घ निःश्वास सोडून पृथ्वीराज ह्मणाला—" जर-आई अगर बाबा यांपैकीं कोणी ही जीवंत असते, तर मला बिलकुल चिंता करायला नको होती. त्यांनींच आपल्या अभिप्रायाप्रमाणें स्थल पसंत करून विवाहनिश्चय करून टाकला असता. पण आतां सर्व भार माझ्याच शिरावर आहे व मनाप्रमाणे तर एकही स्थल आवडून येत नाहीं." असें बोलून तो कांहीं विचारांत गढून गेला व अंमळशानें पुनःह्मणालाः—

" रजपुतांची सद्यःस्थिती पहातां असें वाटतें कीं कन्येचा. अगर भागिनीचा विवाह करणें हें आजकाल फारच मोठें विचाराचें व जोखमाचें कार्य झालें आहे. कित्येक नीच कुलांगार रजपुतांनी द्रव्याधिकार—लोभतृष्णेनें

आपला कुलाभिमान व नांव लौकीक यांस तिलांजली देऊन यवनांबरोबर शरीरसंबंध केला आहे ! छे ! प्राण गेला तरी बेहत्तर पण हा निंद्यमार्ग मी कधिंही स्वीकारणार नाहीं. दुर्दैवाच्या प्रबल तडाख्यानें माझें बाह्य स्वातंत्र्य जरी नष्ट झालें आहे तरी माझ्या मानसिक स्वातंत्र्यांत तिळमात्रही न्यूनता पडलीं नाहीं. त्या मनःस्वातंत्र्याचा आतां यमुनेमुळें नाश होणार काय ? जगदीशा ! या संकटांतून पार पाडणारा तूंच एकटा समर्थ आहेस. "

पृथ्वीराज पुनःविचारांत निमग्न झाला व थोड्या वेळानें पुन्हा ह्मणाला—" पण आतां यमुनेला आणखी किती दिवस अशी कौमार्यावस्थेंत ठेवायची. आर्यधर्मा प्रमाणें एवढ्या मोठ्या कन्येला अविवाहित ठेवणें हें मोठें पाप आहे. समजून उमजून मी या पातकाचा अधिकारी होऊन माझ्या पूर्वजांनाही नरकवासी बनवीत आहें. काय माझं दुर्दैव तरी ! प्राण गेला तरी बेहत्तर ! पण माझ्या हातून तरी यवनांशीं शरीरसंबध खास होणें नाहीं. यमुना आजन्म कुमारी राहिली तरी पुरवेल. पण हा कुलकलंक पुरवणार नाहीं. प्रिये ! तुझा कसा काय अभिप्राय ?"

" प्राणनाथ ! आपला अभिप्राय तोच माझा. आपल्या मतापासून माझें मत कधिंकाळीं तरी भिन्न असणें शक्य आहे काय ? " जोधाबाईनें उत्तर दिलें.

" पण यमुनेची काय इच्छा आहे हें तरी तुला ठावूक आहे कीं नाहीं ? तिला कसा काय नवरा पाहिजे ?" पृथ्वीराजानें विचारिलें.

एक दीर्घ निःश्वास टाकून जोधाबाई म्हणाली— " त्यांची जी इच्छा माझ्या नजरेस आली आहे तिचा विचार करितां परिणाम कांहीं ठीक दिसत नाहीं. "

पृथ्वीराजानें मोठ्या उत्कंठेनें विचारिलें—" तो कसा काय ? "

" कोणाही भ्रष्ट रजपुताशीं विवाह न करण्याचा त्यांचा निश्चय आहे. विवाहसंबंध करणें तो प्रताप वंशांतील कोणाही वीर पुरुषाशीं करावा अशी त्यांची इच्छा आहे. " जोधाबाईनें यमुनेच्या इच्छेचें दर्शन केलें.

" खरोखर यमुनेला हें योग्य आहे. " असे पृथ्वीराजानें आनंदपूर्वक उद्गार काढिले.

" योग्य आहे ही गोष्ट खरी. पण त्यांत किती संकटें सोसावीं लागतील याचा कांहीं विचार त्यांनीं केला आहे काय ? जितकें वाटतें तितकें हें कार्य सहज व सरळ रीतीनें पार पडेल असें दिसत नाहीं. " जोधाबाईनें स्वतंत्रपणें आपला विचार व्यक्त केला.

" या कार्यांत किती संकटें सोसावीं लागतील हें मी सुद्धां जाणून आहें. नाहीं असें नाहीं पण प्रिये! यमुनेची ही इच्छा प्रशंनीय नाहीं काय ? सर्वच स्त्रियांची अशी उच्चतम इच्छा असूं शकणार नाहीं. ईश्वर तिची इच्छा पूर्ण करो. पृथ्वीराजानें यमुनेची स्तुति करून तिच्या मनोभावाची सिद्धि इच्छिली.

" दैवाच्या मनांत आलें तर तसेंही होईल. पण आमचें एवढें भाग्य कुठें आहे ? वत्संना इच्छित वराची

प्राप्ति होईल काय ? कां होणार नाहीं ? होईलही ! " असें बोलून जोधाबाई किंचीत् अडखळून ह्मणाली —" बरें पण हळदी घांटच्या युद्धांत महाराणाजींचा पराजय झाल्यावर माझ्या बाबांनीं काय केलें या विषयीं आपल्याला कांहीं बातमी कळली कां ? "

" पराजय झाल्या मुळें राणाजीच्या मनांत फार खेद झाला होता. पण इतक्यांत बन्धु येऊन मिळाल्या मुळें त्या खेदाचें पर्यवसान आनंदांत झालें. त्यांच्या मनांत पुनःत्यांच्या व्रतोद्यापनेंची आशा नूतनतेने जागृत झाली आहे " पृथ्वीराज म्हणाला.

" असें झाल्या मुळें माझ्यावरचा एक कलंक नाहींसा झाला. प्राणनाथ ! काय सांगूं ? ज्या दिवशीं माझे बाबा काकां बरोबर भांडून सूड उगविण्याच्या उद्देशानें बादशहास येऊन मिळाले. त्या दिवसापासून मला मी जिवंत असून मेल्या प्रमाणें होऊन गेलें होतें. इतरां बरोबर बोलणें तर सोडाच् पण आपल्याशीं सुद्धां मन मोकळें करून बोलण्याची मला मोठी लाज वाटे. प्रतिरात्रीं—आपण निद्रावश झाल्यावर मी अनन्यभावाने परमेश्वराची प्रार्थना करित असें कीं हे करुणासागरा देवा ! तूं रजपूतांना सद्बुद्धि दे ! ही गोष्ट आपल्याला ठावूक नाहीं. पण आतां मला मोठा आनंद वाटतो कीं, मला माझ्या प्रार्थनेचें फळ मिळालें. माझ्या बाबांचा व काकांचा पुनः संभेट झाला. हें खरोखर मेवाडचें सद्भाग्यच समजलें पाहिजे. " असे जोधाबाईनें आनंदोद्गार काढिले.

खरोखर गृहकलह हेंच सर्व अनर्थांचें मूळ आहे. गृहकलहा मुळेंच या भारतवर्षाची अशी दुर्दशा होत चालली आहे. रजपूतांच्या वर्तमान दुर्दशेचें कारण तरी गृहकलह व आपआपसांतील फाटाफुट हेंच आहे. तुझ्या बाबांच्या व काकांचा अशा रीतीनें संधि होईल ही गोष्ट कोणाच्या स्वप्नींही नव्हती. या गोष्टीमुळें मोंगलांना सुद्धां मोठा विचार पडला आहे." पृथ्वीराजानें गृहकलहा मुळें होणाऱ्या हानीचें विवेचन केलें.

"मोंगलांना चिंता पडलीच पाहिजे. न पडली तरच आश्चर्य! माझ्या बाबांचें व काकांचें एकमत झाल्या मुळें मला वाटतें कीं आतां यमुना वन्संची मनोभावना कदाचित सिद्धीस जाईल." जोधाबाईनें आशा व्यक्त केली.

"ती कशी?" असा पृथ्वीराजानें फार उत्सुकतेनें व अधिरतेनें प्रश्न केला व उत्तराची मार्गप्रतिक्षा करित तो अनेक विचारांत निमग्न झाला.

"काकांच्या जेष्ठ पुत्रांशीं—ह्मणजे आमच्या अमरसिंहाशीं कदाचित् वन्संचा विवाहसंबंध जुळण्याचा संभव आहे." जोधाबाईनें भावी आशा प्रकट केली.

पृथ्वीराज अतिशय आनंदित मुद्रेनें ह्मणाला-"महाराण्याच्या जेष्ठ पुत्राशीं यमुनेचा विवाह संबंध! एवढें मोठें भाग्य आपलें कुठें आहे!!"

"आपण माझ्या बाबानां पत्र लिहून या बद्दल जबाब मागवावा." जोधाबाईनें सल्ला दिला.

" तुझा सल्ला योग्य आहे. पण आपण अजून शत्रू-नगरांत वास्तव्य करित असल्यामुळें माझी इच्छा संफल होईल असा संभव मला दिसत नाहीं. कारण कीं, यमुने-वर कित्येक यवनसरदारांचा कटाक्ष आहे व तसेच कित्येक स्वदेशद्रोही कुलांगार रजपूत स्वतः भ्रष्ट असल्या-मुळें मलासुद्धां आपल्या पंक्तित ओढण्याच्या प्रयत्नांत आहेत. अशी स्थिति आहे तेव्हां ही गोष्ट जर बादशहाचे कानावर गेली तर तो माझी ही पवित्र इच्छा कधींकाळीं ही सफल होऊं देणार नाहीं. " पृथ्वीराजानें आपल्या भयाचें खरें खरें कारण दर्शविलें.

" खरोखर !—ही सुद्धां एक मोठी विचाराचीच गोष्ट आहे ! " असें म्हणून जोधाबाई कांहीं गहन विचारांत गर्क झाली.

" महाराणाजींना प्रातःस्मरणीय महापुरुष मानून मी त्यांची पूजा करितों तेव्हां त्यांच्या पुत्राशीं माझ्या भगिनीचा विवाहसंबंध होणार या कल्पनेनेंच माझा आनंद अनिवार्य होऊन गेला आहे. प्रिये ! महाराणा-जींच्या मूर्तिचें दर्शन घेतल्याशिवाय मी बिछान्यावरून उठत नाहीं हें तुला ठाऊक आहेच. महाराणाजींला मी साक्षात् परमेश्वराचाच अवतार मानीत असतों. तेव्हां अशांच्या पुत्राशीं माझ्या भगिनीचा विवाह होण्याइतका मी कुठून भाग्यशाली असणार ? " पृथ्वीराजानें महाराणा प्रतापसिंहाविषयीं आपला सद्भाव प्रकट केला.

" भाग्य असो अगर नसो; पण एकवार प्रयत्न करून

पहाण्यांत तर आपलें कांहीं नुकसान नाहीं ? " जोधाबाईनें पतीचा उत्साह वृद्धिंगत केला.

" बरें तर तसें करूं. पण यमुनचा मानस तरी काय तो सहज बोलतां बोलतां तिच्याकडून काढून घे." असें पृथ्वीराजानें सांगितलें.

" आपण सांगण्यापूर्वींच मला सर्व कांहीं समजून चुकलें आहे. आपणाला त्याचें कांहीं प्रत्यक्ष प्रमाण पाहिजे कीं काय ? " जोधाबाईनें विचारिलें.

" प्रत्यक्ष प्रमाण ! मला याचा कांहींच अर्थ समजत नाहीं. " पृथ्वीराजानें शंका दर्शविली.

" माझे बाबा मागें एकदां ज्या वेळीं येथें आले होते त्या वेळीं त्यानीं कित्येक आप्तइष्टांच्या तसबिरी बरोबर आणल्या होत्या ही गोष्ट आपल्या स्मरणांत असेलच " असें बोलून जोधाबाईनें आपल्या पतीला एका विशिष्ट प्रसंगाचें स्मरण करून दिलें.

" होय ! व त्यांतील एका तसबिरीवरूनच मी महाराणा प्रतापसिंहजीची प्रस्तरमयी मूर्ति तयार करून घेतली आहे. " पृथ्वीराजानें त्या वार्तेला अनुमोदन देतांना आपल्या स्मरणाचा परिचय करून दिला.

" त्यांतील कांहीं तसबीरी माझ्याकडे आहेत. एका तसबिरींत माझे बाबा, काका, व भाऊ वगैरे सर्वांचीं चित्रें असून त्यांत अमरसिंहाचेंही एक चित्र आहे. ही तसबीर वन्सं माझ्याकडून घेऊन गेल्या आहेत. व मी ती पुष्कळ वेळां मागितली तरी देत नाहींत. एकदिवशीं मी

सहज त्यांच्यां खोलींत गेलें होतें त्यावेळीं त्या त्या तसबिरीचें ध्यानंपूर्वक अवलोकन करित होत्या. तेव्हांपासून माझी खात्री होऊन चुकली आहे कीं अमरसिंहच त्यांना वर पसंत पडला आहे." जोधाबाईनें आपल्या कल्पनेचें कारण व्यक्त केलें.

पृथ्वीराज एक सहृदय कवि होता. किंचित् विस्मित् होऊन तो आपल्या पत्नीला ह्मणाला–" तसबिर पाहून जर यमुना अमरसिंहाच्या प्रेमपाशांत गुरफटून गेली आहे तर प्रत्यक्ष मूर्ति पाहून तिची काय अवस्था होईल याचें अनुमान करतां येत नाहीं. पण तूं हा विनोद तर करित नाहींस ना? मला तर असेंच वाटतें कीं, यमुनेनें आज तुला खूपच बनविल्यामुळें तूं त्याचा वचपा काढण्यासाठीं ही नवीन युक्ति शोधून काढिली आहेस!"

पृथ्वीराजाचें हें भाषण ऐकून जोधाबाई स्मितमुखानें ह्मणाली–" कवि एक गोष्ट दुसऱ्या रूपांत कशी सफाईनें फिरवून टाकितात त्याचें आज मी प्रत्यक्ष उदाहरण पाहिलें! भगिनीचें प्रेमरहस्य माझ्या तोंडून ऐकण्यासाठींच आपण एवढा वेळ गंभीरता धारण केली आणि थोड्या वेळांत गोष्ट कशी पण फिरविली? आपण काय ह्मटलं? केवळ चित्र पाहून यमुना वन्सं अमरसिंहाच्या प्रेमपाशांत बद्ध झाल्या. तेव्हां अमरसिंहास पाहून त्यांची काय अवस्था होईल? सांगा तर खरें काय अवस्था होईल ती? भगिनीभ्रात्याचा विनोद अप्रतिम तर खराच! असल्या युक्त्या कवींच्याच मस्तकांत येतात हो!"

पृथ्वीराज निरुत्तर होऊन मनांत ह्मणाला-" प्रेम राज्यांतील न्याय पद्धति अशीच असते. तसबिर पाहून कधीं कोणाच्या मुखानें वृत्तान्त श्रवण करून व क्वचित् स्वप्नांत प्रियदर्शन करून प्रेमिक व प्रेमिका आपल्याला भावी स्थळाचा निर्णय करितात. यांत आश्चर्य तें कसलें? साधारण लोकांना या प्रणयाचें अपूर्व रहस्य न समजल्यामुळें ते साहसपूर्वक प्रेमी जनांना दोष देण्यास तयार होतात. यमुना आतां वयांत आली आहे. महाराण्याच्या अपूर्व पराक्रमाचें वर्णन ऐकून व अमरसिंहाची देवतुल्य तसबीर अवलोकन करून ही बाला अमरसिंहाच्या प्रेमपाशांत बद्ध झाली यांत असंभाव्य असें काय आहे? चित्रांत मनुष्याच्या बाह्य आकृति बरोबर अंतःस्वभावाचेंही चित्र उमटलेलें असतें. पण ही अंतःस्वभावाची प्रतिमा सर्वांच्याच नजरेस पडते असें नाहीं. माझ्या भगिनीनें खरोखर योग्य वर पसंत केला. पण परमेश्वर तिची आशा पूर्ण करील काय?"

नंतर पृथ्वीराज आपल्या पत्नीला उद्देशून ह्मणाला—" प्रिये! मी आतांच तुझ्या पित्याला पत्र लिहितों. पुढें यमुनेचें नशिब!"

"मी ह्मणतें तें खरें कीं खोटें हें जर आपणाला पहाणें असेल तर माझ्याबरोबर आतांच यमुना बन्संच्या दिवाणखान्यांत. चलावें ह्मणजे माझ्या सांगण्याच्या खरेपणाबद्दल आपोआप अनुभव येईल." असें जोधाबाईनें आपल्या मताचें प्रतिपादन केलें.

पृथ्वीराजाच्या मनांत हें प्रत्यक्ष पहाण्याची फार उत्कंठा होती. तरी पण ती व्यक्त न करितां तो ह्मणाला–"छेः! पहाण्याची कांहीं आवश्यकता नाहीं, सत्य काय आहे तें मी जाणून चुकलों आहे!"

असें बोलून पृथ्वीराजानें मोठ्या प्रेमानें आपल्या पत्नीला चुंबनसुख दिलें. व तिनेंही एका स्निग्ध कटाक्षपातानें त्याचा बदला दिला.

---

## तृतीय परिच्छेद.

# प्रेम-पिपासा.

अस्तामित विषयसंगा मुकुलित नयनोत्पलामुहुःश्वसिता,
ध्यायति किमप्य लक्ष्यं बाला योगाभियुक्तेव ॥

गोवर्धनः



मुने! ही तुझी काय दशा? जोधाबाईचें बोलणे शेवटीं सत्य झालें ना? इतक्या अल्पकाळांत तुझ्या चंचल स्वभावाचा कसा लोप झाला? हरिणशिशुसमान तुझ्या आनंदयुक्त वर्तनाचें हल्लीं कुठें दर्शन होत नाहीं. याचें कारण काय? तुझें विनोदी भाषण व मनोरंजक हास्य यानीं कुठें प्रयाण केलें? तुझें स्मितपूर्ण मुखमंडल आज असें म्लान कां दिसत आहे? नेत्र नीरमय होऊन कपोलभागांतून मंदाकिनी धारेचें चलन दिसतें आहे याचा अंतस्थ हेतु

तरी काय ? यमुने ! तूं शोकमग्न असूनही इतकी रमणीय दिसत आहेस ! कदाचित् निसर्गदेवतेचा हा अद्वितीय प्रभाव असेल. दुसरें काय ?

पर्यंकशय्येंत पडून अशी लक्षपूर्वक तूं कोणत्या प्रतिमेचें अवलोकन करण्यांत लीन होऊन गेली आहेस ? प्रतिमा हातीं असूनही तुझ्या मनाचें समाधान होत नसल्यामुळें त्या प्रतिमेला वारंवार तूं आपल्या वक्षःस्थलाच्या स्पर्श-सुखाचा अनुभव देत आहेस असें दिसत आहे. ही प्रतिमा ज्याची तो भाग्यवान् पुरुष कोण बरें ? कुमार अमरसिंह तर नव्हे ? हाच तुझा इच्छित पति कीं काय ? यालाच का तूं आपलें जीवनसर्वस्व अर्पण केलें आहेस ! हाय हाय ! मुग्ध बाळे ! तूं पतंगवृत्तीनें दीपज्योतींत कां बरें प्रवेश केलास ? दैवेच्छा दुसरें काय ?

जोधाबाईनें आपल्या पतीला जी गोष्ट सांगितली होती तीच शेवटीं खरी ठरली. कारण कीं तसबीरींतील इतर सर्व प्रतिमा झांकून यमुना एकाग्र मनानें केवळ अमरसिंहाच्याच प्रतिमेचें अवलोकन करित पडली होती.

मौन्यस्थितींत कांहीं वेळ गेल्या नंतर यमुना आपल्या मनाशींच बोलूं लागली—"हाय ! दरिद्रीपुरुष रत्न-सिंहासनाची जर इच्छा बाळगूं लागला तर त्याला तें कोठून लाभणार ? या दैवाला साध्य करून घेण्याइतका माझा पुण्यसंचय कोठें आहे ? तेव्हां हें रत्न मला कसें प्राप्त होणार ? विधात्यानें हें नररत्न कोणा भाग्यवान्

कोसाठीं निर्माण केलें आहे बरें? मी अभागिनी त्याची व्यर्थ आशा बाळगतें!!"

"महाराणाजी अजून सहपरिवार वनवासी आहेत. तेव्हां अमरसिंह पित्यासंगें वनवासीच असणार. शिवाय व्रतोद्यापना झाल्याशिवाय कोणत्याही प्रकारचा आनंदोत्सव न करण्याचा महाराणाजींचा दृढसंकल्प आहे. व त्यामुळेंच अमरसिंह अविवाहित आहे. पण व्रतोद्यापना झाल्यानंतर? नंतर काय? त्यांचा विवाह होणार. त्यांच्या विवाहाचा विचार मनांत येतांच माझे नेत्र कसे पाण्यानें भरून येतात. छाती धडधडते! अरेरे! मी तर केवळ एक सामान्य राजकुमारीच आहें. पण महाराण्याची स्नुषा होण्याच्या आशेनें दुसऱ्या किती राजकन्या नित्य शिवपूजन करित असतील बरें! असा सर्वगुणसंपन्न पती आपल्या कन्येला प्राप्त व्हावा या आशेनें कित्येक मातापितरें ईश्वराची आराधना करित असतील!!"

"या विफलीभूत आशाग्निनें मी स्वतःला कां बरें दग्ध करून घेत आहें! या अशा आशेचा त्याग करणें हाच मला उत्तम व लाभकारक मार्ग आहे. पण आशा तरी कसची सुटते: लोकांना वाटतें तितकें हें कार्य सुलभ आहे काय? जर माझ्या मनोराज्यांतील स्वामी माझे हृदयेश्वर–प्राणाधार–माझ्या गळ्यांतील हार मला प्राप्त झाले नाहींत तर मी त्यांना विसरावें कीं काय? छे! छे! मला तें योग्य दिसत नाहीं. मी त्यांना विसरेन हें मला शक्यही दिसत नाहीं!!!"

" या निर्जीव चित्राचें दर्शन करण्या पेक्षां अधिक सुख माझ्या नशिबींच नाहीं कीं काय ? यांच्या सजीव मूर्तीचा दर्शनलाभ मला एकवार सुद्धां होणार नाहीं काय ? कां बरें नाहीं होणार ? मी त्यांच्या दर्शनाने माझे नेत्र अवश्य पवित्र करणार. सुंदर वस्तूंच्या दर्शनाचा सर्वांना अधिकार आहेच. एकवार-फक्त एकवार-त्यांच्या मुख-चंद्राच्या दर्शनानें मी माझ्या आत्म्याचें समाधान करीन व नंतर मोठ्या आनंदानें मृत्युची मार्गप्रतिक्षा करीत बसेन ! माझ्या मनांतील एवढी ही अल्प आशा परमात्मा पूर्ण करणार नाहीं काय ? खात्रीनें करील ! "

मनुष्यरवानें गर्जत असलेलें व कृतिम सौंदर्यमय दिल्लीनगर कोणी कडे व तो निर्जन, निःस्तब्ध व स्वभाव सुंदर असा अरवली पर्वताचा रमणीय प्रदेश कोणीकडे ! मी अद्यापी मोगलांच्या या महापापमय नगरांत राहून अपूर्व स्वर्गसुखाचा उपभोग घेण्यांत दंग होवून गेलें आहे पण मला हें बिलकूल पसंत नाहीं. जर कोणाच्या प्रयत्नानें अगर कोणाच्या उपायानें माझी या कारागृहवासांतून सुटका होईल तर अंतरिक्षांतील स्वछंद विहार करणाऱ्या पक्षाप्रमाणें स्वतंत्रतेचीं पवित्र गीतें गात गात मी त्या स्वदेशाभिमानी महाराण्याच्या चरणाप्रत पोहंचून त्याची कृपा संपादन करण्याचा प्रयत्न करण्यास या क्षणींच तयार आहें. एकदां त्याची कृपा झाली कीं मग इच्छित वस्तू मागून घेण्यास कसला विलंब ? "

वहिनी अनेकवार ह्मणत असते की, महाराणाजींचे अनेक गुण अमरसिंहांत उतरले आहेत. स्वदेशासाठीं अश्रुवर्षण, स्वातंत्र्यरक्षणासाठीं सर्व सुखोपभोगाचा त्याग व कठोर व्रतःपालन करण्याचा पित्या प्रमाणेंच पुत्रानेंही स्वीकार केला आहे. खरोखर सर्व रीतीनें हा पित्याला अनुरूप पुत्र आहे. शिवाय इतके गुण अंगीं असूनही त्यांच्यांत रूपाची विशेषता आहे !! "

" पण मी हे विचार कोणा साठीं बरें करित आहें. ते वनविहारी ब्रह्मचर्य व्रतधारी वीर पुरुष कोणीकडे व मी ही भोगविलासरत अप्रबुद्ध कुमारीकोणीकडे ! जमीन अस्मानाचें अंतर ! अंतर केवढेंही असो पण तें कल्पनेला मात्र अगम्य नाहीं. आतां माझ्या मनावर माझा अधिकार राहिला नाहीं. कुमार अमरसिंहजींच्या चरणीं मी माझें जीवनसर्वस्व अर्पण केलें आहे. दैवानुकुल्याने माझी इच्छित वस्तू मला लाभली तर ठीकच. नाहीं तर आजन्म अविवाहित राहून एकनिष्टेने तींचें मानसपूजन करित राहीन. दैवाच्या प्रतिकुलतेनें जर त्यांची भेट झाली नाहीं, तर अदृश्य देवते प्रमाणें सदासर्वकाळ मी त्यांची मानस पूजा करीत राहीन. दुष्ट यवनानों ! जर तुह्मीं असा हा डाव साधला नसता तर—"

जोधाबाई दुरून हा करुणामय आदर्श पहात उभी होती हा आदर्श पाहून तिच्या नेत्रांत अश्रूंचा आविर्भाव झाला. यमुनेच्या भाषणांतील अंतीम वाक्य ऐकून ती मनांत

म्हणाली—दुष्ट यवनानों ! तुम्हीं जर हा डाव साधला नसता तर फार चांगलें झालें असतें. माझ्या पतीला बंदीवान् केल्या मूळेंच अशी ही दुर्दशा झाली आहे ! नाहीं तर वन्सं अशा आज अविवाहित कां राहिल्या असत्या ? अमरसिंहाशीं यांचा विवाह होणें ही गोष्ट कांहीं अशक्य नव्हती. वन्सं ! तूमचा हेतू मी, पूर्णपणें संमजून आहें. व त्याच्या सिध्यर्थ मी माझ्या कडून होईल तितका प्रयत्न करीन त्या बद्दल काळजी नको. ''

हा सर्व वृतांत जोधाबाईनें रात्रौ पतीला निवेदन केला व तो ऐकून पृथ्वीराज महा विचारांत निमग्न झाला व अशा विचारांतच रात्र निघून गेली.

---

## चतुर्थ परिच्छेद.

## प्राण श्रेष्ठ कीं प्रेम ?

---

" अनुराग परायत्ताः कुर्वन्ते किं न योषितः "

कथासरित्सागर.



रजोगुणवती रात्र समाप्त होऊन प्रातःकालीन प्रकाशाचा सर्वत्र प्रसार होऊन गेला. पृथ्वीराजानें आपल्या भगिनीला बोलावून आणिली व तिला आपल्या जवळ बसवून तो करुणापूर्ण स्वरानें तिला म्हणाला " यमुने ! आपल्या पूर्वज-

न्मीच्या दुष्कृत्यांच्या प्राबल्यानें आपला स्वातंत्र्य संहार झाला. लोखंडी पिंजऱ्यांत अडकून पडलेल्या सिंहाच्या पराक्रमाचा जसा लोप होऊन जातो तद्वत आमच्या शौर्याचाही लोप झाला आहे. माझ्या दुर्दैवानें तूं सुद्धां दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून फसली आहेस. बाल्यावस्थें-तच मातापित्याच्या प्रेमाला मुकलीस. व मी तुझा बंधु जीवंत असूनसुद्धां अद्यापि तुला सुखी करण्यास समर्थ नाहीं!"

"दादा! तूं हें काय ह्मणतोस तें मला नाहीं कळलें. माझ्या साठीं तुझ्या मनांत काय दुःख होतें तें विचार-ण्याची मला आज्ञा आहे काय?" असा यमुनेनें उलट प्रश्न केला. पण नंतर ती मनांत ह्मणूं लागली "माझ्या चित्तचांचल्याचें कारण कोणाला समजलें कीं काय? ज्या दुःखाग्निनें मी दग्ध होत आहें ती गोष्ट वहिनीला सम-जून तीनें ती दादाला सांगितली कीं काय? छट्! या साऱ्या निव्वळ शंका आहेत. असें होणेंच मुळीं अशक्य! कारण कीं, जरी माझ्या अंतरांत पीडा आहे तरी पण बाहेरून मी नित्य आनंदांत व विनोदांतच कालव्यय करित असतें. मग माझ्या मनांतील भाव माझ्या मुखावर तर उमटला नाहींना? माझ्या दुःखाची दादाला माहिती लागून त्याबद्दल तर त्याच्या मनांत चिंता नसेल? कोणी सांगावें? काय झालें तें कांहीं समजत नाहीं."

पृथ्वीराजानें उत्तर दिलें—"यमुनें! माझ्या दुःखाचें

फक्त एकच कारण नाहीं. तूं अजून एक उच्छृंखल कुमारिका आहेस. रजपूतांच्या स्वातंत्र्यनाशामुळें त्यांना आज किती दुःखें भोगावीं लागत आहेत याची तुला कल्पनाही नसेल. दुष्ट यवन आतां मेवाडचा नाश करण्याच्या प्रयत्नांत आहेत. व मोठ्या कौशल्यानें व कांहीं लोभ दाखवून ते रजपूतांना आपले दास बनवित चालले आहेत. कित्येक कुलांगार क्षत्रिय आपण होऊनच स्वधर्म, पराक्रम व कुळ यांस तिलांजलि देऊन यवनांच्या दास्यत्वाचा स्वीकार करूं लागले आहेत. हे सर्व प्रकार डोळ्यांनीं पाहूनही बंदिवान असल्यामुळें मला निमुटपणें सहन करित बसणें भाग आहे. यनुने! हे सर्व विचार ज्यावेळीं माझ्या मनांत येतात त्यावेळीं तुला काय सांगूं! हृदय फाटून जातें. मस्तक भ्रमण करूं लागतें, व सर्वत्र अंधःकार पसरलेला दिसतो! या करितांच मी ह्मटलें कीं, माझ्या दुःखाचें फक्त एकच कारण नाहीं."

जवळ जोधाबाईसुद्धां उभी होती. पतीच्या मुखांतून निघणारीं वाक्यें ती एकाग्रमनानें ऐकत होती. पृथ्वीराजानें संकेतानें तिला जवळ बोलाविलें. आज्ञाप्रमाणें जोधाबाई येऊन विनयानें पतीजवळ उभी राहिली. त्या नंतर पृथ्वीराज यमुनेला उद्देशून ह्मणाला—"आतां दुसरा विचार तुझ्याबद्दल. लज्जा व संकोच बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. तूं आपल्या मनांतील हेतू यत्किंचितही लपवूं नको. मला सर्व कळलें आहे. तुझा उच्च संकल्प व अप्रतिम निवड पाहून मी मनांत फार संतुष्ट झालों आहे.

पण हें काय तूं उठून चाललीस कुठें ? मी जें कांहीं बोलत आहे तें लक्षपूर्वक ऐक. ”

लज्जेने यमुना गोंधळून गेली. तिचें मुख रक्तवर्ण झालें. नेत्र अश्रूनीं भरून आले. व कोपयुक्तमुद्रेनें ती जोधाबाईकडे निरखून पाहूं लागली.

जोधाबाई यमुनेपाशी गेली व तिच्या खांद्यावर हात ठेवून उभी राहिली. यमुनेनें आपलें मस्तक जोधाबाईच्या अंगावर टाकलें व ती अधोमुख तटस्थ उभी राहिली. यावेळींसुद्धां यमुनेचा विनोदीस्वभाव लपून राहिला नाहीं. आपल्या बन्धूला न कळेल अशारीतीनें ती जोधाबाईला चिमटे काढूं लागली. स्नेहमयी जोधाबाई कांहींही न बोलतां मनांत ह्मणूं लागली-“ यांची उच्छृंखलता अजून सोळा आणे कायम आहे. स्वभावांतही कांहीं सुधारणा झालेली दिसत नाहीं. ”

पृथ्वीराज ह्मणाला-“ यमुने ! महाराणा प्रतापसिंहजीच्या जेष्ट पुत्राशीं तुझा विवाह व्हावा अशी माझी उत्कट इच्छा आहे पण आपण हल्लीं ज्यास्थलीं वास्तव्य करित आहों त्यास्थलीं राहून ही इच्छा सफल होईल अशी आशा बाळगणें व्यर्थ आहे. एतदर्थ कोणत्याना कोणत्यातरी उपायानें तुला महाराणांजीकडे पाठविण्याचा मी निश्चय केला आहे. तुझी याला अनुमति आहेना ? ”

यमुनेच्या अंतःकरणसमुद्रांत एकाएकीं भयंकर लहरींचा उद्भव झाला. ती स्तब्ध उभी होती. तिच्या तोंडांतून एकही शब्द निघेना.

" मौनं संमति लक्षणम् " असें समजून पृथ्वीराजानें आपलें भाषण पुढें चालविलें.-" या सोबत दुसरेंही एक कार्य तुला करावयाचें आहे. " असें ह्मणून त्यानें भयपूर्वक इकडे तिकडे दृष्टि फेंकली, व नंतर तो ह्मणाला " अकबर सम्राट महाचतुर व धूर्त राज्यकर्ता आहे. जोंपर्यंत मोंगलसाम्राज्य त्याच्या अधिकारांत आहे तोंपर्यंत रजपूतांचें डोकें वर होण्याची फारच थोडी आशा आहे. अजूनही आशा बाळगण्याला एक स्थान आहे व तें पुण्यश्लोक महाराणा प्रतापसिंह होय. त्यांनीं आजवर आपल्या व्रताचें अबाधित पालन केलें आहे. यमने ! तूं तिकडे जाऊन त्यांच्या या महाव्रतपालन कार्यांत सहाय्य कर. तूं हें क्षत्रियरमणीचें कर्तव्य मोठ्या दक्षतेनें बजाविलेंस तर त्यामुळें मला जितका आनंद व संतोष होईल तितका आनंद व संतोष दुसऱ्या कशानेंही होणार नाहीं. ज्या ज्या वेळीं महाराणाजी अल्पांशानेंही खिन्न दिसतील त्या त्यावेळीं त्यांच्या प्रेमळ कन्येप्रमाणें मोठ्या नम्रतेनें त्यांच्या सन्निध जाऊन त्यांना माझ्या उत्साहवर्धक कविता मधुरस्वरानें गाऊन दाखवून त्यांची खिन्नता दूर करण्याचा प्रयत्न कर. मोंगलांच्या कृत्रिमतेनें व स्वज्ञातियांच्या कृतघ्नतेचें स्मरण झाल्यानें जर महाराणाजी अश्रुवर्षाव करित असलेले दृष्टिस पडले तर तत्काळ सहिष्णुतेची मूर्तिमति प्रतिमा बनून माझ्या या मनमोहिनी वाणीचा अमृतसमान प्रवाह त्यांच्या कर्णांत प्रवाहित कर. ज्यावेळीं

दारिद्य व निराशा यांनीं ते अस्थिर/ झालेले आढळतील त्यावेळीं तूं परमेश्वराचें स्मरण करून देऊन त्यांना शांत कर.-असें केल्यानें त्यांनां इतकें तरी सुख वाटेल कीं एक तर एक-पण अमुक एक रजपूत आपल्या दुःखांचा वांटेकरी होऊन शत्रूच्या बंधनांत असूनही आपणाला सहानुभूति दर्शवून प्रोत्साहन देत 'आहे. असली सहानुभूति एकप्रकारची महामूल्यवती वस्तु आहे. या सहानुभूतीच्या प्रभावानें अनेक असाध्य कार्यें सुसाध्य होतात. पृथ्वीराज त्यांचें महाव्रत पाहून त्यांचा पूर्ण भक्त बनला आहे. अशी त्यांची पूर्ण खात्री कर. म्हणजे कोणत्याही प्रसंगीं बादशहाच्या दरबारांतसुद्धां महाराणाजींचें यशोगान गाऊन परधर्मी यवनांच्या मनांतही आदर उत्पन्न करण्याचा मी प्रयत्न करीन."

"पण नंतर? प्रस्तुत विषयासंबंधानें—"

जोधाबाईला पुढें बोलूं न देतां पृथ्वीराज तिला म्हणाला—"असें केल्यानेंच माझे सर्व उद्देश सिद्ध होण्याचा संभव आहे. महाराणाजी महाचतुर व पूर्ण राजनीतिज्ञ आहेत. इतक्यानेंच त्यांना सर्व कांहीं समजेल, नंतर मी महाराणाजींना व तुझ्या बाबांना पत्रें लिहून कळवीन. यमुनेनें येथून पुरुषवेषानेंच निघून जावें हें बरें. काय यमुने! तुझ्या हातून एवढें कार्य पार पडेल ना? याशिवाय येथून पळून जाण्याला दुसरा उपाय दिसत नाहीं व म्हणूनच मी या निंद्य उपायाची योजना

केली आहे. असें न केलें, तर हे दुष्ट यवनें आपणाला अनिवार त्रास देतील. यवनांची प्रथम पासूनुच तुझ्यावर पापदृष्टि आहे. यापेक्षां अधिक काय सांगूं? हा विचार मनांत येतांच हृदय विदीर्ण होऊन जातें—तुला यवनांची दासी व्हावें लागेल! व असें झाल्यानें येथील नीच देश-द्रोही कुलांगार रजपूत मलासुद्धां आपल्या पंक्तित ओढ-तील व बादशहासुद्धां आपल्या कुटिल राजनीतिचें जाळें पसरून चोहोंबाजूनें आपणास घेरून टाकील. या सर्व गोष्टींचा विचार करूनच मी तूं येथून पुरुषवेषानें पळून जाण्याच्या उपायाची योजना केली आहे. यमुने! तुझा इच्छित वर तुला प्राप्त होऊन तूं महाराण्याच्या कुटुम्बांत लक्ष्मीप्रमाणें पूज्य होशील असा मी तुला अंतःकरणपूर्वक आशिर्वाद देतों. अकबराच्या मनांत माझ्याविषयीं अद्यापि सद्भावना वसत असल्यामुळें आपल्या कार्यांत कांहीं एक विघ्न येण्याचा संभव नाहीं. एतदर्थ मी तुला गुप्तरीतीनें व कपटवेषानें दूर अरवली पर्वत प्रदेशांत पाठवून देण्याचा संकल्प केला आहे. तेव्हां नीट संभाळ व सावधपणानें वाग. आपलें रहस्य कोणाणाही कळतां नये." असें बोलून पृथ्वीराज तेथून निघून गेला.

बन्धूच्या गमनानें आपण महासंकटांतून मुक्त झालें असें यमुनेला वाटलें. बन्धूच्या आशिर्वादानें जणुं आपला इच्छित पति आपणाला लाभल्याप्रमाणें तिला आनंद झाला. पण वरप्राप्तिसाठीं जातांना आपल्या स्नेही अन्-

शृंगवती वस्त्रंचाहि त्याग करावा लागणार हा विचार मनांत येतांच तिला मोठें दुःख वाटलें. या सुखदुःखाचें प्रमाण वाचकांनीच आपल्या मानसिक तराजूंत तोलून पहावें. याविषयीं आम्हीं मूकवृत्तीचें अवलंबन करावें हेंच इष्ट आहे. कित्येक दिवस गेल्यानंतर एकेदिवशीं यमुनेनें जोधाबाईस विचारिलें " प्राण श्रेष्ठ कीं प्रेम ? "

## पंचम परिच्छेद.

# नौरोज.



आज दिल्लीनगर अद्वितीय नौरोज महोत्सवानें अगदीं गजबजून गेलें होतें. हा दिल्लीपतीच्या महदानंदाचा व महोत्सवाचा दिवस. शिवाय आज तर नवसुंदरींचा मेळा होता. अकबराच्या प्रेमाचा व सौंदर्याचा बाजार भरावयाचा होता. आजचा सतीत्वाच्या क्रयविक्रयाचा दिवस ! अर्थात रजपूतांना मृत्यूपेक्षांही विशेष क्लेशकारक होता. अरेरे ! या महोत्सववृत्तांत लेखनाचा प्रसंग आज या लेखकाला कां बरें प्राप्त झाला ? झाला खरा ! तेव्हां कर्तव्य बजाविलेंच पाहिजे !

ज्याचें नांव जगप्रसिद्ध आहे व " दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा " या उपमेनें हिंदु व मुसलमान या उभयतांसही पूज्य असा जो अकबर सम्राट त्याच्या दुश्चरितांचें

सत्यापलाप न व्हावा एतदर्थ आज इच्छेविरुद्धही वर्णन करणें भाग पडत आहे. प्रकाशाच्या मागें अंधकार रेखाटून ज्याप्रमाणें चित्राची पूर्णता करावी लागते त्याप्रमाणें पुण्यश्लोक प्रतापी प्रतापसिंहाच्या चित्राजवळ मोंगल सम्राट अकबराच्या नौरोजवृत्तान्ताचें 'चित्र रेखाटून ग्रंथाच्या वस्तुसंकलनाचा आम्ही प्रयत्न करीत आहों. अकबरभक्त वाचकवर्ग या अपराधाची ग्रंथकाराला क्षमा करतील अशी आशा आहे.

अबुलफझलनें नौरोज शब्दाच्या अर्थांत किंचित शब्दच्छल करून अकबराच्या कपाळींचा हा कलंक धुऊन टाकण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्याच्या या सत्याच्छादन-प्रयत्नामुळेंच उलट सत्य विशेष प्रकाशांत आलें आहे. अबुलफझल म्हणतो-" प्रत्येक महिन्याच्या मुख्य पर्वाच्या नवव्या दिवशीं ' नौरोज ' चा प्रारंभ होतो. नौरोजच्या दिवशीं सर्व मुसलमान आनंदसागरांत निमग्न असतात. बादशहा या दिवसांत एक महिला मेळा भरतो. त्याचा उद्देश एवढाच कीं, राज्यांतील मुसलमान सौदागरांच्या स्त्रिया एकत्र जमून राजरमणींनां त्यांच्यापासून आपल्या आवडीचे पदार्थ घेतां यावे. छद्मवेषानें बादशहा स्वतः या मेळ्यांत दाखल होतो, व त्याचें सत्य कारण असें कीं, त्यापासून राज्यांतील सत्यस्थिती, प्रजाजनांचें राजाविषयींचें मत, अधिकारीवर्गाची कार्यकुशलता व पदार्थांचा भाव इत्यादिकांची त्याला संपूर्ण माहिती मिळवितां

यांवी. याशिवाय असें करण्यांत बादशहाचा दुसरा कस-काही हेतु नाहीं. "

अबुलफझल कवि असो वा इतिहासकार असो पण त्याचें व आमचें या बाबतींत एकमत होणें शक्य नाहीं. तो जातीचा मुसलमान होता. अकबराचा आश्रित होता. व तशांत राजकवि होता. त्याची ही कृति त्याला स्वतःला योग्य वाटत असेल हें खरें. पण आमचा अभिप्राय नेहमीं भिन्नच असणार.

तर मग सर्व भाटकवि मिथ्यावादीच कीं काय? वीर-कवि पृथ्वीराजही मिथ्यावादी? छे. कदापि नाहीं. आम्हीं त्यांना केव्हांही मिथ्यावादी म्हणणार नाहीं. कारण त्यांच्या सत्यवादित्वाची आज एक नव्हें तर अनेक इतिहासग्रंथ साक्ष देत आहेत.

एकवार आम्हीं अबुलफझलचे म्हणणे मान्य करूं. पण, बादशहाच्या कपाळींच्या या कलंकाचा कधिकाळीं ही लोप होणार नाहीं. महिला मेळा भरविण्यांत व स्वतः त्यांत हजर असण्यांत अकबराचे अनेक स्तुत्य हेतू असतील. पण पुरुषाला स्त्रि-समाज्यांत जाण्याचा काय अधिकार? हा मेळा केवळ मुसलमान महिलांचाच नव्हता त्यांत रजपूत रमणींचा सुद्धां समावेश होत असे. तेव्हां चोरा-प्रमाणें छद्मवेषानें त्याठिकाणीं जाण्याचें अकबराला काय कारण? राज्यास्थिती इत्यादिकांचें अवलोकन करण्यासाठींच कीं काय? छे! कधींही नाहीं. हा एक सर्वथैव कंगडा

व खोटा बचाव आहे. दुसऱ्या अनेक मार्गांनीं राज्यस्थितीचें ज्ञान करून घेतां आलें असतें. स्त्रियांचा मेळा हा राज्यस्थिती जाणण्याचा प्रशस्त मार्ग असें कधींही म्हणतां येणार नाहीं. असें म्हणणारे मूर्ख समजले पाहिजेत. व ते एक पाप लपविण्यसाठीं दुसरें पाप करितात असेंच स्पष्टपणें म्हटलें पाहिजे सारांश परस्त्रियांबद्दल अभिलाषबुद्धि हेंच त्या ठिकाणीं जाण्याचें रहस्य असलें पाहिजे हें उघड दिसतें. अकबर बादशहा कपटनीतिपटु, महाबुद्धिवान व चतुर असल्यामुळें तो या मेळ्याच्या मिषानें मूर्ख लोकांच्या डोळ्यांत उघडपणें निव्वळ धूळ टाकून आपला कपट हेतू साध्य करून घेत असे, " तोंडीं धर्माचें नांव व हृदयीं जागृत कांम " अशीच त्याची दशा होती. दुर्बल हरिणीची शिकार करतां करतां आज त्याची एका सिंहीणीशीं गांठ पडली!

---

## षष्ठ परिच्छेद.

# महिला मेळा.

" अमृतस्यैव कुण्डानि रत्नानामिव राशयः
रतेरिव निधानानि निर्मिताः केन योषितः ? "



ति-स्तुतिपात्र व सर्वथैव सुंदर अशा एका भव्य व विशाल चौकांत रूपसौंदर्याचा बाजार भरला होता. हें रूपसौंदर्य केवळ कविकल्पना नव्हे तर तें रूप व सौंदर्य, तो दर्श व स्पर्श प्रत्यक्ष व सत्य आहे.

वाचक ! चला. तयार व्हा. आज तुह्मांला अकबराच्या–मोठा ह्मणवून घेणाऱ्या बादशहाच्या–नौरोज मेळ्याची लीला दाखविण्याचें मनांत आहे. घाबरण्याचें कारण नाहीं. कोणी छडीदार, चोपदार तुह्मांला अडकविणार नाहीं. त्यांच्या अंगीं तुह्मांला अडकविण्याचें सामर्थ्यच नाहीं. या मेळ्यांत जाण्याची आह्मांला सदर परवानगी आहे. सर्वांचे मनोगतभाव जाणण्याची आमचे अंगीं शक्ति आहे. त्या शक्तिनें आह्मीं तुह्मांला हुबेहुब लीला दाखवूं. चला तर.

कोणत्याही स्थलीं दृष्टिपात करा. कीं तत्काळ डोळे दिपून जातात. सर्वत्र युवती, प्रौढा, मध्या, किशोरी व बाला आदिकरून भिन्न भिन्न वयाच्या अबलाच दृष्टिगोचर होत आहेत. खरोखर त्याठिकाणीं यावेळीं हें एक नूतनरमणीराज्य स्थापन झालें आहे कीं काय असा भास होतो. या राजांत कोणी सोळा वर्षांच्या तर कोणी अठरा वर्षांच्या, कोणी पंचवीस तर कोणी तीस वर्षांच्या अशा सर्व वयांच्या वनिताच दृष्टिस पडत आहेत. या रमणीराज्यांत प्रवेश करून दिल्लीश्वर अकबर निर्विकार चित्तानें राज्यांतील स्थितीचें अवलोकन करित आहे !

हरहर ! मुनीचेंही मन ज्यांच्या दर्शनानें चळून जाईल, ज्यांच्या कटाक्षबाणानें परमहंसयतीची ही चित्तवृत्ति विकृत होईल व ज्यांच्या सौंदर्यप्रभावानें महासंयमी पुरुषसुद्धां भ्रष्ट होईल अशा जगन्मोहिनी महि-

लांच्या मेळ्यांत प्रवेश करून निरस राज्यस्थितीचें समिक्षा? कदाचित असेलही! अजून नाहीं कसें ह्मणावें! पण सत्यरहस्य आपोआप बाहेर येईल.

एका भव्य व विशाल चौकांत मोहिनी मेळा भरला होता. हें वर सांगितलेंच आहे. कोणा सुंदर युवतीचें सौंदर्य वर्णन करण्यास कविजनांना किती आयास व श्रम पडतात व कल्पनाशक्तीचा केवढा मोठा व्यय करावा लागतो. हें सर्वांना विदीत आहेच. प्रस्तुतः लेखक सर्वथैव शक्तिविहीन असून निस्तेज भाषावान् आहे. तेव्हां त्याच्या हातून अनेक मोहिनीमूर्तींचें यथार्थ सौंदर्य वर्णन होणें शक्य नाहीं. लावण्यवती स्त्रीवाचकजनहो! तुह्मी स्वतःच्याच प्रतिबिंबाचें दर्पणांत दर्शन करा. व पुरुषवाचक! तुह्मीं आपापल्या प्राणाधिष्ठात्री प्रियकरणीच्या रूपाची मनांत प्रतिमा उभी करा. म्हणजे या सुंदरींची कांहीं कल्पना तुह्मांला होईल. यापेक्षां अधिक वर्णन करण्याचें सामर्थ्य आमचे अंगीं नाहीं.

नील, ताम्र, श्वेत, पीत् इत्यादि विविधरंगी वस्त्रें परिधान करून, गळ्यांत अनेक प्रकारचे अलंकार धारण करून महाधीर व मंद गतीनें रजपूत रमणीगण इतस्ततः भ्रमण करित आहे. त्यांचीं वसनें इतकीं सूक्ष्म व पारदर्शक आहेत कीं त्यांतून त्यांच्या शरीराच्या कांतीचें प्रत्यक्ष परिपूर्ण दर्शन होत आहे. उच्चतम सुवर्ण रंग, वर अनेक रंगी वस्त्रांची छटा पडल्यामुळें अधिक प्रभावशाली दिसत

आहेत. त्यांच्या सुवर्णांगावरील अत्तरांच्या सौगंध्यानें सर्व स्थान सौगंधयुक्त होऊन गेलें आहे. सुवासिक तांबूल सेवनानें रंगलेले अधर, सुलज्जित सुगंधयुक्त केशकलाप, मदनक्रीडा कुंजस्वरूप उन्नत वक्षःस्थल, चंचल कटाक्ष व दिव्य मुखश्री यांच्या अवलोकनानें जणूं या नौरोजरूपी सरोवरांत अनेक कमलिनी विकसित झाल्या कीं काय असा पूर्ण आभास होतो. या सरोवरापुढें उभा राहून छद्मवेषी मोंगलसम्राट् विकारहीन चित्तानें राज्यांतील वस्तुस्थितीचें अवलोकन करीत आहे!

अमीर उमरावांच्या स्त्रिया, बेगमा व बेगमकन्या, बहुमूल्य साटींनी, किनखापी व मखमली-वस्त्रें, परिधान करून अंगावर मूल्यवान भूषणें धारण करून व वरून मलमलीची एक बारिक ओढणी ओढून आनंदानें इकडे तिकडे संचार करित आहेत. असल्या या दृश्याची प्रत्यक्ष प्रहाणारालाच कल्पना होईल. अहाहा! त्यांच्या अप्रतिम लावण्यानें सर्व दिशा प्रकाशवती झाल्या आहेत. त्यांचे तीव्र कटाक्ष, त्यांची चंचल दृष्टि व त्यांचे हावभाव त्यांच्या स्वाभाविक सौंदर्यास अधिक दिपवून सोडित आहेत. आनंदसागरांत निमग्न होत्सात्या त्या मधून मधून एकमेकींच्या अंगावर पडून अडखळत आहेत. प्रेमानें एकमेकींच्या अंगावर गुलाबपाण्याच्या पिचकाऱ्या सोडीत असून एकमेकींवर पुष्पगुच्छांनें प्रहार करित आहेत. याप्रमाणें सर्वत्र आनंदीआनंद उडून गेला आहे. अशी ही विलास-

वती मोंगल विलासिनींची विलासलीला वर्णनातीत आहे. स्वाभाविक सौंदर्यांत कृत्रिम सौंदर्याचें मिश्रण झाल्यामुळें त्या स्थानाला नंदनवनाप्रमाणें शोभा आली आहे. राजनी. तीच्या मार्गाचें निरीक्षण करण्यासाठींच दिल्लीश्वर अकबर या स्थलीं आला असेल नाहीं बरें?

ज्या स्थलीं हा महिला मेळा भरविण्यांत आला होता त्याच्या चोहोंबाजूस उंच उंच भिंती उभारलेल्या होत्या व वरून चादरींचें आच्छादन केलें होतें. खालीं एक गालीचा अंथरून वर मखमलीच्या गाद्या पसरल्या होत्या सभोंवार फूलझाडांच्या कुंड्या व्यवस्थेनें मांडल्या होत्या. भिंती वरून बादशहाच्या व बेगमांच्या मोठमोठ्या तसबीरा व बिलोरी आरसे लाविले होते. इतस्ततः भ्रमण करणाऱ्या कामिनी या दर्पणांत आपआपलें स्वरूप अवलोकन करून आपणाला धन्य मानित आहेत. या विलासवती वनितांना विश्रांति घेण्यासाठीं ठिकठिकाणीं नानाप्रकारचीं आसनें मांडली आहेत. कुठें कुठें स्फटिक पात्रांतून मद्य भरून ठेविलें आहे. व कोणी स्त्रिया त्याचा अस्वादसुद्धां घेत आहेत. मोंगल कामिनी मद्य प्राशन करून आपल्या उन्मत्त यौवनांत उन्मादिनी शक्तीचा अधिक आविर्भाव करित आहेत. एकास्थलीं प्रस्तरपात्रांत व कांचपात्रांत नानाप्रकाची मेवामिठाई व जल भरून ठेविलें आहे. बहुधा हिंदु–नारीच याचा आस्वाद घेत आहेत. कुठें कुठें नर्तकींच्या नृत्यगायनाच्या विनोदानें थैथैकार उडून गेला

असून कित्येकस्थलीं सतार, बीन, ताऊस इत्यादि श्रुति मनोहर वाद्यांचा ध्वनि कर्णगोचर होत आहे. गायन, ऐकणाऱ्या सुंदरीच, गाणाऱ्या सुंदरीच व वाद्यें वाजविणाऱ्याही सुंदरीच. तेव्हां तेथें सौंदर्य न्यूनता कोठून असणार? सर्वत्र स्त्रियांनीं व्याप्त असलेल्या या स्थानीं मात्र एकच पुरुष-छद्मवेषी पुरुष-दृष्टिगोचर होत आहे. व तो स्वतः अकबर सम्राट्! या महिला मेळ्यांत गुप्त वेषानें हजर असण्यांत त्याचा आपल्याविषयीं आपल्या प्रजाजनांचा काय अभिप्राय आहे हेंच जाणण्याच्या हेतू असेल नाहीं बरें?

आज मोंगलरमणी क्षत्रियरमणींशीं फारच प्रेमाचें वर्तन करित असल्याचें दिसत आहे. त्यांच्या अनेक प्रकारच्या गप्पागोष्टी चाललेल्या ऐकूं येत आहेत. कोणाचा पति किती रूपवान, कोणाचा गुणवान्, कोणाचा विद्वान्, कोणाचा पराक्रमी, कोणाचें ऐश्वर्य अधिक व कोणाचें न्यून इत्यादि विनोदवार्ता चालल्या आहेत. अशा या प्रसंगाचें जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे. अप्रतिम सौंदर्यलहरीनीं नौरोज नदी परिपूर्ण-उसळून गेली आहे. या नदीच्या तिरीं बसलेला "दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा" आपलें राज्य चिरकाल कसें टिकेल याच विचारांत निमग्न झाला आहे. असेंच ना?

एकिकडे पण्यवीथिका भरण्यांत आली असून त्यांत हिंदु मुसलमान व्यापाऱ्यांच्या स्त्रियांनीं अनेक जातीचीं

मूल्यवान वस्त्रें विक्रीसाठीं मांडली आहेत व मोठ्या दक्ष-तेनें त्या आपला माल विकीत आहेत. त्यांना त्यांच्या मालाची दुप्पट दुप्पट चौपट चौपट किंमत येत आहे. रजपूत व मोंगल रमणी आपापल्या इच्छेनुसार माल खरेदी करीत आहेत, व पुढील वर्षी अशा अशा प्रकारचा माल आणा अशी दुकानदारांना सूचना करीत आहेत. सर्वत्र रमणींनीं व्यापून राहिलें आहे. माल विकणाऱ्याही रमणींच व माल खरेदी करणाऱ्याही रमणींच. मात्र एकच पुरुष तेथें विद्यमान आहे. तो कोण? मोंगलकुलतिलक अकबर! तो आपल्या राज्यांत काय काय न्यून आहे हेंच पहाण्या-साठीं या महिला मेळ्यांत आला आहे. खरें ना?

राज्यस्थिती व लोकमत समजून घेण्याची आकांक्षा परमेश्वराच्या मनांत असल्यास कोण जाणे! पण अकबर केवळ आपलें नांव कलंकित करण्यासाठींच या ठिकाणीं आला आहे-पातिव्रता प्रमदांच्या पातिव्रत्याचा भंग करण्या-साठींच या ठिकाणीं आला आहे!! या सौंदर्य पण्य-वीथि-केंत कोणी सुंदरी पसंत करून तिची मार्गप्रतिक्षा करित तो बसला आहे.

अकबराच्या मनांत भरलेली ही अपूर्व लावण्यवती ललना कोण असेल बरें? हिंदु कीं मोंगल रमणी? सती कीं असती? पुण्यप्रतिमा कीं पिशाचिनी? ती कोणीही असो पण आज तिची पवित्र कथा लिहून प्रस्तुत लेखक कृतार्थ होईल.

## सप्तम परिच्छेद
# शहांजादी व क्षत्रीय रमणी.

"गुणिनि गुणज्ञो रमते नागुणशीलस्य गुणिनि परितोषः"

पण्यवीथिकेंतील क्रयविक्रयाची समाप्ति झाल्या नंतर सर्व हिंदु मुसलमान स्त्रिया आनंदसागरांत निमग्न होऊन आसनांवर येऊन बसल्या होत्या. फक्त एकच रमणी खिन्न व उदास दिसत होती. तिच्या अंगावर अलंकार जरी थोडे होते तरी पण तिच्या स्वाभाविक सौंदर्यांत लेशमात्रही न्यूनता दिसत नव्हती. तिच्या जवळपास दुसरें कोणीही नव्हतें तरी पण ती एखाद्या राजमहिषीप्रमाणें चिंतामग्न दिसत होती. आनंदोत्सवांत तिचें यत्किंचितही लक्ष नव्हतें! आल्यावेळेपासूनच ती एका आसनावर आपल्या स्वातंत्र्य रक्षणाचा विचार करित बसली होती. दुसऱ्या कशाचेंही तिला ज्ञान का भान नव्हतें.

इतक्यांत एक शहाजादी तेथें आली व या क्षात्रिय रमणीपाशीं बसून तिला विचारूं लागली "आजच्या या आनंदसमयीं तूं अशी दुःखित कां दिसतेस?

या प्रश्नानें क्षात्रिय रमणी भानावर आली व तिनें उत्तर दिलें—"दुःखकरण्यासारखें कांहीं नाही. मी येथेंच बसून आनंदोत्सव पहात आहें.

" हें तुझें समर्थन खोटें आहे मी तर तुला केव्हांपासून या स्थितींत बसलेली पहात आहें.

तुझ्या दुःखाचें कारण तरीकाय ? "

" आपल्या या कृपादृष्टिसाठीं मी आपली अत्यंत आभारी आहें. खरोखर मी आनंदांत आहें. माझ्या मनांत खेद मुळींच नाहीं. " असा त्या क्षत्रियरमणीनें उडवाउडवीचा जबाब दिला. व किंचित् स्मित हास्य केलें. पण इतक्यांत तिला नकळत तिच्या नेत्रांतून दोन अश्रुबिंदु खालीं पडले ते शहाजादीनें पाहिले.

" तूं आपल्या दुःखाचें कारण सांगत नाहींस, पण मी तुला तुझ्या दुःखाचें कारण सांगूं कां ? " असें शाहाजादी कांहींशा वक्रदृष्टीनें ह्मणाली.

" सांगा तर खरें ! " क्षत्रिय रमणीनें मोठ्या शांतपणें अनुमती दिली.

" एक तर. हिंदु व मुसलमान रमणी अशा मोकळेपणानें एकत्र क्रिडा करित आहेत. ही गोष्ट तुला बिलकुल पसंत नाहीं, आणि हेंच तुझ्या दुःखाचें मुख्य कारण आहे. खरें कीं नाहीं ? " शहाजादीनें कारण दाखविलें.

" छे ! तसें कांहीं नाहीं. आपली कल्पना व्यर्थ आहे. रजपूत रमणी तर आजकाल तुमच्या कुटुंबांतील जणूं स्त्रियाच बनून गेल्या आहेत ! तेव्हां त्या तुमच्याशीं हंसत खेळत पाहून मला खेद कां बरें होईल ? " असें क्षत्रिय भार्येनें गंभीरपणानें उत्तर दिलें.

तेव्हां शहाजादी जरा नाक मुरडून ह्मणाली-" हा गळ्यांतून निघालेला विचार आहे. हें कृत्रिम समर्थन आहे. तुझ्या मनांतील भाव असाच असेल असें मला नाहीं वाटत. "

क्षत्रिय वनितेनें याला कांहींएक उत्तर दिलें नाहीं. शहाजादीचे हे शब्द ऐकून तिनें एक दीर्घोष्ण निःश्वास मात्र सोडला

शहाजादी ह्मणाली-" तूं पृथ्वीराजाची धर्मपत्नी आहेस तेव्हां साधारण स्त्रियांपेक्षां तुझी वृत्ति उच्च असणार यांत कांहींएक संदेह नाहीं. रजपूत स्त्रिया आमच्या बरोबर मिळून मिसळून वागतात हें पाहून तुला अनिवार दुःख होत आहे, व हेंच तुझ्या दुःखाचें कारण. नाहीं ह्मणूं नको ! मनांतील सत्यभाव लपवून ठेवण्याचा व्यर्थ प्रयत्न करण्यांत काय लाभ ? तुझी शोकसूचक दृष्टि व दीर्घ निःश्वासादि लक्षणें तुझ्या हृदयांतील भाव स्पष्टपणें उघड करीत आहेत. पण माझें म्हणणें असें आहे कीं, अशा ह्या हृदयवेदना सहन करण्यांत फायदा तो काय ? आपल्या स्थितीचा विचार कर ह्मणजे जें आहे तें दिसून येईल. "

क्षत्रिय रमणी उठून उभी राहिली. शहाजादीला कांहीं उत्तर न देतां दूर जाऊन उभें रहावें असें एकवार तिच्या मनांत आलें. पण अभिमानामुळें तिच्याकडून तसें झालें नाहीं. तिनें आपलें मस्तक जरा खालीं करून व दृष्टि स्थीर करून उत्तर दिलें-" माझ्या स्वतःच्या

स्थितीचा तो कसला विचार करायचा? कांहीं सूचना तर कराल!"

"विचार इतकाच कीं तुझा पति माझ्या पित्याचा आश्रित आहे. याचें स्मरण कर ह्मणजे झालें." शहाजादीनें गर्वपूर्वक सूचना केली.

क्षत्रियरमणीच्या प्रत्येक शिरेंतून वेगपूर्वक रक्त वाहण्यास सुरु झालें. कोपानें तिचें मुखमंडल अग्निसमान रक्तवर्ण होऊन गेलें. एकाएकीं तिच्या सर्व शरीरांतून विद्युज्ज्योतिप्रमाणें अपूर्व प्रकाश निघूं लागला. जवळच पडद्या आड उभा असलेला एक कामोन्मत्त नरराक्षस हा प्रकार पाहून त्या क्षत्रियनारीवर आसक्त झाला. दुर्दैवःप्राबल्यामुळें तो कामोम्मत्त नरपशु तत्क्षणींच त्या क्षत्रियबालेच्या दृष्टिस पडला. व त्याला पहातांच त्या कोमलांगी कामिनीची काया कंपायमान होऊं लागली.

क्षत्रियरमणीनें गंभीर व शांतभावानें शहाजादीस उत्तर दिलें—" शहाजादीसाहेब! कोणाचीही स्थिती सदासर्वकाळ एकसारखी रहात नाहीं. जो आज राजा आहे तो उद्यां भिकारी बनून जातो व भिकारी राजा होतो. हा जगाचा व्यवहारच आहे. दुसऱ्याला त्याच्या दुर्दशेचें स्मरण करून देऊन त्याच्या मनांस दुखविणें हें कांहीं शहाजादीला योग्य नाहीं."

"आह्मांला आमच्या कर्तव्याकर्तव्याचा व योग्यायोग्यतेचा उपदेश करणें हें आमच्याच एका आश्रित व

काफरपत्नीस योग्य नाहीं. मी सर्व रहस्य समजून आहे! माझ्या पित्याचा स्वभाव पडला परमदयाळु व उदार म्हणुनच त्यानें तुझ्या विश्वासघातकी पित्याला क्षमा केली:"

अशाप्रकारें त्या आर्य अबलेला अनेक मर्मभेदक व अपमानकारक दुर्वचनें बोलून ती गर्विष्ट व महा अभिमानी शहाजादी तेथून दुसरीकडे चालती झाली व त्या ठिकाणीं आपल्या दासी व दासीजनांच्या समाजांत त्या आर्यसुंदरीच्या सौंदर्याच्या कुत्सित निंदेस प्रारंभ केला. त्यांतील कित्येक शब्द आर्यपत्नीनें ऐकिले. या सर्व निंदात्मक भाषणाचा भावार्थ एवढाच होता कीं, ज्या स्त्रिया आमच्या दासीजनाप्रमाणें आहेत त्या इतक्या स्वरूपसुंदर कां असतात? व अशा सुंदर स्त्रियांना बादशहा आपल्या जनानखान्यांत कां नाहीं ठेवीत.

पिंजऱ्यांत कोंडून ठेविलेली सिंहीण ज्याप्रमाणें गर्जना करते त्याप्रमाणें क्षत्रियरमणी आपल्या मनांत गर्जना करूं लागली. पण निरुपाय होता! तेव्हां कोणाही बरोबर कांहींसुद्धां न बोलतां फक्त एकदां दृष्टि इकडे तिकडे फिरवून तिनें एकदम आपल्या दासीला भोयांना मेणा घेऊन बोलाविण्याची आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें दासी निघून गेली.

ही क्षत्रीय रमणी बिकानेरपती पृथ्वीराजाची धर्मपत्नी व आपली पूर्व परिचिता जोधाबा ही होय. हें वाचकांच्या ध्यानांत येऊन चुकलेंच असेल.

# अष्टम परिच्छेद.

## कट्यार.

रिपुश्रिय किं कचसंयोज्यं प्रतापवन्हेः किमुधूमराजिः ।
विलोक्य यत्पाणिगतं कृपाणमेवं जनस्तर्कयते रणेषु ॥

माघ:

दलितहृदयी जोधाबाई उत्साहानें या महिला मेळ्यांत आली असें तुह्मांला वाटतें? रजपूतांच्या अशा या दुःखास्पद दशेच्या अवलोकनानें तिच्या मनांत मोद होत होता काय? छे! मुळींच नाहीं. पण शत्रु नगरांत निवास, शत्रूच्याच आश्रयानें रहाणें व मेळ्यांत न आल्यानें विचारपुस होण्याचा संभव तेव्हां लेशमात्रही इच्छा नसतां केवळ निरुपायानें ती मेळ्यांत आली होती. इच्छेविरुद्ध येणें भाग पडत असल्यामुळें तिनें आपलें शरीर वस्त्राभूषणानीं यत्किंचितही शृंगारिलें नव्हतें. व मेळ्यांत तिला आनंदही वाटत नव्हता. मनांत नानाप्रकारच्या विचारांचा उद्भव झाल्यामुळें पृथ्वीराजानें केवळ निरुपायानें तिला मेळ्यांत जाण्याची आज्ञा केली होती. पारतंत्र्या सारखा या जगांत मनुष्याचा दुसरा कोणीच वैरी नाहीं.

आतांपर्यंत जे जे प्रकार घडले त्यांत विचार करण्या जोगें कांहींच महत्व नाहीं; पण वाचकहो, यापुढें जो एव

भयंकर प्रसंग गुदरणार आहे, त्या प्रसंगाची आठवण होतांच अंगावर रोमांच उभे रहातात व क्षणैक दिग्मूढ बनून जावें लागत असल्यामुळें आमच्या मुखांतून प्रस्तुत-वेळीं एकही शब्द निघत नाहीं.

जोधाबाईची दासी मेणा आणण्यासाठीं मेळ्यांतून बाहेर गेली ती पुनः परत आलीच नाहीं. इतक्यांत सूर्यास्ताचा समय होत आला. मोठमोठ्या मुसलमान व रजपूत रमणी आपापल्या मेण्यांत बसून घरीं जाऊं लागल्या. इतर स्त्रियाही आपापल्या घरीं जाण्यास तयार झाल्या. वस्तु विकण्यासाठीं दुकानें मांडून बसलेल्या स्त्रियांनीं आपाआपलीं दुकानें बंद केलीं. व सूर्यनारायण अस्ताचलीं गमन करता झाला-संध्याकाळ झाला. जोधाबाईचे हृदयांत फारच भीति वाटूं लागली. तिचें हृदय भयानें कांपूं लागलें. मनांत अनेक कुशंका येऊं लागल्या. अपमान, कोप व कुशंका इत्यादिकांनीं तिच्या नेत्रांत अश्रुप्रवाह सुरू झाला. ती मनांत पतीस उद्देशून ह्मणूं लागली-प्राणनाथ! आज माझें मन इतकें कां बरें घाबरत आहे? माझ्या हातून आपला कांहीं अपराध घडला आहे काय? अग बाई! पण हें काय? एकाएकीं माझा उजवा नेत्र कां बरें स्फुरण पावूं लागला? नाथ! आपण माझे प्राणाधार आहां. केवढेंही संकट येवो तें आपल्या स्मरणमात्रानें नष्ट होणार! पण अजून दासी कशी आली नाहीं? माझा मेणा कुठें आहे? माते भवानी! तूंच आज माझ्या लज्जेचें व शीलाचें

रक्षणकर्ती आहेस! तुझ्याशिवाय मला दुसरा एकही आधार नाहीं.

इतक्यांत, एक शस्त्रें विकणारी बाई जवळून जात होती ती म्हणाली–" बाईसाहेब! सर्व स्त्रिया निघून गेल्या तरी आपण अजून येथें कां बरें राहिलां?"

" अजून माझा मेणा आला नाहीं." असें म्हणून जोधाबाईनें तिला विचारिलें–" तुझ्या हातांत काय आहे?"

" कट्यारी! मला मोठी आशा होती कीं मेळ्यांत अनेक रजपूत स्त्रिया येणार तेव्हां माझ्या सर्व कट्यारी केव्हांच खपून जातील. कारण कीं रजपूत स्त्रिया आपल्या कम्मरेंत कट्यारी बाळगतात असें मी एकिलें होतें. पण सांगायला मला मोठं दुःख वाटतें कीं, आज एवढ्या या मेळ्यांत माझी एकसुद्धां कट्यार खपली नाहीं. बाईसाहेब! आतां पूर्वीचा काळ राहिला नाहीं आपल्या चर्येवरून आपण रजपूत आहां असें वाटतें." कट्यारी विकणाऱ्या स्त्रीनें आपली कर्मकथा सांगितली.

" तूं हिंदु आहेस काय?" जोधाबाईनें विचारलें

" जी-होय. बाईसाहेब!" शस्त्रास्त्रं विकणारी स्त्री मोठ्या नम्रतापूर्वक म्हणाली–" आज सहा महिनें झाले माझा नवरा स्वर्गवासी झाला. त्याच्या मागून थोड्या दिवसांनीं माझा एकुलता एक मुलगाही काळानें आपल्या घरीं नेला.. आतां मीच अभागिनी जिवंत असून कट्यारी विकून माझ्या पोटाला आग लावून कसाबसा काळ कंठीत असतें."

यावर अधिक कांहीं न बोलतां जोधाबाईनें तत्काळ शोक प्रदर्शित करून म्हटलें-" होय. मी रजपूत स्त्री आहे ही तुझी कल्पना सत्य आहे. तुझा करुणोत्पादक वृतान्त ऐकून माझें हृदय फार व्यथित झालें आहे. मला एक चांगलीशी कट्यार दे "

" बाईसाहेब! सर्व कट्यारी एकसारख्याच आहेत. यांत अमुक एक चांगली व अमुक वाईट असें कांहीं नाहीं. आपल्या मनास येईल ती घ्या. " शस्त्रें विकणारी स्त्री ह्मणाली.

" याची धार कशी काय आहे? " जोधाबाईनें एक कट्यार हातीं घेऊन विचारिलें.

" जर पुऱ्या जोरानें मारली तर ही कट्यार एका क्षणांत मनुष्याचा प्राण संहार करील " असें उत्तर मिळालें.

" ठीक तर. ही कट्यार मी घेतली " असें ह्मणून जोधाबाईनें तिच्या हातावर एक मोहर ठेविली.

ती स्त्री आश्चर्यचकित होऊन विचारूं लागली " हें काय? एक मोहर देण्याचें कारण? "

" कारण कांहीं नाहीं. मला इच्छा झाली व मी दिली. " जोधाबाई निर्दोषपतेनें ह्मणाली.

" बाईसाहेब! एका मोहरेंत वीस कट्यारी येतील. बाकीच्या एकोणीस देऊं? " विक्री करणाऱ्या स्त्रीनें तितक्याच निर्दोषतेनें प्रश्न केला.

" नको. अधिकांची मला गरज नाहीं. मला एकच पुरे. मी जी तुला मोहर दिली ती एका कट्यारीचीच किंमत." जोधाबाईनें विवेचन करून तिची समजूत दूर केली. त्या नंतर जोधाबाई आपल्या मनाशीं बोलूं लागली–

ही स्त्री माझी गुरु आहे. कारण कीं हिनें मला आज एका नवीन ज्ञानाचें शिक्षण दिलें. रजपूतनारी असून आज मी माझी कट्यार बरोबर कशी नाहीं घेतली ? "

शस्त्रें विकणारी स्त्री करुणामय स्वरानें ह्मणाली–" बाई-साहेब ! आपण साक्षात् अन्नपूर्णादेवीचा अवतार आहां ! परमेश्वर आपणाला सदासर्वकाळ सुखांत व आनंदांत ठेवील असा या दीन अबलेचा आपणाला आशिर्वाद आहे.. "

आशिर्वाद देऊन व जोधाबाईला नमस्कार करून ती स्त्री तेथून निघून जाऊं लागली व समोरून एक मेणा येत असलेला पाहून ती मागें फिरून ह्मणाली—" बाई-साहेब ! आपला मेणा आला वाटतें ! "

मेणा तर आलाच. पण सोबत दासी न येण्याचें कारण जोधाबाईला समजेना. " हा मेणा माझाच का " असें तिनें भोयांनां विचारिलें. व त्यांनीं " जी होय " असें उत्तर दिलें. जोधाबाईनें दासीविषयीं विचारिलें तेव्हां ते ह्मणाले—" ती बाहेर आपली वाट पहात उभी आहे. कारण कीं आतां आंत येण्याला कोणालाही हुकूम नाहीं. आह्मांला बादशहाचा हुकूम मिळाला ह्मणून येतां आलें. "

हें उत्तर ऐकून मनांत नाना तर्कवितर्क करित जोधाबाई मेण्यांत बसली व आंतून खिडक्या बंद करून घेतल्या.

हें सर्व कपटकौशल्य कोणाचें बरें असेल हें चाणाक्ष वाचक समजून चुकलेच असतील; पण हें काय ? मेण्यांत बसतांना जोधाबाईच्या अंगावरील वस्त्रें एकाएकीं कोणीं बरें ओढिलीं ? जोधाबाईनें बाहेर तोंड काढून पाहिलें तों तिचीं वस्त्रें मेण्याच्या बाहेरच्या भागीं असलेल्या एका खिळ्याला अडकून जरा फाटलेलीं तिला दिसलीं. इतक्यांत पालीचा अमंगल ध्वनि तिला ऐकूं आला व जोधाबाईच्या मनांत एकाएकीं भीतीचा आघात झाला.

मनांत आपल्या पतीचें व भवानी मातेचें ध्यान करून जोधाबाईनें द्वारें पुनः बंद केलीं व ती मनांत ह्मणूं लागली " आतां भय बाळगण्याचें कसलें कारण ? भवानीमातेनेंच ही कट्यार मला दिली आहे व हीच माझ्या पातिव्रत्याचें रक्षण करील. शस्त्र अगर अस्त्र जवळ असलें कीं, मग रजपूत वीरांगनेला भीति कसली ? माते भवानी ! शस्त्रें विकणाऱ्या नारीच्या रूपानें तूं मला दर्शन दिलेंस हें मी आतां समजलें. मी मूढ असल्यामुळें त्यावेळीं तुला ओळखिलें नाहीं. भगवति ! आज तुझ्याच कृपेनें माझ्या संकटाचा संहार होईल ? "

पतिव्रतेची ही करुणावाणी जगज्जननीनें ऐकिली.

## नवम परिच्छेद.

# पिशाचाचा पिशाचधर्म.

खलानां कंटकानां च द्विविधैव प्रतिक्रिया।
उपानन्मुख भंगो वा दूरतो वा विसर्जनम्॥

व्यासः



कपटकलेला वश झालेल्या भोयांनीं मेणा उचलला व ते चालूं लागले. राजमार्गानें न जातां ते एका आडवाटेनें जाऊं लागले. त्या वाटेचें उल्लंघन केल्यावर त्यांनीं एका दुसऱ्या गल्लींत प्रवेश केला व नंतर ते लोक भुयाराप्रमाणें एका अंधःकारमय मार्गांत आले. मेण्याचीं द्वारें किंचित उघडून जोधबाई बाहेर पाहूं लागली तिच्या मनांत थोडी भीति उत्पन्न झाली. यावेळीं रडण्यापासून अगर आरडाओरड करण्यापासून कांहीं फायदा नाहीं हें ती पूर्णपणें जाणून होती. तिनें आपलें मन घट्ट केलें; व मनातल्या मनांत ती विचार करूं लागली-" मला आत्महत्या करून संकटमुक्त होतां येईल काय ? " पुनः तिच्या मनांत विचार आला-" नको. असें करूंच नये. आत्महत्या करण्याचा कोणालाही अधिकार नाहीं व असें केल्यानें पतीशीं निमकहरामपणा केल्याचा दोष लागण्याचा संभव आहे. मी मेलें तर माझ्या पतीला किती दुःख होईल तें सांगतां पुरवत नाहीं. तेव्हां आत्महत्या करणें हें कांहीं योग्य

नाहीं. मरण हें केव्हांतरी एकदां येणारच आहे. तेव्हां पाहूं तर खरें आज काय काय होतें तें! आईभवानी! हे अम्बे! मी तुझ्या चरणीं शरण आहें. यावेळीं तूंच माझी लाज राख."

"त्या शहाजादीच्या कपटाचा तर हा परिणाम नसेल?" असाही एकवार तिच्या मनांत विचार आला. विचार करतां करतां जोधाबाईचें मस्तक भ्रमण करूं लागलें. व तिच्या डोळ्यापुढें अंधेरी आली. पुन्हां तिच्या अंगीं अवसान येऊन ती ह्मणाली—"माझ्या मनांत या व्यर्थ शंका येतात. असल्या विचारांना मनांत स्थल देणें हेंही एकप्रकारचें पाप आहे. माता जगज्जननी माझ्या हृदयांत निवास करित आहे तर मग मला भीति कसली? भगवति! तूं या तुझ्या कन्येला अभयदान दे!"

"कदाचित् तसेंही झालें तर? पण हा विचारच मनांत आणणें मुळीं अयोग्य आहे. समंजा कीं तसाच प्रसंग आला, तरी पण, भिण्याचें काय कारण आहे? माझ्या हातांत हिरकणी असून कम्मरेंत कट्यार आहे. त्यांच्या मदतीनें एखाद्या रजपूत स्त्रीला आपलें पातिव्रत्य रक्षण करतां नाहीं का येणार?"

अशाप्रकारचे अनेक विचार क्षणोक्षणीं जोधाबाईच्या मनांत उद्भवत होते. चालतां चालतां भोयी एका गृहाच्या द्वारापाशीं येऊन पोंहचले. व त्यांनीं मेणा खालीं उतरला. त्यास्थलीं चोहोंबाजूस उंच उंच भिंती होत्या. व सर्वत्र

मान्य व निःस्तब्धता यांचा साम्राज्य-विस्तार झाला होता. ही स्थिति पाहून जोधाबाई कोपयुक्त मुद्रेनें ह्मणाली- " मला येथें कां आणलें? मला सत्वर माझ्या घरीं घेऊन चला."

भोयांच्या नाईकानें उत्तर दिलें " बाईसाहेब! आपलें हेंच घर. कारण आपले महाराजसाहेब आंत बसले आहेत. व ते आतां आपणाला आंत घेऊन जातील. त्यांच्याच हुकूमानें आह्मी आपणाला येथें घेऊन आलों! "

स्वतःला सर्वथैव निराश समजून व सर्वथैव आपल्या कर्तृत्वावर विश्वास ठेवून जगदीश चिंतन करित जोधाबाईनें त्या गृहांत प्रवेश केला. ती आंत जातांच तत्काळ मागून द्वार बंद झालें.

त्या घरांत सर्वत्र अंधःकाराचेंच साम्राज्य माजून राहिलें होतें. बाजूच्या दोन्हीं भिंतींत मात्र दोन भोकें होतीं. पण रात्र पडल्यामुळें तींही अंधःकारमय होऊन गेलीं होतीं. ज्या द्वारांतून जोधाबाईनें गृहाच्या अंतर्भागीं प्रवेश केला होता तें द्वार उघडण्याचा तिनें पुष्कळ प्रयत्न केला; पण दुर्दैववशात् तिचा हा प्रयत्न सर्वथैव व्यर्थ व निष्फळ होता.

शेवटीं जोधाबाईनें मनांत एक दृढनिश्चय केला. अनन्यभावानें पतीचें ध्यान करून तिनें जगज्जननीस आपलें संकट कळविलें व नंतर कंपितस्वरानें ती ह्मणाली-, " बरें तर! आतां तुझीच इच्छा पूर्ण होवो! "

"सुंदरी ! माझी कोणती इच्छा पूर्ण होईल ?" या भग्न स्वरात्मक शब्दांची तेथें ध्वनि झाली. त्या भयानक उजाडगृहांत या ध्वनीचा पुनः पुनः प्रतिध्वनि होऊं लागला. जोधाबाईचें सर्व शरीर रोमांचित झालें तरी पण ती यत्किंचितही डगमगली नाहीं. दुप्पट अवसान आणून तिनें त्याला उत्तर दिलें.–"ज्या नरपिशाच्चानें दुष्ट हेतूनें या गृहांत प्रवेश केला आहे त्याच्या शिरावर याच क्षणीं वज्राघात होवो !"

आपले नेत्र चांगले उघडून ती चोहोंबाजूस अवलोकन करूं लागली. तिच्या नेत्रांतून अग्निकणांचा वर्षाव होत आहे कीं काय असा भास होऊं लागला.

इतक्यांत पुढील ध्वनि तिला ऐकूं आला" सुंदरि ! असा शाप देऊं नको. जें मस्तक तुझ्या कुसुमसमान वक्षःस्थलाच्या आश्रयाची अपेक्षा करित आहे त्याचा वज्राघातानें चक्काचूर व्हावा असा तूं कसा शाप देतेस ? रमणि ! अशी निष्ठुर होऊं नको !

जोधाबाईनें मोठ्या आवेशानें व निश्चयपूर्वक उत्तर दिलें.–" माझें वचन कधींही असत्य होणार नाहीं !"

"तूं माझी प्राणेश्वरी आहेस !" असा ध्वनि झाला.

"नाहीं ! मी तुझी प्राणसंहार करणारी कालसर्पिणी आहे" उत्तर मिळालें.

इतक्यांत त्या अपरिचित व्यक्तिनें शीळ वाजवून कांहीं संकेत करतांच तत्काळ त्या ठिकाणीं दीपकांचा प्रकाश झाला. व सर्व वस्तू दृगोचर झाल्या.

प्रकाश पडतांच जोधाबाई त्या कामातूर नराधमाच्या दृष्टिस पडली. तिची ती चंडिके समान उग्र मूर्ति पहातांच तो पिशाच स्तंभित होऊन गेला, नौरोजच्या मेळ्यांतही हाच नरराक्षक जोधाबाईच्या दृष्टिला विषय होऊन राहिला होता.

जोधाबाई क्षणभर स्तंभित व विस्मित झाली. तो कामविव्हल मूढ हातजोडून न बोलतां फक्त हावभावानेंच तिची विनवणी करूं लागला. तिची व त्याची नजरानजर होतांच आपल्या मनांतील हेतू शब्दद्वारां व्यक्त करण्याचें साहस एकाएकीं त्याच्यानें करवेना.

जोधाबाई गर्जना करून ह्मणाली—" दूर हो! हे नरराक्षसा! दूर हो!" तो कामोन्मत्त नरपशु तिच्यापुढें गुढगे टेंकून बसला व मोठ्या आर्जवभावानें ह्मणाला—"सुंदरी! आतां माझा अंत पाहूं नको. मी तुझें रूप पाहून मुग्ध झालों आहें. तुझ्या वियोगवन्हीने माझें शरिर निरंतर दग्ध होतें असतें तेव्हां हे प्राणेश्वरी! स्नेहसलिलाचें सिंचन करून तूं त्याच्या ज्वाला शांत कर. सार्वभौम दिल्लीश्वर आज तुझ्यापुढें प्रेमयाचक बनून उभा आहे."

जोधाबाई अधिक विस्मित होऊन ह्मणाली—" तर मग माझीच कल्पना खरी ठरली! बस्स! आतां हाच निश्चय-"

"सुंदरि! अशी कावरीबावरी कां झालीस? दिल्लीश्वर तुझ्यापुढें याचना करित उभा आहे ह्मणून तूं विस्मित झालीस कीं काय? प्रिये! मनुष्यप्रकृति सर्वत्र एकसारखीच असते." त्या नराधमानें आपल्या अधमतेचें प्रदर्शन केलें!

जोधाबाई मोठ्या आश्चर्यांत पडली व कानांत बोटें घालून चार पावलें मागें सरली, " शिव! शिव! तूं दिल्लीश्वर! भारत सम्राट अकबर! हें तुझेच कृत्य!" असे आश्चर्यानें तिच्या तोंडून उद्गार निघाले.

" होय हें कृत्य माझेंच आहे. स्त्रियांच्या मोहजालांत देवसुद्धां मूढ बनतात मग माझी ती काय गोष्ट?" दिल्लीश्वर निर्लज्यपणें म्हणाला.

" नौरोजांत भरणाऱ्या महिला मेळ्याचा हाच उद्देश काय?" जोधाबाईनें वक्रदृष्टीनें विचारिलें.

" होय! खरें म्हटलें तर सत्य उद्देश हाच!" अकबर म्हणाला—

" हें पापाचरण किती दिवस चालत आलें आहे" प्रश्न झाला.

" आज पुष्कळ दिवस चालत आलें आहे. परनारीचा उपभोग घेण्यांत मला सुख वाटत असल्यामुळें मीं होऊन या महिला मेळ्याची युक्ति शोधून काढिली आहे. आजच्या मेळ्यांत तूंच एकटी सर्वांत सुंदर व मनोहारिणी दिसल्यामुळें मी तुला येथें आणिली" दिल्लीपतीनें पापाचा स्वीकार केला.

" तर मग हें गुप्तगृह याच निंद्य कर्मासाठीं राखलें असेल?" जोधाबाईनें उलट विचारिलें.

" होय! त्याच कार्यासाठीं आहे. कारण लोकलज्जेची भीति मनांत राखलीच पाहिजे." अकबरानें उघड जबाब दिला.

" यानें कदाचित् लोकांच्या नेत्रांत धूळ टाकतां येईल. पण तो सर्वव्यापक, सर्वांतर्यामी परमात्मा यानें फसणार नाहीं. याची तुला खबर तरी आहे काय ? " जोधाबाईनें ह्मटलें.

मी परमेश्वर अगर देव बिलकुल मानित नाहीं. केवळ अज्ञसमाजांत सन्मान व कीर्ति संपादण्यासाठींच मी हा बाहेरून धर्माचा आव मिरवीत असतों. समजलें ? " अकबरानें आपल्या कुकर्माचें विवेचन केलें.

" हे बादशहा ! अशा पापाचरणानें मोंगलांची सत्ता रसातळास जाईल हें तुला कळत आहे कां ? " जोधाबाईनें पुनः प्रश्न केला.

" मी मोंगलपातशाही चिरस्थायी बनवीन " अकबर म्हणाला.

अशी पापबुद्धि जेथें रात्रंदिन वास करते तेथें चिर-स्थायित्व कधींकाळींही प्रस्थापित होणें शक्य नाहीं. " जोधाबाईनें सूचना केली.

" वैवाहिक संबधांत तर मी हिंदु व मुसलमान एक केले आहेत. " अकबर ह्मणाला.

" खोटी गोष्ट ! हिंदुच्या मनावर तुझा अधिकार कदापि चालणार नाहीं. " जोधाबाईनें मोठ्या आवेशानें सांगितलें.

" खोटी तर खोटी ! आतां या राजनीतिच्या गोष्टी राहूं दे. माझा मनोरथ पूर्ण कर. एकदां तूं मला प्राप्त झालीस कीं मला कसली ही इच्छा नाहीं. पहा-माझें

शरीर कसें दग्ध होत आहे. ". अकबरानें आपली मदन-लालसा दर्शविली.

" विचार कर व असें अभद्र भाषण मुखावाटे बाहेर काढूं नको, मला आतांच्या आतांच माझ्या घरीं जाऊं दे" जोधाबाईनें त्याला निक्षून सांगितलें.

" प्रेममयि ? प्रणयार्थी शरणागताला प्रणयदान देऊन त्याची मनःकामना पूर्ण करणें हेंच तुझ्या सारख्या सुंदरीला योग्य व भूषणावह आहे. रमणि ? माझ्यावर असा कोप करूं नको. कोपानें तप्त झालेलें हें तुझें मुखमंडळ माझ्या दृष्टिला अपूर्व सौंदर्यमयच भासत आहे तुझ्या आलिंगनासाठीं मी अत्यंत उत्सुक आहें. करितां हे चंद्राननें सत्वर माझ्यावर दया कर ! सार्वभौम दिल्लीश्वर नृपति आज आपलें राज्य, राजमुकुट, सिंहासन व प्रियप्राणही तुझ्या चरणीं अर्पण करण्यास तयार आहे तुझ्या अधरा-मृताचें एकवार त्याला पान करूं दे आपल्या या गुप्त प्रणयाचें कोणालाही ज्ञान होईल ही व्यर्थ भीति तूं बाळगूं नको " दुष्ट बादशहानें आपल्या मनदौर्बल्यतेचें पुरें पुरें दर्शन केलें व हस्तद्वय पसरून त्या महा पातिव्रतेला आलिंगन देण्यास तो तत्पर झाला.

खवळलेल्या सिंहीणिप्रमाणें गर्जना करून जोधाबाई ह्मणाली —

" दूर हो ! मूर्खा दूर हो ! आतां जर एक पाऊल पुढें पडेल तर मेलास असेंच समज. अजून तरी आपल्या नांवाची व कीर्तीची कांहीं चाड बाळग. " दिल्लीश्वरो वा

जगदीश्वरो वा " या नांवानें ओळखला जाणारा बादशहा तो तूंच काय ? शिव ! शिव ! धिःकार ! धिःकार असो असल्या या अधम व पापी नराधिपतींना !!! "

जोधाबाईच्या अनुपम लावण्यप्रभेंत तिच्या उद्दीप्त रूपश्रींचें संमिश्रण झाल्यामुळें त्यांत विलक्षण शोभा आलेली दृग्गोचर होऊं लागली. या तेजापुढें दीपकांचें तेजही मंद भासूं लागलें. तें गृह, गृहांतील सर्व वस्तु व पापमय विलासशय्या इत्यादि सर्व पदार्थ मलीन व निस्तेज भासूं लागले व पुण्यमय जीवीतप्रतिमा जोधाबाई समोर त्या कामव्याकूल व वैभवशाली अकबर बादशहाचें मुख अगदीं तेजोहीन दिसूं लागलें.

कामोन्मत्त व कामांध नरपशु अकबर ह्मणाला " सुंदरी ! माझा हेतू जोंपर्यंत परिपूर्ण होणार नाहीं, तोंपर्यंत तुझी येथून सुटका होणें सर्वथैव अशक्य व असंभवनीय आहे. असें बोलून आलिंगन देण्याच्या उद्देशानें अकबर पुढें सरला. "

आपली दृष्टि स्थीर करून व दांत चावून जोधाबाई म्हणाली-" पुन्हां आपलें तेंच ? अरे बादशहा ! तुला मरणाचीच इच्छा झाली आहे काय ? "

सौम्य उपचारानें कार्य होत नाहीं असें बादशहास दिसून येतांच त्यानें भय दाखवून आपला हेतु सिद्धीस नेण्याचा विचार केला. तो ह्मणाला-तूं मला भीति दाखवितेस ? हें तुझें उद्धट वर्तन कोणापुढें चाललें आहे त्याचें तुला भान आहे ?

"होय! चांगलें भान आहे, एका कपटी, कामांध व अधर्माचारी पुरुषापुढें—दिल्लीचा बादशहा या नांवानें ओळखिला जाणाऱ्या अकबरापुढें मी हें असें उद्धट वर्तन करित आहे. समजलें?" जोधाबाईनें हिंमतपूर्वक उत्तर दिलें.

"माझी आज्ञा निमूटपणें मान्य कर नाहीं तर व्यर्थ प्राण गमावून बसशील." अकबरानें दम देऊन सुमार पहाण्याची सुरवात केली.

"अरे मूर्खा! तुला चतुर व राजनीतीज्ञ असें कोण म्हणतात? रजपूत स्त्रीला मृत्युभयानें भिववूं पहातोस हीच तुझी चतुरता काय? माझ्या प्राणाचें काय होणार असेल तें होईल; पण तुझे प्राणमात्र माझ्या हातून गमावणार खास!" जोधाबाईनें पुनः निक्षून सांगितलें.

मदोन्मत्त अकबर त्या सतीच्या देहाला आलिंगन देण्याला पुनः उद्युक्त झाला. तेव्हां जोधाबाई अनाथांचा नाथ जो करुणासागर परमेश्वर त्याची मनांत प्रार्थना करूं लागली "हे त्रैलोक्यनाथ परमेश्वरा! तूं आज या संकटग्रस्त दासीवर प्रसन्न होऊन तिच्या पातिव्रत्याचें रक्षण कर! हे दयाघना! ज्याप्रमाणें तूं कौरव सभेंत सती द्रौपदीची लाज राखलीस त्याचप्रमाणें प्रस्तुत वेळीं तूं या अधमाच्या अत्याचारापासून माझी सुटका कर हे आदिमाते भवानी! या कन्येवर तुझी कृपा असूं दे. आतां तुझ्याशिवाय या संकटांतून माझी मुक्तता करणारें दुसरें कोणीही नाहीं!"

त्या पवित्र साध्वीच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरु झाला,

व तो दुष्ट, कामातुर, नराधम अकबर आपल्या आशापूर्ण पापीदृष्टिनें तिच्या अभिनवरूपसुधेचें आनंदपूर्वक पान करूं लागला.

एकाएकीं दीपकांची प्रकाश ज्वाला कंपायमान दिसूं लागली. साध्वी जोधाबाईनें सिंहवाहिनी मूर्ति धारण केली. कम्मरेंत लपवून ठेविलेली कट्यार तिनें आपल्या उजव्या हातांत घेतली व निर्जीव पाषाणप्रतिमेप्रमाणें ती निश्चितमुद्रेनें स्थीर राहिली. आजसुद्धां जणूं ती सिंह-वाहिनी मूर्ति प्रत्यक्ष आपल्या नेत्रांसमोर उभी आहे कीं काय असा भास होतो.

आपल्या पुढें ती भैरवी रुद्रमूर्ति उभी पाहून अकबर-शहा एकाएकीं भयभीत, चकित, व स्तंभित होऊन गेला. त्याच्या कामलालसेचा लय झाला व त्या ऐवजीं त्याच्या मनांत भीति व भक्ति यांचा आविर्भाव झाला.

ती सिंहवाहिनी मूर्ति कोपानें अगदीं लाल होऊन म्हणाली-" या उप्पर परनारीविषयीं पापबुद्धि न बाळग-ण्याची व कोणाही स्त्रीच्या पातिव्रत्याचा भंग न करण्याची जर तूं शपथ घेशील तरच तूं जिवंत रहाशील नाहीं तर ही कट्यार तुझ्या छातींत खुपसून आतांच तुझ्या प्राणांचा संहार करतें. तूं खूप समजून रहा कीं या कट्यारीवरच यावेळीं तुझी पातशाही झुलत आहे "

धर्माच्या प्रबल प्रतापापुढें अधर्म कसा टिकणार! सृष्टिचा नियमच असा आहे कीं, पुण्य व पवित्रता यांपुढें

अधर्म व पाप यांना आपलें शीर नमविलेंच पाहिजे. जर असें झालें नाहीं तर धर्माचा प्रभाव तो कसला?

अकबर एकदम विरघळून गेला व " माते! माते!" असें ह्मणून त्यानें त्या पतिव्रतेच्या चरणीं आपलें मस्तक ठेविलें धर्माचा शेंवटीं जय झाला. व ती साध्वी त्या भयंकर परिक्षेंत पूर्णपणें उत्तीर्ण झाली. अधर्माचा तिनें पुरा पराजय करून टाकिला.

पृथ्वीराजाच्या पत्नीचें पातिव्रत्य नष्ट करण्यांत अकबराचे मुख्य दोन हेतू होते. एक इंद्रियलालसेची तृप्ति व दुसरा पवित्र सिसोदिया कुळाला कायमचें कलंकित करणें. कारण कीं पृथ्वीराजभार्या ही महाराणा प्रतापसिंहाची पुतणी व शक्तिसिंहाची कन्या होती. अकबराला हें अवगत होतें. प्रतापसिंहानें अद्यापि मोंगल बादशहापुढें आपलें शीर वांकविलें नव्हतें व याबद्दल वैभवमदानें अंध बनलेल्या अकबराला फार वैषम्य वाटत होतें. तेव्हां कोणत्या ना कोणत्या तरी उपायानें प्रतापाला नम्र करण्याचा जो अकबराचा मनोभाव होता तो याच नीच कृतीनें निर्विघ्नपणें सिद्धीस जाण्याचा संभव होता; परंतु त्याच सतीच्या पातिव्रत्यप्रभावापुढें त्याचा पराजय झाला व मनांतला हेतू मनांत पार विरघळून गेला. अकबराच्या आयुष्यांत असन्मार्गनिवृत्तीचा हा पहिलाच प्रसंग होता. पवित्र जोशाबाईनें मोहांध अकबराच्या हृदयांत धर्मरूपी दीपकाचा चक्क प्रकाश पाडला.

'भाट, चारण, कवि व इतिहासकार या सर्वांनीं या महा प्रतापान्विता राजराजेश्वरी व आर्यकुल लक्ष्मीला

साक्षात् देवीचा अवतार मानून तिच्या अखंड व अचल यशाचीं गानें गायिलीं आहेत.

हा सर्व वृत्तान्त पृथ्वीराजाच्या कानावर गेला. पण आपल्या परमपवित्र पत्नीवर त्याचा पूर्ण विश्वास असल्यामुळें त्याच्या हृदयांत शंकेचा अगर संशयाचा लेश-मात्रही आविर्भाव झाला नाहीं. पूर्वीप्रमाणेंच त्याचें पत्नी-वरील प्रेम जसेंच्या तसेंच अखंड राहिलें इतकेंच नाहीं तर त्यांच्या वयवृद्धिबरोबर परस्परांवरील प्रमाची वृद्धिच होत गेली.

खरोखर दांपत्यें पृथ्वीराज व जाधाबाई यांच्यासार-खींच असलीं पाहिजेत. अशा दांपत्यसुखानेंच संसाररूपी सागर तरणें निःसंशय सुलभ पडतें.

---

## दशम परिच्छेद.

# तरुण प्रवासिनी.

“ प्रीतमप्यार तुम जो बसोगेसात समदर पार;
वहांभी डूबतडूबत आऊं हेत न जाऊं हार ”



पवित्रतेचें रक्षण करणें व तेंही पापमयी दिल्लीनगरींत–उपवर झालेल्या यमुनेच्या कौमार्याचें रक्षण करणें-फारच कठीण आहे ही गोष्ट पृथ्वीराजाच्या ध्यानीं येऊन चुकली. म्हणून त्यानें विचार केला कीं, जर आपण

आपल्या भगिनीला येथून सत्वर अन्यस्थलीं पाठवून दिलें नाहीं तर परिणाम कांहीं ठीक होणार नाहीं. स्वतः पृथ्वीराजालासुद्धां यवननगरींत वास करण्याचा अगदीं कंटाळा आला होता परंतु, निरुपाय होऊन त्याला त्याठिकाणीं रहाणें भाग होतें.

बन्धूच्या आज्ञेनुसार मोंगली थाटाचा सुंदर पुरुषवेष धारण करून क्षात्रियकुमारी यमुना दिल्लीनगरांतून एकदांची बाहेर पडली. त्या सुदर्शना राजकुमारीला पुरुषवेष फारच नामी शोभत होता. तिनें आपला दीर्घ केशकलाप शिरस्त्राणाखालीं लपवून टाकिला होता. व शरीराचे इतर सर्व भाग मोंगलाई पोषाखानें झांकून टाकिले होते. वक्षःस्थल कांहींसें उंच दिसत होतें; परंतु तिनें तें महाकौशल्यानें एका साटीनी वस्त्राच्यायोगानें असें बांधून टाकिलें होतें कीं, कोणताही ओळखीचा मनुष्य तिला ओळखूं शकणार नाहीं. अशारीतीनें यथाशक्ति आपल्या स्वरूपांत पालट करून यमुना पुरुष तर बनली खरी; पण तिच्या—आकर्ण-विस्तृत चंचल नेत्रांच्या रूपाचें परिवर्तन झालें नाहीं. तिचे ते सकरुण मनोहर कटाक्ष तिच्या रहस्याचा स्फोट करूं लागले.

पण, इतक्या सूक्ष्मरीतीनें निरिक्षण करणारे कितीसे लोक असणार ? व इतक्या काळजीपूर्वक निरखण्याची आवश्यकता तरी कोणाला. दृष्टि व मुख न्याहाळून पुरुषत्वाची व स्त्रीत्वाची परिक्षा करण्याची कला सर्वांनाच अवगत असते

असें नाहीं; आणि कदाचित् कोणाला अवगत असली तरी पण यमुना युवती आहे कीं युवक आहे हें जाणून घेण्याची इतकी कोणाला जरूर पडली आहे कीं, तो स्त्रीपुरुषत्वाचा निर्णय करित रहाणार?

ईश्वर कृपेनें एकही विघ्न न येतां यमुना मार्गक्रमण करूं लागली. तिच्या सोबत एक अति-विश्वासु रजपूत अनुचर होता. पृथ्वीराजानें त्या अनुचराला मार्गांत कसें वर्तन करावें, प्रवास कसा करावा वगैरे गोष्टींविषयीं पुष्कळ शिकाविलें होतें व शत्रुची पावलोपावलीं भीति असल्यामुळें फार सावध व दक्ष रहाण्याचा उपदेश केला होता.

यमुना त्या अनुचरासहवर्तमान एका संकेतस्थलीं येऊन पोंहचली. त्या स्थलीं पूर्वीच व्यवस्था करून ठेविल्या-प्रमाणें दोन घोडे तयार होते. त्यांपैकीं एका घोड्यावर यमुना स्वार झाली व दुसऱ्यावर अनुचर बसला. अनुचराचा अश्व पुढें चालला होता व यमुनेचा त्याच्या मागोमाग होता. यमुना राजकुमारी असल्यामुळें तिला बाळपणापासूनच अश्वारोहणाचें शिक्षण मिळालें होतें. तरी पण नियमितस्थलीं येऊन पोंहचण्यास तिला थोडा विलंब लागला व मार्गांत किंचित कष्टही सोसावे लागले. कसेंही असलें तरी इतक्या दिवसां नंतर यमुना अमरसिंहास भेटण्यासाठीं एकदांची बाहेर पडली हें तरी तिचें महद्भाग्यच समजलें पाहिजे.

आरवलीपर्वताचा प्रदेश तो हाच. ज्या स्थलाचें चित्र

यमुनेनें अनेकवेळां आपल्या कल्पनानेत्रांनीं पाहून अश्रूजलानें आपलें वक्षःस्थल आर्द्र केलें होतें तो हाच प्रदेश. तिचें इप्सित पुण्य तीर्थ हेंच! ज्या स्थलाचा विचार करतां करतां तिचें समस्त शरीर रोमांचित होऊन तिच्या मनांत अपूर्व आनंदाचा भास होत असे तेंच हें स्थल. कुमार अमरसिंहाचें निवासस्थान याच प्रदेशांत आहे!

यमुनेच्या मनांत अजून हेच विचार चालले होते. "माझें चिरवांछितस्थान याच पर्वतांत आहे काय? पुण्यश्लोक प्रतापसिंहाच्या पदस्पर्शानें पवित्र झालेली हीच भूमि काय? माझे जीवितेश्वर ज्या स्थलीं दृष्टिगोचर होणार तेंच हें स्थल काय?"

"हाय-हाय! बन्धूचा आश्रय सोडून मी केवढ्या मोठ्या आशेनें या स्थलीं आलें आहें! असें असूनही माझा हेतु सिद्धीस न जाईल काय? ज्यांच्यासाठीं मी अनेक कष्ट-अनेक संकटें सहन केलीं आहेत ते मला प्रेमपूर्ण नयनांनीं पहाण्या इतकीही उदारता दाखविणार नाहींत काय? लज्जेमुळें अगर अश्रद्धेमुळें माझा अनादर तर करणार नाहींत? छे! छे? सुंदर व मनोहर रूपमंदिरांत इतकी निष्ठुरता वास करणेंच शक्य नाहीं!! हे सर्व माझेच कुतर्क व संशय आहेत!!!"

एका महा प्रचंड शिलातलावर बसून यमुना आपल्या मनांत असलेल्या अनेक विचारांत लीन झाली होती. तिच्या हस्तांत स्फटिक पाषाणाची एक मूर्ति होती. तिला

ती अगदीं निर्निमेष नेत्रांनीं पहात होती. यावेळीं ती छद्म-वेषांत-पुरुषवेषांत-नव्हती, तर आपल्या नैसर्गिक स्त्री-वेषांतच होती.

तृतीय प्रहराचा समय होऊन गेला होता. आरवली पर्वतावरील घनगिरीश्रेणि स्थिर व गंभीर दिसत होती. सर्वत्र शान्ति व्यापून गेली होती. जवळच वहाणाऱ्या एका जल निर्झराचा श्रवणमनोहर ध्वनि ऐकूं येत होता. शीतल मंदपवन लहरींचा सर्वत्र विस्तार झाला होता. अस्तंम मनोन्मुख सूर्यनारायणाचीं किरणें सर्वत्र पसरलीं होती. व त्यामुळें तेथील विशाल वनप्रदेशांत अपूर्व शोभा प्राप्त झाली होती. अशा या रम्य व मनोहर स्थलीं यमुना आपल्या मनांत सहस्रावधि विचार करित बसली होती.

मधून मधून हातांतील पाषाणमूर्ति हृदयाशीं गच्च धरून व नेत्र मिटून यमुना कांहीं विचार करित असे. केव्हां त्या मूर्तिला आपल्या समोर उभी ठेऊन तिचें अवलोकन करी व क्वचितप्रसंगीं त्या मूर्तीचें प्रेमपूर्वक चुंबनही घेई.

नंतर यमुना आपल्या मनाशीं बोलूं लागली "हे प्रभो! हें स्वप्न तर नव्हेंना? या स्वप्नालाच हृदयांत थारा देऊन मी दिल्लीचा त्याग तर केला नाहींना? आतां या अश्रुजलानेंच माझ्या आयुष्याची इतिकर्तव्यता होणार कीं काय? असेंच जर असेल तर मग मी माझ्या देवतुल्य बन्धूचा आश्रय सोडून इकडे तरी कां आलें? जरी मी दिल्लींतच असतें तरी मोंगलांनी कांहीं माझ्याशीं अत्याचार केला

नसता ! मनाचा दृढ निश्चय करून जरी मी तेथेंच राहिलें असतें तरी माझ्या कौमार्याचा भंग करण्याचा क्वचितच कोणी यत्न केला असता ! मी अविचारी तर खरींच ! ”

“ पण माझें मन इकडे गुंतलेंना तेव्हां मी तिकडे तरी कशी राहणार ? कुमार अमरसिंहाचें दर्शन करण्यासाठीं मी चातकाप्रमाणें अधीर होऊन गेलें आहें व त्यांच्याच आशेनें मी माझ्या स्नेहमय सहोदराचा व प्रेममयी वन्संचा त्याग करून इकडे येण्याचें साहस केलें. तेव्हां माझी आशा पूर्ण होणार कीं नाहीं ? माझा हेतू तडीस जाईल काय ?

“ तिचा अनुचर दोन्हीं घोड्यांना पाणी पाजण्यासाठीं झरीवर निघतांना यमुनेस ह्मणाला ” ‘ आरवली पर्वताचा प्रदेश तो हाच. याच प्रदेशांत महाराणा प्रतापसिंहजी रहातात. आज आपण त्यांच्या चरणापाशीं जाऊन पोंहचूं. तेथून पुढें कमळमीरास पोंचण्यास मार्ग प्रहर दीड प्रहरचा आहे आतां आपल्या प्रवासाचा शेवट झालाच ”

असें ह्मणून तो अनुचर दोन्हीं अश्वांना पाणी पाजण्यासाठीं झरीवर घेऊन गेला. त्यांना पाणी पाजून त्यानें त्यांच्यापुढें थोडें गवत टाकिलें; व आपण हातपाय धुवून फलमूळांचा शोध करण्यासाठीं परत अरण्यांकडे वळला.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें यमुना शिलातलावर बसली होती तेथेंच गाढ झोंपी गेली. तिच्या चतुर्दिशांस निःस्तब्ध गिरीश्रेणीचा विस्तार झाला होता. शिरोभागीं अनंत आकाश पसरलें होतें व आसपास निबिड अरण्य

होतें. अशा या गंभीरस्थलीं यमुना स्वस्थ निर्भयपणें निजली होती. तिच्या अंगावरील वस्त्र किंचित् शिथील झालें होतें. व तिच्या मुखमंडळावर किंचित् हास्याची छटा दृग्गोचर होत होती. तिनें त्या पाषाणमूर्तिस आपल्या उराशीं गच्च धरिलें होतें. निद्रावस्थेंतही ती बाला त्या मूर्तीचें ध्यान करीत आहे असा भास होत होता. दूरून पहाणाराला ही कोणी प्रकृतिदेवीची लाडकी कन्या—निसर्गदेवतेची मूर्तिमती प्रतिमा—कोलाहलमय जगताचा त्याग करून प्रकृतिदेवीच्या निसर्ग सुंदर प्रदेशांत स्वच्छंदानें निद्रेचा आस्वाद घेत पडली आहे की काय असा भास होत होता.

एक स्वरूपसुंदर तरुण पुरुष गात गात ज्यास्थलीं यमुना निजली होती तिकडेच येऊं लागला. त्या तरुणाचा वेष रजपूता प्रमाणेंच होता पण वीरवेष नव्हता. तो स्वाभाविक सामान्य वेषानें निम्न लिखित चरण गात चालला होताः—

सुखस्वप्नांतील सुंदर युवति पवित्र माझे नयन करी।
समक्ष मजला दर्शन देउनी कां न स्वप्न मम सफल करी॥

तो तरुण वरील दोन चरण गात गात चालला होता. तो मध्येंच उभा राही व मधेंच नेत्र–मिटून कोणा हृदय मूर्तीचें ध्यान करी आपल्या गाण्याचा अंतिम चरण तो वारंवार म्हणत असेः—

" कां न स्वप्न मम सफल करी ? "

गुंजारवसमान स्पष्ट व मधुर स्वरानें हृदयाचें अंतःस्थः भेदून तो गात होताः—

**कां न स्वप्न मम सफल करी ?**

यमुना गाढ निद्रितावस्थेंतच एका सुखस्वप्नाचा अनुभव घेत होती व वरील चरणाचें आपल्या निसर्गमधुर कंठानें उत्तर देत होतीः—

“ प्रेमानें ज्या हृदयीं धरिलें अर्पियलें ज्या प्राणाला
जगीं या माझा प्राणजीवन तो कारण होई सौख्याला

निद्रेंतच गात गात ती बाला उठून बसली व पहाते तों जन्मोजन्मींची परिचित व चिरवांच्छित प्रेममूर्ति आपल्या पुढें उभी आहे असें तिला दिसलें.

उभय प्रेमी युवकयुवती परस्पर प्रेमदृष्टिपात करित तटस्थ उभीं राहिलीं. दोघांचींही शरीरें रोमांचित झालीं व दोघेंही प्रेमपिपासु, अननुभूत आनंदांत निमग्न झालीं. किती आनंदमय आदर्श !

विस्मय, आनंद व मोह यानीं त्या उभयतांनाही क्षणमात्र वेडें बनवून सोडलें.

कोमलहृदयी यमुनेला आपल्या मनांतील आनंदाचा अवरोध करितां आला नाहीं. व त्यामुळें ती मूर्च्छित होऊन शिलातलावरचें पडली. ज्या वेळीं ती सावध झाली त्या वेळीं तिला समजलें कीं, आपलें मस्तक दुसऱ्या कोणीतरी आपल्या छातीशीं गच्च धरलें आहे. ती डोळे उघडून पहाते तों तिला तीच देवोपम मूर्ति आपल्या

शिरावरून हात फिरवीत असून एकाग्रदृष्टिनें आपलें मुखमंडळ पहात बसली आहे असें तिच्या दृष्टिस पडलें.

तो तरुण मनांतल्या मनांत पढील पद्य-चरण गात होता:—

रूप असें मी कधिं न देखिलें नेत्र आजि मम तृप्त जाहले ।।

---

## एकादश परिच्छेद.

# स्वप्नसत्यता.

" स्त्री वचः प्रत्ययो हन्ति विचारं महतामपि "

लालसेचा उद्भव प्रथम मनांत होत असतो व मग त्यालाच अनुसरून निद्रेंत स्वप्नें पडत असतात असें कित्येकांचें ह्मणणें आहे; व त्यांत कांहीं अंशीं सत्यताही आहे; परंतु स्वप्नसत्यता या जगांत कोणी क्वचितच मान्य करतो. कसेंही असलें तरी प्रेमराज्यांत सर्व वस्तु अद्भुत व विचित्र असतात. मग प्रेमस्वप्न अद्भुत व विचित्र असलें तर त्यांत काय आश्चर्य? प्रेमराज्यांत स्वप्नाची सत्यता अनेकवार अनुभवास येत असते. व सत्य वार्ता स्वप्नसमान होत असतात. ज्या वस्तुच्या अस्तित्वाविषयीं आमचा तुमचा पूर्ण भरंवसा आहे ज्या वस्तूचें प्रेमराज्यांत कोठेंच अस्तित्व दिसून येत नाहीं. तसेंच ज्या वस्तू अस्तित्वांत नाहींत असा आमचा

दृढभाव असतो त्या वस्तूचें प्रेमीजन अस्तित्व मानतात. इतकेंच नव्हे तर रात्रंदिवस ते त्या वस्तूंची पूजा करितांना दृष्टिस पडतात. साधारण मनुष्यांचा केवळ बाह्य जगासंगेंच व्यवहार असतो; पण प्रेमी प्रमदा पुरुष तर सदासर्वकाळ अंतर्जगतांतच निमग्न असतात. अंतर्जगतांतील सर्व तत्वें त्यांना ज्ञात असतात. सांगण्याचा तात्पर्यार्थ इतकाच कीं आपल्या दृष्टिनें जें सत्य असतें तें प्रेमीजनांना स्वप्नवत् भासतें व आपल्या विचारानुसार जें स्वप्न असतें तें प्रेमीजनांच्या दृष्टिसमोर सत्यस्वरूपानें विकास पावतें. एतदर्थ स्वप्नांला सर्वथैव मिथ्या व असत्य मानण्याचा विचार आपण तूर्त बाजून ठेवूं.

स्वप्नांत औषध प्राप्ति, अन्यस्थानीं गमन, अज्ञात वस्तूंचें ज्ञान, हास्य, रोदन, व चित्तपरिवर्तन इत्यादि गोष्टी घडल्याचें आपल्या ऐकण्यांत येतें व केव्हां केव्हां त्या प्रत्यक्ष दृष्टिसही पडतात तेव्हां स्वप्न सर्वथैव मिथ्या आहे असें तरी कसें ह्मणावें? स्वप्नावर पुष्कळांचा विश्वास असतो व प्रमाणप्रयोगांवरून कित्येकांनीं तर या विषयावर निबंधही लिहीले आहेत. एकंदरींत सूक्ष्म विचाराअन्तीं आपणास असें कबूल केलें पाहिजे कीं स्वप्नांतील सर्व प्रसंग सर्वथैव सत्य होत नसले तरी त्यांतील कित्येकांत सत्यता असते.

अशाच एका अद्भूत स्वप्नाचें दर्शन करून कुमार अमरसिंहानें आपल्या हृदयमंदिरांत प्रेम प्रतिमेची स्थापना केली

होती. आपल्या हृदय राजेश्वरीचें त्यानें स्वप्नांतच दर्शन केलें होतें. स्वप्नांत गौरवर्ण शरच्चंद्रमुखी सुंदरी अवलोकन करून तो अगदीं उन्मत्त बनून गेला होता. त्याला कांहीं एक सुचेनासें झालें. कोणत्याही कार्यावर मन लागेना. आपल्या पित्यानें स्विकारलेल्या कठीण व्रताचेंही हळुंहळू त्याला विस्मरण होत चाललें. पूजनार्चनादि सर्व व्यवहार स्वप्नांत पाहिलेल्या मोहिनीमूर्तिस अर्पण होऊं लागले. अवकाश मिळताच तो वनांत भ्रमण करण्यास निघत असे. तेव्हांसुद्धां तो मनांत चालणाऱ्या विचारांत निमग्न होऊन एका पद्यांतील निम्नलिखित चरण गात असे: —

सुख स्वप्नांतील सुंदर युवती पवित्र माझ नयन करी ।
समक्ष मजला दर्शन देउनी कां न स्वप्न मम सफल करी ॥

गाणें गातां गातां केव्हां तो रडे, केव्हां हंसे व केव्हां एखाद्या वेड्या माणसाप्रमाणें या पर्वतावरून त्या पर्वतावर व त्या पर्वतावरून या पर्वतावर विनाकारण भटकत असे. पद्याच्या प्रत्येक अक्षरांतील उच्चारांत त्याच्या मनाची व्यग्रता दृग्गोचर होत असे.

आज कोणाचें तोंड बघून तो बाहेर पडला होता कोण जाणे ? कारण त्याचें बहुत दिवसांचें स्वप्न आज एकाएकीं सत्य व सफल झालें.

दृष्टिलाभानें अंधाला, पुष्कळ दिवस हरवलेला पुत्र नजरेस पडला म्हणजे मातेला व मृतपति जीवंत झालेला पाहून ज्या प्रमाणें पतिव्रता स्त्रीला आनंद होतो तसाच किंबहुना

त्याहूनही अधिक आनंद स्वप्नांत पाहिलेल्या नायिकेस प्रत्यक्ष आपल्या नेत्रांसमोर पाहून आज अमरसिंहाच्या अनुभवास आला आपण स्वप्नांत आहे, कीं जागृतावस्थेंत आहें याचीही त्याच्या, मनांत शंका उत्पन्न झाली.

परस्परांच्या दृष्टीचें पूर्ण ऐक्य होतांच त्या प्रेमी युग्मानें परस्परांस ओळखिलें.ओळख पटतांच उभयतांच्या हृदयांत विद्युत्-प्रेमरूपी विद्युत-संचार झाला सुकुमार यमुनेला हा विद्युद्वेग न सहन झाल्यामुळें ती मूर्च्छित होऊन धाडकन् धरणीवर पडली

कुमार अमरसिंह मनांत ह्मणूं लागला-"हे ईश्वरा! आज तूं माझ्यावर कृपाळु होऊन मला माझ्या मानसचंद्रिकेच्या दर्शनाचा अचिंत्य लाभ करून दिलास. माझ्या नेत्रांतून अश्रूप्रवाह वहात असून या मुग्धेच्या नयनांची ही तीच अवस्था झाली आहे. अहाहा! हा केवढा अपूर्व योग! जन्मोजन्मीं या प्रियेच्या बाहुपाशांत बंदिवान होऊन रहाण्यांतच माझें सद्भाग्य आहे असें मला वाटतें! नेत्रांनों! तुह्मीं आतां निमिषमात्रही मिटूं नका. हिला ध्यानपूर्वक निरखित रहा खरोखर—"

"रूप असें मी कधिं न देखिलें, नेत्र आजि मम तृप्त जाहले"

"पण हें काय? ही माझी प्रेमप्रमिमा अशी कांपते कां? हिची मुखमुद्रा अशी म्लान कां दिसते? एकवार हिच्या संन्निध जाऊन हिची सत्य स्थिती काय आहे यांचें अवलोकन केलें पाहिजे. खरोखर ही मूर्च्छित झाली यांत लेशमात्रही संशय नाहीं."

अमरसिंह तत्काळ यमुनेपाशीं गेला व त्यानें तिचें मस्तक शिलातलावरून उचलून आपल्या छातीशीं गच्च धरलें.

अमरसिंहाच्या हृदयसमुद्रास भरती आली व तो आपल्या मनाशींच वार्तालाप करूं लागला—" ही कोणी देवकन्या आहे कीं काय ? हा स्वरूपनिधी मला प्राप्त होईल काय ? हिच्या स्पर्शानें माझें सर्व शरीर रोमांचित कां झालें. ही अबला कोण असेल बरें ? विवाहिता तर नसेल ? छे ! जर ही विवाहिता असती तर हिच्या सिमंतभागीं कुंकुमतिलक असता. तसेंच ही गतधवा असेल असें हिच्या वस्त्रांवरून तर दिसत नाहीं. खरोखर ही कुमारिकाच आहे. अहाहा ! ही रत्नमाला कोणा भाग्यवानाच्या कंठाला शोभा देणार बरें ? मना ! स्थिरहो ! ही रत्नमाला तुझ्याच कंठांत पडेल ! पण ही कोण याचा प्रथम शोध केला पाहिजे. हं ! पण हिच्याजवळ ही प्रस्तरमूर्ति पडली आहे ती कोणा भाग्यवान पुरुषाची ? अरे हें काय ? ही तर माझीच मूर्ति ! मना ! जरा धीर धर ! असें उतावीळ होऊं नको पण माझें समस्त शरीर असें कंपायमान कां होत आहे.

मृदु व मंद पवनलहरींच्या आघातानें त्या युवतीचे नेत्र हळुहळू उघडूं लागले. यमुना सावध झाली व हळु-हळु उठूनं बसली. तिनें आपली देवतुल्य ईप्सित मूर्ति आपल्या सन्निध असलेली पाहिली. आतां तिची खात्री

झाली. कीं आपण जें दृश्य पाहिलें होतें. तें स्वप्न नव्हे. पण सत्यघटना आहे.

गतकालिन अनेक घटनाचें एकाएकीं तिच्या हृदयांत स्मरण झालें. आज कित्येक दिवस आपण ज्याचें अनन्य-भावानें ध्यान करित होतें त्यानेंच आपलें मस्तक आपल्या छातीशीं गच्च धरलें आहे असें पाहून यमुनेला अत्यानंद झाला व त्या आनंदांतच ती पुनः मूर्च्छित होऊन अमर-सिंहाच्या अंगावर पडली. आनंदाची उकळी तिला सहन झाली नाहीं.

यमुना पुनः सावध झाली. व कंपितस्वरानें ह्मणाली—"हें काय! आपण कुमार? अमरसिंह?"

"होय! सुलोचने! मीच तो मेवाडाधिपतीचा जेष्ठ पुत्र अमर!" अमरसिंहानें विनयपूर्वक उत्तर दिलें.

अमरसिंहाच्या आश्चर्यास सीमा राहिली नाहीं. ही कोणी मायामयी कामिनी तर नसेल? आपलें नांव हिला कसें कळलें? अशा अनेक शंका त्याच्या मनांत आल्या. मनांत नानाप्रकारचे कुतर्क येऊं लागल्यामुळें अमरसिंहानें तिला विचारिलें-"सुंदरी! तूं कोण हें मला माहित नाहीं, करितां जर हरकत नसेल तर मला तुझा सर्व वृत्तांत कथन करून कृतार्थ कर. तूं भूलोकची भामिनी आहेस कीं स्वर्गलोकची सुंदरी आहेस हेंच मला अजून कळत नाहीं. तुझा वृत्तांत श्रवण करण्याची मला भारी उत्कंठा झाली आहे; व त्या उत्कंठेचें एक कारणही आहे. कारण कीं कारणाविना कोणतेंही कार्य होत नसतें."

मंदहास्य करित आपल्या सुमधुर वाणीनें यमुनेनें उत्तर दिलें—" कुमार! मी एक सामान्य स्त्री आहे. बिकानेरचे राठोड पृथ्वीराज माझे जेष्ट बंधू. मी दिल्लीहून महाराणाजीच्या चरणकमलांचें दर्शन घेण्यासाठीं मुद्दाम इकडे आलें आहें. माझें नांव यमुना."

थोडावेळ दोघेंही तटस्थ होतीं. मस्तकावर अनंत आकाश, चतुर्दिशांस विस्तीर्णपर्वतपंक्ति व निबिड अरण्य होतें. त्याठिकाणीं मनुष्य अगर वन्यपशु यांचा अगदीं अभाव होता.

ज्या मूर्तीची यमुनेनें आपल्या हृदयमंदिरांत स्थापना केली होती, आहारविहारीं, शयनस्वप्नीं ज्या मूर्तीचें ती सर्वदा ध्यान करीत असे. ज्या मूर्तीच्या प्रभावानें तिच्या मनांत विश्वविस्मृतिही होई व ज्या मूर्तीला आजपर्यंत चित्ररूपानेंच पाहून ती अगदीं तन्मय होऊन जाई, त्या मूर्तीला आपल्या जवळ बसून आपल्या हातांनीं आपलें मस्तक सांवरित असतांना पाहून यमुना अकल्पनीय आनंदसागरांत निमज्जन करूं लागली. तिला आपल्या देहाचेंही भान राहिलें नाहीं.

अमरसिंहाची सुंदर काया, उद्दीप्तरूपश्री, विशाल वक्षःस्थळ, अजानुबाहुहस्त, प्रशस्त ललाट व अप्रतिम सौंदर्य पाहून यमुनेला फारच धन्यता वाटूं लागली. नेत्र न मिटतां अखंड ध्यानपूर्वक ती अमरसिंहाचें रूपापियुषपान करूं लागली. आपलें जीवनसर्वस्व जो अमरसिंह तो हाच अशी तिची खात्री झाली. आतां त्याची प्रस्तरमूर्ती

स्वामीच्या शिरावर अनेक संकटें येऊन पडण्याचा संभव आहे. करितां मी जो तोंडी संदेह सांगितला आहे तो यथार्थ व सविस्तर त्यांना कळीव म्हणजे झालें."

प्रतापसिंह पृथ्वीराजाला चांगला ओळखित असे. मोंगलांच्या आश्रयाखालीं राहूनही पृथ्वीराज राठोड कोणत्याही प्रकारें नीतिभ्रष्ट कीं धर्मभ्रष्ट झाला नाहीं अशी प्रतापसिंहाची पूर्ण खात्री होती. तथापि पृथ्वीराज मोंगलांचा बंदिवान आहे, तो मोंगलांच्या समाजांत उठतो बसतो व मोंगलांच्या संपर्कानें अपवित्र झालेला वायु नित्य त्याच्या शरीरास स्पर्श करित असतो इतक्यासाठींच त्या व्रतधारी क्षत्रिय वीर प्रतापसिंहानें यमुनेबरोबर अमरसिंहाचा विवाहसंबंध जोडण्याबद्दल पृथ्वीराजाच्या विनंतीचा स्वीकार केला नाहीं. प्रतापसिंह मनांत म्हणूं लागला-" आर्यत्व व वंशाभिमान कायम राखण्यासाठींच केवळ मी वनवास स्वीकार केला आहे तेव्हां फक्त एकाच मनुष्याच्या कल्याणासाठीं मी माझ्या प्रतिज्ञेचा भंग करूं काय? छे! असें करणें मुळींच उचित नाहीं. अमराचा व यमुनेचा शरीरसंबध होणें सर्वथैव अशक्य व असंभवनीय आहे. पण शरणांगताचें रक्षण करणें हा आर्य जनांचा आद्यधर्म असल्यामुळें धर्मानुसार प्रायश्चित देऊन मी यमुनेला माझ्या घरांत स्थान देईन " प्रायश्चित्तादि धर्मविधि उरकल्यावर यमुनेला महाराण्याच्या अंतःपुरांत आश्रय मिळाला. प्रताप व प्रतापमहिषी पद्मावती यमुनेचें आपल्या कन्येप्रमाणें प्रेमानें पालन करूं लागलीं. अस्तु.

# चतुर्थ खण्ड—प्रतिज्ञापालन.

## प्रथम परिच्छेद.

## संकटाची सीमा.

" संकटेहि परिक्ष्यन्ते प्राज्ञाः शूराश्च संगरे । "



निस्सीम संकटांची प्रतापसिंहाच्या शिरावर वृष्टि होऊं लागली. तो वृत्तांत वाचून आपणाला अश्रुप्रवाहच केला पाहिजे. हळदी-घाटच्या युद्धांत प्रतापसिंहाचा पराभव झाल्या नंतर व शक्तिसिंह पुनः त्याला येऊन मिळाल्यानंतर प्रतापावर काय काय प्रसंग येऊन गुदरले त्यांचाच प्रस्तुत खंडांत उल्लेख करावयाचा आहे.

युद्धांत विजय मिळाल्यामुळें शहाजादा सेलीम महदानंदानें दिल्लीस परत फिरला. लौकरच वर्षाऋतुस प्रारंभ झाला. वर्षाकाळामुळें आरवली पर्वताचा प्रदेश अधिक दुर्गम व बिकट होऊन गेला. तेव्हां निरुपाय होऊन मोंगलांना आपलें कार्य कांहीं दिवस तरी बाजूस ठेवावें लागलें. ही संधि साधून प्रतापसिंहानें कांहीं रजपूत एकत्र करून पुनः युद्धाची तयारी चालविली.

एका हेरानें हें वर्तमान अकबर बादशहास कळविलें. तेव्हां वसंतऋतुचा प्रारंभ होतांच बादशहानें फार

चांगली तयारी करून प्रचंड सैन्यासह पुनः प्रतापसिंहाच्या राज्यावर चढाई केली. दुर्दैवप्राबल्यामुळें याप्रसंगींही प्रतापाचा पराभव झाला.

त्या नंतर मोंगलांनीं प्रतापाच्या नवीन राजधानीवर—कमळमीरावर—हल्ला केला. पराक्रमी रजपूतांनीं यावेळींही अपूर्व शौर्य दाखवून यवनांची दाणादाण करून सोडली व निरुपाय होऊन मोंगलांनीं परत फिरण्याचा निश्चय केला; इतक्यांत स्वज्ञातिद्रोही कुलांगाराच्या विश्वासघातानें प्रतापाचाच पराजय झाला.

मोंगलांना समजून चुकलें कीं, रजपूतांसमोर आतां आपला टिकाव लागणार नाहीं. तेव्हां त्यांनीं तेथून पळून जाण्याचा निश्चय केला. पण इतक्यांत मोंगल सेनापति शहाबाजखानें एक युक्ति शोधून काढिली. कमळमीरांत प्रतापाचा वैरी कोण आहे याचा तो शोध करूं लागला. हिंस्रकप्राणी व नीच मनुष्य सर्वत्र असतातच. अर्थात प्रतापाशीं गुप्त वैरभाव बाळगणारा कुटिल प्रकृतीचा एक रजपूत त्याच्या राजधानींत सांपडला' त्यानें प्रतापाच्या पराजयाचा एक सरळ व सोपा मार्ग शहाबाजखांस दाखविला. हा स्वदेशद्रोही कुलांगार अबुपति देवलराज!!

पापात्मा देवलराज आज पुष्कळ दिवस प्रतापाचा द्वेश करित होता. प्रतापाचें दिग्विजयी नांव व प्रशंसा ऐकून आंतून त्याचें हृदय दग्ध होत असे. आपणही याच्या-सारखाच राजा असतां आपणाला कोणीच कसा विचारित

नाहीं; व आपली सल्ला मसलतही कोण कशी घेत नाहीं असे विचार मनांत उद्भवूं लागल्यामुळें तो मनांतल्या मनांत अगदीं जळत असे. आपण तसाच हा. आपली नाहीं आणि याचीचमात्र एवढी कीर्ति कां गातात? अशा रितीनें सर्वकाळ त्याची द्वेशबुद्धि जागृत असल्याकारणानें समय साधून देवलराज मोंगल सेनापतीपाशीं गेला, व त्यानें स्वज्ञातिनाशाचा एक उत्तम उपाय यवनांस सुचविला!

युद्ध करून आपला हेतु साध्य होत नाहीं असें ज्यावेळीं मोंगल सेनापतीनें पाहिलें तेव्हां तो देवलराजाच्या उपदेशाप्रमाणें कपट कारस्थान करून जय संपादन करण्याच्या उद्योगास लागला. कमळमीरांत विहीरी, तलाव व झरे आदिकरून जितके कांहीं जलाशय होते त्या सर्वांत एकसमयावच्छेदें करून शहाबाजखानें विष घातलें. एका दिवसांत कमळमीरांतील सर्व जलाशय विषमय होऊन गेले. जे जे त्यांतील पाणी प्याले होते ते सर्व पटापट यमसदनीं—रवाना झाले. एका दिवसांत शेंकडो रजपूतांनीं स्वर्गीं प्रयाण केलें. शत्रूनें पाण्यांत वीष कालविलें आहे हें कोणालाच समजलें नाहीं.

जेथें पाण्याचाच अभाव तेथें मनुष्याचें जीवन तरी कसें टिकणार? विजयाचा दुसरा कोणताही उपाय न राहिल्यामुळें प्रतापसिंहानें कमळमीराचा त्याग केला. त्याच्या बरोबर हजारों रजपूतांनीं कमळमीरास अखेरचा प्रणाम केला. देवलराजाच्या विश्वासघातानें व स्वज्ञातिद्रोहाच्या

विचारानें प्रतापाचे नेत्र नीरमय होऊन तो म्हणाला— " आजपर्यंत माझा असा समज होता कीं, फक्त अंबरराज मानसिंहच काय तो स्वदेशद्रोही आहे. पण देवलराजा-सारखे आणखीही कुलांगार या आर्यभूमीवर जिवंत आहेत! हें मला आजच कळलें! वस्तुस्थिती अशी असल्यामुळें क्षत्रियांच्या सौभाग्यरविचा पुनः उदय होण्याची आशा बाळगणें व्यर्थ आहे! वास्तविक पहातां मोंगलांनीं हा देश कांहीं जिंकून घेतला नाहीं तर तो रजपूतांनीं आपण होऊनच त्यांच्या स्वाधीन केला आहे. ज्ञातिबांधवांच्या अशा विश्वासघातांचें स्मरण होतांच माझ्या नेत्रांतून निघणाऱ्या अश्रुप्रवाहाचा मला अवरोध करतां येत नाहीं! "

सर्वस्वी निर्बल व निरुपाय झालेला पाहून प्रतापसिंहानें आपल्या प्रियस्थानाचा–कमळमीराचा–त्याग केला. ज्या-स्थानीं वास करून अनेक कष्ट होत असतांही तो आपल्या व्रताचें पालन करित होता, ज्यास्थळीं आपल्या इच्छेनु-सार एका पर्णकुटिकेंत तो एखाद्या राजराजेश्वरापेक्षांही अधिक आनंदानें वास करित होता त्या स्थानाचा एका-एकीं इच्छा नसतांही त्याला त्याग करावा लागला अशा स्थितींत मोंगलांशीं टक्कर देणें सर्वथैव अशक्य होतें..कारण कीं काणी न करून जलाशयांतील पाणी प्याला तर तो तात्काळ मरत असे व ज्यांना शत्रूचें कपट कळलें होतें ते पाण्याविना हालहवाल होत होते. अशा रीतीनें कमळमी-रांत सर्वत्र हाः हाःकार उडून गेला. अशा स्थितींत शत्रू

बरोबर लढण्याचें कार्य अगदीं अशक्य असल्यामुळें युद्ध नकरितां देश शत्रूच्या हवालीं करून सर्व रजपूत तेथून चालते झाले.

तेथून निघून प्रताप मेवाडच्या नैऋत्य कोनांतील चप्पन नामक पर्वत प्रदेशांतील चौंद नगरांत जाऊन राहिला. या स्थलीं भिल्लांची दांडगी वस्ती होती. या संकटसमयांत भिल्लोकच प्रतापसिंहाचे आत्मीयबन्धु व सहायकारी बनले होते. पण दुर्दैवानें या स्थलींही प्रतापाला फार दिवस राहूं दिलें नाहीं. दुष्ट यवन तेथेंही त्याच्या मागें लागले प्रतापसिंहाबरोबर त्यांचें एक महा तुमुल युद्ध झालें. अतुलबलशाली रजपूतवीरांनी या युद्धांतही अद्भुत पराक्रम दर्शन केलें. पण दुर्दैव प्रतिकूल असल्यामुळें शेवटीं रजपूतांचाच पराजय झाला. एक तर रजपूतांची सेना अल्पसंख्यांक होती व दुसरें असें कीं ते अपरिचित स्थानीं येऊन पडल्यामुळें त्यांना युद्धाची पाहिजे तशी तयारी करतां आली नाहीं. मोंगलाचें सैन्य असंख्य होतें व त्यांची युद्धाची तयारीही फार चांगली असल्यामुळें या प्रसंगींही प्रतापाचाच पराभव झाला.

जरी पराभव झाला तरी पण प्रतापपक्षाच्या दोघां स्वदेशभक्त वीराग्रणींनीं या प्रसंगीं जें अपूर्व शौर्य दाखविलें त्याचें स्मरण झालें कीं, आमच्या नेत्रांतून आनंदाश्रु वाहूं लागतात. हे दोन वीराग्रणी ह्मणजे शोणगडस्थ भानुसिंह व मेवाडचा भट्ट चूडामणि होत. यांच्या स्वदेश-

भक्तीचें स्मरण होतांच कोणीही आश्चर्यचकित होऊन जाईल यांत लेशमात्रही संदेह नाही या दोघांही महापुरुषांनीं युद्धांत आपल्या सैनिकांच्या मनांत केवढ्या शौर्यावेशाचा उदय केला व शेवटीं असाधारण पराक्रम गाजवून समरभूमीस आपल्या प्राणांची आहुती देऊन वीरगति कशी मिळविली ही गतवार्ता खरोखर आश्चर्यचकित करून सोडणारी आहे. एका प्रिय कवीच्या व एका मुख्य सहाय्यकर्त्याच्या मृत्युमुळें प्रतापाच्या हृदयांत अनिवार दुःख झालें हें नव्यानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. कारण कीं असें होणें हें सर्वथा स्वाभाविक व नैसर्गिक आहे.

दिवसेंदिवस प्रतापसिंहाला सैन्यबळाची व सहायबळाची न्यूनता भासूं लागली. ज्ञातिबांधवांच्या कारस्थानामुळें अनेक युद्धांत प्रतापसिंहाचा पराभव झाला. धर्ममति व एक अन्यस्थान यांखेरीज दुसऱ्या कोणत्याही स्थलीं प्रतापाचा अधिकार राहिला नाहीं; परंतु सैन्यबळाची न्यूनता भासूं लागल्यामुळें हीं दोन्हीं स्थानें फार दिवस त्याच्या अधिकारांत राहूं शकलीं नाहीत. स्वदेशद्रोही मानसिंह एक मोठी सेना घेऊन या स्थानांवर चढाई करून आला व त्यानें प्रतापाचा पराजय करून हीं दोन्हीं स्थलें आपल्या ताब्यांत घेतलीं. प्रतापाच्या हृदयांत वज्राघातासमान वेदना होऊं लागल्या. दुर्जय केसरी प्रतापराणा आज पुरा पुरा दुर्दैवाच्या जाळ्यांत सांपडला. त्याच्या अधोगतीचा समय सुरु झाला.

आतां मेवाडांत आपलें ह्मणतां येईल असें एकही स्थल अवशेष राहिलें नाहीं. एका वेळींचा राजराजेश्वर आज मार्गांतून भटकणारा भिक्षुक व वनचर बनून गेला. जवळ द्रव्याचा सर्वथैव अभाव असल्यामुळें बाकी राहिलेल्या सैन्याला प्रतापानें रजा दिली व निवास करण्यास कोठेंही विशेष स्थान राहिलें नसल्यामुळें आतां आज येथें तर उद्यां तेथें अशास्थितींत प्रताप आपले दुःखद दिवस कंठूं लागला. निवासस्थानाचा अभाव झाल्यामुळें कदाचित् प्रतापसिंह आतां उजाड अशा उदयपूरांत पुनः जाऊन राहील अशी मानसिंहाची सूचना झाल्यामुळें अकबरानें महब्बतखानास उदयपूर हस्तगत करून घेण्यासाठी एकदम रवाना केलें. असें करण्यांत अकबराचा एवढाच हेतु होता कीं कोणत्याना कोणत्या तरी उपायानें प्रतापाला नमवावा. तो नेहमीं ह्मणत असे " प्रतापसिंहाला हा केवढा अभिमान ! अंबर, बिकानेर, मारवाड व अजमीर आदिकरून सर्व राज्यांच्या राजांना मी पादाक्रान्त केलें तेव्हां प्रतापसिंहाला पादाक्रान्त करण्यास मला कितीसा विलंब लागणार ? आतां पाहूं याचा अभिमान किती दिवस टिकतो तें ! " मनांत असा हेतू धरून अकबरानें सर्वत्र अगणित सैन्य व गुप्तदूत रवाना केले. तसेंच असेंही जाहीर केलें कीं जो कोणी प्रतापसिंहाला बंदिवान करून दिल्लींत घेऊन येईल अगर कसल्याही उपायानें त्याच्याकडून दिल्लीश्वराचें वर्चस्व मान्य करवील

त्या पुरुषाला मी या विशाल भरतखंडाचा दहावा हिस्सा इनाम देईन.

अकबरानें दाखविलेल्या या राज्यलोभाला भुलून जाऊन अनेक मोंगल वीर प्रतापाच्या मागें लागून त्याला पकडण्यासाठीं नानाप्रकारचे प्रयत्न करूं लागले. आश्रयहीन प्रतापसिंह जिकडे जिकडे जाई तिकडे तिकडे मोंगल लोक अचुक येऊन त्याच्यावर हल्ला करीत. इतकेंही झालें तरी प्रतापाला बंदिवान करून बादशहापुढें घेऊन जाण्यास कोणीही समर्थ झाला नाहीं. मोंगलांच्या सर्व युक्त्या व प्रयत्न-परंपरा सर्वथैव निष्फल झाल्या. आपल्यापाशीं असलेल्या मूठभर लोकांच्या मदतीनें योग्य प्रसंगीं प्रतापसिंह मोंगलांवर तुटून पडे व त्यांना त्राहि त्राहि करून सोडी

असें होतां होतां फिरून एकदां प्रतापसिंह आपल्या प्राणप्रिय भिल्लजनाच्या संगतींत चौंद नामक गांवांत राहूं लागला. बाकी राहिलेल्या थोड्या रजपूतांच्या शौर्यानें व भिलांच्या अचुक बाणवृष्टिनें मोंगल सैनिक अगदीं छिन्नभिन्न होऊन गेले. इतक्यात वर्षाऋतूला प्रारंभ झाल्यामुळें बाकी राहिलेलें मोंगल सैन्य पुनः दिल्लीस परत गेलें. व त्यामुळें प्रतापाला थोडे दिवस तरी युद्ध व्यवसायापासून स्वस्थता व विश्रांति मिळाली.

स्वस्थता ह्मणजे प्रतापाला बाह्यस्वस्थताच होती. अंतरींची स्वस्थता नव्हती. अकबरानें अशी प्रतिज्ञा केली होती कीं, कोणत्यांना कोणत्यातरी उपायानें व युक्तीनें

प्रतापाचा पूर्ण पराजय करून त्याला यवनांचा अंकित करावयाचा या विचारांस अनुसरून आपला हेतू साध्य करण्यासाठीं तो एकामागून एक गुप्त दूत, नवीं नवीं सैन्यें व सेनापति वारंवार आरवलीपर्वताच्या दुर्गमप्रदेशांत पाठवूं लागला वसंतऋतूचा प्रारंभ होतांच मोंगल लोक नवीन तयारीनें आपल्या कार्यास लागले. त्यांनीं चोंहो-बाजूनीं प्रतापसिंहास घेरून त्याला बंदिवान करण्याचे जीवापाड प्रयत्न सुरू केले पण मोंगलांची ही आशा सर्वथैव वंध्यापुत्र व शृगालशृंग प्राप्तिप्रमाणें व्यर्थ होती. प्रतापाला पकडून बंदिवान करण्याची मनुष्यप्राण्यांत शक्तिच नव्हती. याप्रसंगीं प्रतापाला चौंदनगराचा त्याग करावा लागून अरण्यांत भटकत फिरणें भाग पडलें. राजराजेश्वर मेवाडाधिपतीच्या संकटांची सीमा झाली! आपला परिवारही त्याला दुःखद भासूं लागला!

## द्वितीय परिच्छेद.

## धैर्याची परमावधि.

'वनेपि सिंहा मृगमांस भक्षिणो बुभुक्षिता नैव तृणं चरन्ति एवं कुलीना व्यसनाभिभूता न नीच कर्माणि समाचरन्ति।"



ता मेवाडचा कोणताही भाग महाराणा प्रतापसिंहाकडे नाममात्रही राहिला नाहीं. सर्व नगरें, सर्व दुर्ग व सर्व भूमि त्याच्या

अधिकारांतून गेली. प्रतापसिंह कक्षाभ्रष्ट. ग्रहाप्रमाणें जिकडे मनास येईल तिकडे भटकूं लागला. त्याचें हृदय उदास होऊन गेलें व स्वतःचें जीवनसुद्धां त्याला भाररूप भासूं लागलें. त्याचें अंतःकरण भयंकरदुःखानीं परिपूर्ण झालें. शांति, सुख. आशा व विश्वास इत्यादिकांचा त्याच्या मनांत सर्वथैव अभाव होऊन गेला. फक्त उदार स्वदेशभक्ति, उच्चतम कल्पना व स्थिर दृष्टि या तीन वस्तुच त्याचेठायीं शेष राहिल्या होत्या

पण अरेरे! यावेळीं प्रतापाचे पुत्रकलत्रादि दुर्दैवी परिवारजन त्याला काळस्वरूप होऊन गेले. त्याच्या स्वतःच्या परिवाराशिवाय दुसरींही कित्येक माणसें छाये· प्रमाणें त्याच्यासंगें अद्यापि वास करित होतीं. एकीकडे मोंगलांचा हल्ला व दुसरीकडून परिवारजनांच्या व अन्य- जनांच्या भरण पोषणाचा भयंकर मार-या दोन विडंबनेनें प्रतापसिंह अगदीं जर्जर होऊन गेला. मेवाडदेशाधिपति राजचक्रवर्ती प्रतापसिंहाला आज एखाद्या सामान्य माणसा- प्रमाणें या तुच्छ संसाराच्या चिन्तेंत दिवस काढण्याचा भयंकर प्रसंग पहावा व अनुभवावा लागला!

एखाद्या सामान्य संसारी माणसाच्या नशिबीं जी सुखशान्ति असते तीही प्रतापसिंहाच्या नशिबीं नव्हती. सामान्य मनुष्य संसाराचीं सुखदुःखें भोगून आपला काल- क्रमण करतो व त्या विषयीं त्याच्या मनांत फारसा खेदही होत नाहीं; परंतु प्रतापसिंहासारख्या राजपुरुषानें अशा

रीतीनें निमूटपणें दिवस कंठावे हें सर्वथा अशक्य नव्हे तर असंभवनीयच होतें. ज्याची क्षुधा विश्वव्यापिनी असते, जीवनसंग्राम ज्याचा धर्म असतो व ज्याचा हेतू लोकोत्तर असतो त्याच्या आयुष्यांतील सुखदुःखाची. तुलना सामान्यसंसारी जनाच्या आयुष्यांतील सुखदुःखाशीं कशी बरें होणार ? ग्रीष्म ऋतूंतील प्रचंडतापाच्या परितापानें श्रांत झालेल्या प्रवाशाच्या शांत्यर्थ विशाल वृक्षाची घनछाया व शीतल जल हेच दोन पदार्थ पुरे आहेत. पण आजन्म हृदयांत दृढ केलेल्या हेतूंच्या सिध्यर्थ ज्यानें प्रचंड वनवासाचा स्विकार केला त्याच्या मनाची शांति दुसऱ्या कशानें होणार बरें ? भीष्मपितामहाची पिपासा पात्रस्थ परिमित जलानें तृप्त होणारी नव्हती. त्यांची ती अंतिम तृषा शांत करण्यासाठीं वीराग्रणी अर्जुनाला पृथ्वीतल विदीर्ण करून भोगवतीला मृत्युलोकांत आणणें भाग पडलें

जन्मभूमीच्या स्वातंत्र्यरक्षणासाठीं प्राणार्पण करणाऱ्या पुण्यश्लोक प्रतापसिंहाची सुखशांति व तृष्णा सर्वांशी भीष्मतृष्णे प्रमाणेंच होती. अर्थात सामान्य संसारी गृहस्थाच्या सुखशांतिशीं व तृष्णेशीं प्रतापाच्या इच्छेची तुलना करणेंच मुळीं अशक्य आहे.

तथापि सामान्य संसारी माणसाच्या घरांत जीं साधनें असतात तितकीं साधनेंसुद्धां आतां प्रतापापाशीं नव्हतीं. संसारी जनांना कुटुंबापालनपोषणाचा कांहींतरी मार्ग असतो, निवासासाठीं स्थानही असतें व त्यांच्या सुख

दुःखाचा भाग घेणारींही कांहीं माणसें असतात. पण प्रतापाच्या गृहांत या सर्वांचा सर्वांशीं अभाव होता. तेव्हां त्याच्या स्थितिची तुलना कोणाच्या स्थितीशीं करणार? रस्त्यांतून भिक्षावृत्ति करणारे भिक्षुक सुद्धां आतां प्रतापापेक्षां सहस्त्रपट विशेष सुखी ह्मणतां येतील! प्रतापसिंहाच्या गंभीर हृदयांत आतां केवढे केवढे भयंकर विचार येत असतील याची केवळ कल्पना करणें ह्मणजे मोठें साहसच ह्मटलें पाहिजे.

खरोखर प्रस्तुत समयीं त्याचा परिवारवर्गच त्याच्यापुढें काळस्वरूप उभा होता. या सर्वांस खायाला काय घालावें? शत्रूनीं आक्रमण केलें तर त्यांचें रक्षण कसें करावें व शत्रूशीं कोणत्या रीतीनें लढावें? अशा अनेक विचारांनीं त्याला भंडावून सोडलें. शिवाय परिवारजनाच्या पीडेमुळें घटकाभर शान्तपणें विचार करण्यासही त्याला वेळ नव्हता. मोंगल येऊन आपणावर हल्ला करून आपणा सर्वांचा संहार करितील, आपल्या परिवार वर्गाचें लज्जा रण करितील इत्यादि विचारांनीं प्रतापाचें मन सदासर्वदा अस्थिर व अधीर होत असे व खरोखर पहातां मोंगलांनींहि पण याच नीच मार्गाचें अवलंबन केलें होतें. असें करण्यांत मोंगलांचा असा मुख्य हेतू होता कीं, कोणत्याहि उपायानें आपणाला प्रतापसिंहास बंदिवान तर करितां येत नाहीं तेव्हां जरी त्याच्या कुटुंबांतील कोणालाहि लज्जाहीन करितां आलें तरी पुरे. विस्तीर्ण मेवाडांत

आतां प्रतापसिंहाला कोणत्याहि स्थलीं कोणीहि आश्रय देण्याचें साहस करणार नाहीं अशी मोंगलांची पूर्ण खात्री होती. शिवाय अशा आणीबाणीच्या प्रसंगीं प्रतापसिंह आपल्या परिवार वर्गाला आपल्यापासून दूर करणार नाहीं अशी पूर्ण खातरजमा ते बाळगून होते. तेव्हां या समयाचा फायदा घेऊन आपलें कार्य साधावें व बादशहाची कृपा संपादन करून त्यानें जाहीर केलेला उपहार प्राप्त करून घेण्याचा अवसर व्यर्थ न दवडावा अशा अशा अनेकविध मनोरथांत मोंगलसैनिक निमग्न होते.

प्रतापसिंहाची आतां अशी धारणा होऊन गेली कीं परमेश्वराचा आपल्यावर पुरा पुरा कोप झाला आहे व आपल्या या परिवारवर्गामुळेंच आपल्या जीवनव्रताचा भंग होऊन अशा संकटसमयांत आपल्या मनुष्यत्वाचा व धर्माचा लोप होण्याचा पुष्कळ संभव आहे.

शेवटीं दुर्भाग्याची परमावधि झाली. प्रतापाला आतां अन्न मिळण्याचेंही दुर्लभ होऊं लागलें, अशी स्थिती पाहून जे कित्येक लेंचेपेंचे लोक केवळ उदरंभरणाच्या लालसेनें त्याच्याकडे राहिले होते ते एकामागून एक त्याला सोडून जाऊं लागले. फक्त त्याचे कुटुंबीजन व कांहीं एकनिष्ठ सेवक इतकेच काय ते अचलभावानें त्याच्याकडे राहिले. ते एकनिष्ठ सेवक अरण्यांत शिकार करून जें कांहीं मिळे तें प्रतापापुढें आणून हजर करीत. प्रतापाचा दुर्दैवी परिवार दुःखांत जेमतेम दिवस घालवूं लागला.

राजराजेश्वर प्रतापसिंह आज स्त्रीपुत्र—कन्यादिकांचा हात धरून एखाद्या चोराप्रमाणें एका अरण्यांतून दुसऱ्या अरण्यां व एका पर्वतावरून दुसऱ्या पर्वतावर असा भटकूं लागला. एकदां सर्व दिवसभर भटकल्यानंतर तो आपल्या स्त्रीपुत्र कन्यासहवर्तमान कंदमुळें भक्षण करण्यास एका विशालवृक्षाच्या छायेखालीं बसला होता. इतक्यांत एक राजनिष्ठ भिल्ल सरदार येऊन सांगूं लागला-" महाराज ! त्वरा करून एकदांचें येथून पलायन करा. कारण आपण येथें आहां ही बातमी मोंगलांना कळली असून ते आपणास पकडण्यासाठीं मोठें सैन्य घेऊन येत आहेत " ही अशुभ वार्ता ऐकतांच फलमूलादि भूमातेस अर्पण करून प्रतापसिंह आपल्या परिवारासह तेथून त्वरित दुसऱ्या एका अरण्यांत निघून गेला. एकेदिवशीं एका दुर्गम पर्वतकंदरांत क्षुधाप्राबल्यानें आलेल्या ज्वरानें तो पीडीत होता. बालकें क्षुधेनें अत्यंत व्याकूळ होऊन गेलीं होतीं. इतक्यांत एक भिल्ल थोडें पाणी, थोडें हरिणाचें मांस व थोडें वन्यवराहाचें मांस घेऊन तेथें आला. त्याला पाहून प्रतापमहिषी पद्मावतीनें कृतज्ञतापूर्वक त्याचे आभार मानले. त्यानंतर गवत, गोंवऱ्या वगैरे जाळून तिनें तें मांस भाजलें, बालकांनां खाऊं घातलें व प्रतापसिंह व आपण तें खाण्याच्या तयारींत होतीं इतक्यांत मोंगलांनीं येऊन अचानक त्यांच्यावर हल्ला केला. खाणें जागच्याजागींच राहिलें, अन्नपाणी सर्व तसेंच टाकून देऊन त्या

राजपरिवारानें फार त्वरेनें तेथून पलायन करून कसें-बसें आपले प्राण रक्षण केले. मोंगल निराश होऊन मागें फिरले.

अशीं अनेक प्रकारचीं नवीं नवीं संकटें भोगतां भोगतां दिवस, मास, व वर्षें जाऊं लागलीं; पण संकटावस्थेचा अंत झाला नाहीं. इतकेंच नाहीं तर दिवसेंदिवस संकटांची वृद्धिच होत गेली. दारिद्र्य आपला प्रभाव चांगलाच दाखवूं लागलें. प्रतापसिंहाचीं बालकें क्षुधेनें व्याकुळ झालीं कीं त्यांच्या गळीं पडून रडत असत. तरी पण तो पुण्यात्मा आपल्या व्रतापासून लेशमात्रही ढळला नाहीं, कीं शत्रुपुढें [illegible]ची यत्किंचितही भावना त्याला झाली नाहीं. मोंगल बादशहाच्या जासूदांनीं प्रतापाच्या या दुःखद्दशेचें आपल्या नेत्रांनीं निरीक्षण करून अकबराला सर्व वृत्तान्त निवेदन केला. तेव्हां अकबर ह्मणाला -" प्रतापसिंहाला जाऊन असें कळवा कीं आपण हरलों व तह करण्याची आपली इच्छा आहे इतकेंच लिहून कळीव ह्मणजे मी मद्दा गौरवानें त्याला मेवाडचें साम्राज्य अर्पण करण्यास तयार आहे." बादशहाचा हा संदेश [illegible] जासुदानें येऊन प्रतापसिंहाला कळविला. संदेश ऐकून प्रतापसिंहानें फक्त मस्तक हलविलें व उत्तर न देतां जासुदास रवाना केलें

अकबराचा संदेश निवेदन करतांना जासुदाच्या नेत्रांतून अश्रूंचा प्रवाह सुरु होता. गुप्तवेशानें येऊन ज्यावेळीं

त्यानें प्रतापाच्या दीनदशेचें अवलोकन केलें त्यावेळींही त्याच्या नेत्रांतून असाच अश्रुप्रवाह सुरु झाला होता. पण त्याच्या अश्रुवर्षणाचें काय बरें कारण असेल? दुःखिताचें दुःख पाहून त्यानें रोदन केलें काय? नाहीं. कारण या जगांत शेंकडा नव्वद माणसें दुःखींच असतात. तेव्हां त्यांचें दुःख पाहून कोण अश्रु ढाळणार? जासुदाच्या अश्रुवर्षावाचें हें कारण नव्हतें. प्रतापाच्या महत्वगांभीर्यादि गुणाचें अवलोकन करतांच त्याच्या मनांत भक्ति, श्रद्धा व विस्मय यांचा उदय होऊं लागला व त्या मुळेंच त्याच्या नेत्रांत अश्रूंचा आविर्भाव झाला होता. त्या मुळेंच त्याचें मन द्रवलें होतें. मनुष्य प्रकृति सर्वस्थानीं एकाच तत्वाची बनलेली असते, तेव्हां एका माणसाचें पौरुषत्व व मानसिक गांभीर्य पाहून दुसऱ्या मनुष्यानें नम्रतापूर्वक सद्गदित झालेंच पाहिजे. त्यानें त्याच्या गुणांची प्रशंसा केलीच पाहिजे.

जासुदाच्या नेत्रांतून अश्रूप्रवाह छूत असलेला पाहूनही प्रतापाचें चित्त चलित झालें नाहीं. सरदारांपैकीं कित्येकांनीं प्रतापाच्या मुखाकडे दृष्टिपात केला. अंतर्ज्ञानानें त्या दृष्टिपाताचें रहस्य समजून प्रतापसिंहानें आपल्या चर्येंत कांहीं खिन्नतेचा भाव प्रदर्शित केला. बादशहानें पाठविलेलें हें गौरवयुक्त निमंत्रण वडील मान्य करतील अशा आशेनें कुमार अमरसिंहही आपल्या पित्याच्या मुखाचें ध्यानपूर्वक अवलोकन करूं लागला. तेव्हां प्रतापानें

त्याच्याकडे एक तीव्र कटाक्ष फेंकला. जासुदानें ही स्थिती पाहिली व शेवटीं तो अश्रुप्लाळित तेथून चालता झाला.

या समयीं सर्वांच्या मनाची विलक्षण स्थिती होऊन गेली होती. प्रत्येक जण प्रतापाच्या मुखाकडे पहात तटस्थ उभा होता. तेव्हां सर्वांस उद्देशून प्रतापसिंह महा गंभीर वाणीनें म्हणाला—

" सरदारहो! तुम्ही मला बादशहाचें निमंत्रण मान्य करण्याची सूचना दर्शवीत होतां त्याचें काय बरें कारण? याचें नांव पौरुषत्व काय? अशा रीतीनेंच तुम्हीं व्रतपालन करित असतां कीं काय? असें वर्तन करून संकटांच्या परिक्षेंत तुम्हीं कसे उत्तीर्ण होणार? ज्यानें आपल्या माया: बळानें आपणाला या अवस्थेस आणून सोडलें तो आज हें दूतस्वरूप धारण करून आमची परिक्षा घेण्यास आला होता! जर असें नसतें तर मोंगलांच्या जासुदाचें अंत:करण आमच्या दु:खानें द्रवण्याचें कांहीं कारण नव्हतें. दुसरें असें कीं दिल्लीश्वर असें निमंत्रण पाठवील हें मला सर्वथैव अशक्यच दिसत आहे. ज्यानें दिल्लीश्वराच्या व या जासुदाच्या मनांत असली प्रेरणा केली त्याची जर आपणावर कृपादृष्टि झाली तर निमिषमात्रांत आपल्या सर्व मनोवासना पूर्ण होऊन जातील. अशाश्रद्धेनेंच मी म्हणतों कीं, आपला सर्व भार त्या परमेश्वराच्याच शिरावर असूं दे! तोंडानें न बोलतां फक्त संकेतानेंच तुम्हीं मला व्रतच्युत होण्याचा सल्ला देत होतां या पापकृतिबद्दल मनांत पूर्ण

पश्चाताप करा म्हणजे कोणत्याही प्रसंगीं तुह्माला पुनः असें पाप करण्याची इच्छा शिवणार नाही, [illegible] ! तूं माझाच पुत्र काय ? "

कुमार अमरसिंह एकाद्या अपराधी मनु[illegible] थर कांपूं लागला व [illegible] दीं [illegible] होऊन गेला.

---

## तृतीय परिच्छेद.

## यमुनेचें संगीत.

सुभाषितेन गीतेन युवतीनां च लीलया ।
मनो न भिद्यते यस्य स योगी अथवा पशुः ॥

दशदिशा दणाणून सोडणाऱ्या व युवतीप्रमाणें भासणाऱ्या सुमधुर कंठानें कोणी निम्नलिखित पद्य गाण्यास प्रारंभ केला.

" स्वतंत्रतेच्या रक्षका ! मृत्युलोकींचा देव तूं ।
स्वदेशरति तव लक्ष्मी भोगी असुनी विरक्त तूं ॥
अजुनी अनुभवसी तू असह्य आपद्धारा ।
सेवा तुझी करुनी होई सफल मज्जन्म सारा ॥ "

सर्व एकाग्रमनानें हें संगीत ऐकूं लागले. सर्वांचीं शरीरें रोमांचित झालीं. या संगीताचा अर्थ सर्वांच्या चटकन ध्यानांत आला. ज्याला उद्देशून हें पद्य म्हटलें होतें त्याला सुद्धां या गायनाचा हेतू समजला. थोडा वेळ सर्वत्र शांति

होती. नंतर एक दीर्घ निःश्वास टाकून प्रतापसिंह ह्मणाला— " हे पृथ्वीराज! अशा प्रसंगीं जर तूं येथें असतास तर किती बरें चांगलें झालें असतें." त्यानंतर सर्वांस उद्देशून तो ह्मणाला- " बिकानेरच्या राठोडराजानें—आमच्या पृथ्वीराजानें - कारागृहांत असतांही पद्यरचना करून उपहाररूपानें माझ्याकडे पाठविली आहे. आमची स्नेहमयी भगिनी यमुना मलाच उद्देशून हें पद्य गात होती. बाळेचा कंठ फार मधुर व कर्णप्रीय आहे!"

पुनरपि त्याच मधुर कंठानें यमुना गाऊं लागली:

सुतीक्ष्ण असिधारेनें जो जन्मभूमि उर भेदी।
परनर करीं भू देई दूर करा तो गृहभेदी॥

प्रतापसिंह फार खेदपूर्वक मनांत ह्मणूं लागला— " खरोखर कित्येक रजपूतांनी तर आपली संपत्ति स्वहस्तानींच यवनांच्या हातीं दिली यांत लेशमात्रही संदेह नाहीं. हे कुलांगारांनो! तुह्मीं जर स्वदेशावर शस्त्र उचललें नसतें तर आज हा असा प्रसंग खास आला नसता

यमुना गात गात एकध्यान होऊन गेली:—

" बद्ध होती सर्वही काळपाशीं।
राहसी तूं चिरंजीव पुण्यराशी॥
होई नष्ट हा मानवी जन्म माझा।
गुणग्राही तो पृथूराज तूझा॥ "

गाणें ऐकून प्रतापसिंह ह्मणाला—" धन्य! स्वदेशभक्त कविश्रेष्ठा, धन्य तुझी! तूं कारागृहांत असूनही तुझी अशी स्वदेशभक्ति जागृत आहे तेव्हां तुझ्या जन्माचें सार्थकच

झालें असें ह्मटलें पाहिजे. तूं खरा स्वदेशप्रेमी महात्मा आहेस यांत अणुरेणुसुद्धां संदेह नाहीं. मेवाडचें दुर्दैव महा प्रबळ असल्यामुळेंच तुझ्यासारखे महा पुरुष. येथें असण्याऐवजीं यावेळीं मोंगलांचें बंदिवान आहेत, व—"

प्रतापसिंहाच्या आंतरिक उद्गारांची समाप्ति होण्यापूर्वींच यमुनेनें आपल्या रंभा–उर्वशीसम मधुर, मनोहर कंठानें पुनः संगीताचा आलाप घेतलाः—

" जीवन तूं ध्यान माझें, तव मूर्ति ज्ञानदा ।
दर्पण तूं शुद्धराणा अकलंकी सर्वदा ॥
उपजविशी देश प्रीति अज्ञानी जनपदीं ।
ह्मणुनी हें स्तोत्र आजि अर्पी मी तवपदीं ॥ "

गात गात यमुना प्रतापसिंहापुढें मोठ्या विनयानें येऊन उभी राहिली व साष्टांग प्रणिपात करून पुनः गाऊं लागली.

भूमातेची भावी आशा तूझेठायीं वसे खरी ।
क्षत्रिय मानसीं स्फूर्ति शौर्य उत्पादक तूं अवतारी ॥
क्षत्रिय वंश कीर्ति परिपालक स्वधर्मरत तूं भारी ।
आमरण तव महिमा गावा धरिली आशा हीच उरीं॥

आपल्या संगीताची समाप्ति करून यमुना ह्मणाली " महाराज ! आज बाजूला राहून मी जो एक स्वर्गीय प्रकार पाहिला त्याचें चित्र आमरण माझ्या हृदयपटांत बिंबून राहील. महाराज ! आपण ज्या व्रताचा स्वीकार केला आहे त्याचें परिपालन आपण योग्यरीतीनेंच करित आहां. माझा दादा वारंवार ह्मणत असे कीं, महाराणाजी हे मनुष्य नव्हत तर मनुष्यरूपी ईश्वर आहेत. हें सर्वथा

सत्य आहे. आज ईश्वर दर्शनानें माझ्या जन्मांची सार्थकता झाली असें मला वाटतें !!

थोड्या वेळानें यमुना पुनः ह्मणाली-" माझ्या दादांची मला अशी आज्ञा आहे कीं महाराणाजी जेव्हां जेव्हां दुःखानें फार खिन्न झालेले दिसतील तेव्हां तेव्हां त्यांची पद्यरचना गाऊन दाखवून महाराणांजींच्या मनाचें मी सांतवन करावें, या आज्ञेला अनुसरूनच मी आतां हीं पद्यें गायलीं. एतदर्थ या दीन कन्येवर कोप नसावा अशी माझी अनन्यभावें करून आपल्या चरणांपाशीं नम्र विनंती आहे."

"यमुने ! तुझ्या गाण्यानें मी फार प्रसन्न झालों आहे." प्रतापसिंह ह्मणाला—" पण आत्मप्रशंसा ऐकण्याची मला इच्छा नसल्यामुळें माझी तुला आज्ञा आहे कीं, तुझ्या मनांतील भाव मनांतच राहूंदे. तुझ्या बंधूला मी पुष्कळ दिवस ओळखित आहे. तसेंच तुलाहि ओळखितों. ईश्वर तुझें कल्याण करील !

" महाराज माझें कल्याण ! "

यमुनेनें हा प्रश्न अत्यंत उत्कंठापूर्वक विचारिला हें प्रतापसिंहाच्या ध्यानांत आलें. पण त्याचें उत्तर देण्याचें कार्य फारच कठीण होतें. प्रताप मनांत ह्मणूं लागला— " या सरळहृदयी बालेच्या हृदयांत जो प्रेमरूपी हेतू उत्पन्न झाला आहे तो सदैव अपूर्णच रहाणार ! पण त्याला माझा तरी काय उपाय ? स्नेह व करुणा या दोन अपूर्व

वस्तू आहेत खऱ्या पण धर्म या दोघांही पेक्षां विशेष अपूर्व आहे. धर्मासारख्या अमूल्य वस्तूचा त्याग करून स्नेह व करुणा यांच्या पाशांत बद्ध होणें हें माझ्या हातून होणें शक्य नाहीं यमुनेचा पुष्कळ काळ मोंगलनगरांत गेला असल्या कारणानें ती माझी स्नुषा होणें शक्य नाहीं. अमरसिंहासीं तिचा विवाह होणें सर्वथैव असंभवनीय दिसतें."

नंतर यमुनेस उद्देशून प्रताप ह्मणाला- "होय! तुझेंच कल्याण! भगवत्चरणीं निमग्न हो ह्मणजे इहलोकीं व परलोकीं तुझें कल्याणच होईल!"

हें ऐकून यमुना आपल्या मनांत ह्मणूं लागली-"योग्य उत्तर मिळालें! माझे इहपरलोकचे भगवान जे कुमार अमरसिंह त्यांच्या चरणीं मी आज बहुत दिवस निमग्न आहे. कदाचित् या जन्मीं मला त्यांची प्राप्ति झाली नाहीं, तरी जन्मांतरीं ते मला मिळतीलच! या आशेनेंच मी अद्यापि जीवनधारणा केली आहे. माझ्या प्राणविश्रामाच्या दर्शनाचा लाभ मला झाला हें तरी माझें लहानसहान भाग्य काय?"

यमुनेचे नेत्र पाण्यानें भरून येऊन तिच्या कंठाचा एकाएकीं अवरोध होऊन गेला. ती अश्रुपूर्ण नयनानीं व अवरुद्ध कंठानें प्रतापसिंहाच्या मुखाचें अवलोकन करित निम्न लिखित पद्य गात गात तेथून चालती झाली.

"अर्पण केले प्राण तवपदीं अर्पण केले प्राण।
भवाब्धितुनि या तरण्याकरितां तूं मम्नौका जाण। तवपदीं।
जीवनयात्राधार तवशिरीं तूंच कृपेची खाण ॥ तवपदीं ॥

सुखदुःखीं मी एकाभावें करितें तुझें ध्यान ॥ तवपदीं ॥
उचित तुला जें वाटे तें तूं कर मम सौख्यविधान ॥ तव०॥

प्रतापसिंह मनांत ह्मणूं लागला–" अहाहा ! या बालेचें हृदय किती कोमल आहे ! पण हिच्यापुढें काळसमुद्र, पसरला आहे त्यांतून ही कशी बरें तरून जाणार ? तसेंच पृथ्वीराजानेंही केवढ्या मोठ्या आशेनें हिला–पण मना हें काय ? तूं दयेच्या जालांत सांपडण्याचा प्रयत्न करावा काय ? छे ! असें करूं नको. कर्तव्यकर्म व धर्मरक्षण यासाठीं तूं कठोरच बनलें पाहिजे. जीनें काफरनगरांत फक्त एकच दिवस वास केला आहे. तीसुद्धां माझी स्नुषा होणें कधींही शक्य नाहीं ! असंभवनीय ! सर्वथैव मग यमुना तर !—"

यमुनेच्या गाण्याचे अंतिमचरण ऐकून व एक दीर्घ निःश्वास टाकून अमरसिंह आपल्या मनांत ह्मणूं लागला– " पण हें विधान कोण करणार ? यमुनेनें कोणाला बरें उद्देशून ही प्रार्थना केली असेल ; पण हें काय ? माझ्या हृदयरूपी नदींत एकाएकीं अशा या लहरींचा कसा उद्भव झाला ? अशा अवस्थेंत पित्यासमक्ष उभें रहाणें चांगलें नाहीं. कदाचित् माझ्या मनांतील भाव पिताजीला कळला तर काम मोठें कठीण आहे ! हे सरळ हृदय सुंदरी ! तूं मजसारख्या एका निष्ठूर नराला कां बरें प्राणार्पण केलें?"

अमरसिंहाच्या नेत्रांतून अश्रूंचे दोन उष्ण बिंदु खालीं गळले. आपल्या नेत्रांत कांहीं पडल्याचें निमित्त करून तो तेथून डोळे चोळित चोळित विद्युद्वेगानें निघून गेला.

## चतुर्थ परिच्छेद.

# जबरा जंगलांत.

उदये सविता रक्तो रक्तश्चास्तमने तथा
संपत्तौ च विपत्तौ च महता मेकरूपता।



पुण्यश्लोक राजराजेश्वर महाराणा प्रतापसिंह आतां संपूर्णरीतीनें दुर्दैवचक्रांत सांपडला होता; तरी त्यानें आपलें गांभीर्य सोडलें नाहीं, इतकेंच नाहीं तर विपत्तीकालांत त्यानें आपल्या औदार्याचें विशेषच दर्शन केलें. क्षुधेनें व्याकूळ झालेल्या बालकांचीं दीनवदनें, पट्टराणीचा भिकारवेष व आपल्यापाशीं सर्व वस्तूंचा पूर्ण अभाव पाहूनही तो आपल्या व्रतापासून चळला नाहीं, त्याची ही निःसीम दृढता, असाधारण कष्टसहिष्णुता संपत्ति-विपत्तींतील मनाची समानता, तसेंच अंतर्बाह्य शुद्ध वर्तन इत्यादि गुणाचें स्मरण झालें म्हणजे आपलें मन आश्चर्यचकित होऊन हृदयांत कालवाकालव होते. योगिजन आपल्या योगबलानें जीवात्मा व परमात्मा यांची ऐक्यता करितात. पण संसारी प्रतापसिंहानें स्त्रीपुत्रादि परिवाराच्या मायाजालांत मग्नराहूनसुद्धां आपलें जीवन योगमय करून सोडलें. हा त्याच्या अंगीं योग्यापेक्षांही विशेष प्रशंसनीयमूण होता. नरपुंगव महाजन अशाच रीतीनें जगतांत संचार

करून नानारूपानें व अनेकविध मार्गांनीं लोकांना अज्ञानांधःकारांतून वर काढण्याचा प्रयत्न करित असतात. हें सर्वांना विदित असल्यामुळें त्याचें विशेष स्पष्टीकरण करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं.

प्रतापसिंहाची या वेळची विपन्नावस्था अतिशय कष्टतर होती. मनुष्याची खरी पारख खरोखर विपत्तींतच होत असते. अग्नितापानें जशी सुवर्णाची परिक्षा करतां येते- तद्वत दारिद्ररूपी अग्नितापानें मनुष्याची परिक्षा आपोआप होते. प्रतापसिंहाच्या परिक्षेचा आतां अवधि राहिला नव्हता. त्याच्या मनोनिग्रह, गांभिर्यादि गुणाकरितां त्याला कोटिवार धन्यवाद योग्य आहेत! " आपण हरलों " एवढेच दोन शब्द जरी एकवार तो बादशहाला सांगतां तरी त्याला त्याच्या पूर्ववैभवापेक्षांही अधिक वैभव मिळण्याचा व त्याचे सर्व मनोरथ सिद्ध होण्याचा पुष्कळ संभव होता. परंतु अशा दुर्दशेंतही त्या मानी पुरुषानें यांचा शब्दोच्चार केला नाहीं, इतकेंच नाहीं तर ज्या सरदारांनीं त्याला संकेतानें अनुमतीची सूचना केली होती त्यांनाही त्यानें चांगलेंच अंजन घातलें.

अकबराचीं निमंत्रणें एकवार नव्हे परंतु अनेकवार येत असत. पण व्यर्थ. " शत्रूसमोर हार जाऊन मी त्याच्या अनुग्रहांची इच्छा करावी? छे! छे! माझ्या हातून हें कधींकाळींही होणार नाहीं. " असें प्रताप वारंवार आपल्या मनाला सांगून आपला निश्चय दृढ करी. अशा दशेंत

दिवसांमागून महिने व महिन्यामागून वर्षे निघून गेलीं. पण प्रतापाचा निश्चय अणुरेणुही ढळला नाहीं.

प्रतापाच्या या अद्वितीय गुणानें त्याच्या चिरशत्रु मोगलांनाही त्याच्याविषयीं श्रद्धा वाटूं लागली. प्रतापसिंहाचें हें लोकोत्तर व्रतपालन पाहून गुणग्राही अकबरानें स्वतः त्याच्यासंबंधीं एक पद्यरचना केली. त्यांतील भावार्थ असा—" या संसारांतील सर्व वस्तु नश्वर व क्षणभंगूर असतात. मात्र कीर्ति व शुभनांव हीं दोनच कायतीं चिरस्थायी असतात. मेवाडच्या महीपाल प्रतापसिंहा! तुझी कोटिवार धन्य असो! अशा असह्य विपन्नावस्थेंतही तूं धर्मच्युत कीं कर्तव्यपराङ्मुख झाला नाहींस हें तुझें केवढें धैर्य! धर्मच तुझें रक्षण करील व तुझी कीर्ति सदैव राहील!! "

पूर्वीं आम्हीं सांगितलेंच आहे कीं, विपत्तिकाळांत प्रतापाचा परिवारवर्गच त्याला काळस्वरूप झाला होता. परिवारजनाविषयीं विचार करतां करतां तो स्वदेशप्रेमी महात्मा पुष्कळवेळां अश्रु ढाळी; व विचारमुक्त होतांच एखाद्या उन्मत्त माणसाप्रमाणें " हे मेवाड! हे चितोड! हे जन्मभूमी! असे ऊद्गार काढित असे.

या आपत्तकालीं, वनांत वास करणारे भिल्ललोकच कायते प्रतापाचे निस्सीम भक्त व मित्र होऊन राहिले होते. प्रतापाच्या कुटुंबीजनाचें हेच रक्षण करित असत. केव्हां मोंगलाचा अचानक हल्ला आला तर राजपरिवाराला

हेच लोक एका वनांतून दुसऱ्या वनांत व एका स्थानांतून दुसऱ्यास्थानीं घेऊन जाऊन त्यांचें रक्षण करीत. केव्हां केव्हां तर हे मोंगलांशीं लढून त्यांना पळवून लावीत. प्रतापसिंहाला असले प्रसंग वारंवार येत. केव्हां केव्हां तो एकटाच शेंकडो यवनांचा समाचार घेऊन आत्मीयजनाचें रक्षण करी. सारांश परिवारजनांना आपल्या सोबत राखून शत्रूशीं लढण्याचें कार्य प्रतापसिंहाला आतां अशक्य वाटूं लागलें. याप्रसंगीं स्त्रीपुत्रादिकांसाठीं जर एखादें भिन्न व सर्वथा निर्भय निरापदस्थान त्याला मिळालें असतें तर तो आपल्याला महाभाग्यशाली समजता; व असें झालें असतें तर युद्धांतही विजयसंपादन करण्याचा फार संभव होता.

भिल्लकन्या राजकुमारीबरोबर खेळायला येत. त्यांच्यांत अनेकप्रकारच्या गोष्टी चालत व सर्व बालिका परस्परांशीं स्नेहभावानें वर्तन करीत. भिल्लकन्या हरहंमेष राजपरिवारांतील माणसांसाठीं कांहींना कांहीं खाण्याच्या वस्तु आणीत असत; व राजमहिषी पद्मावती त्यांचा सादर स्वीकार करून त्याच्याबद्दल त्यांना आशिर्वाद देई. बिचाऱ्या पद्मावतीपाशीं त्यांना देण्यासाठीं तरी यावेळीं आशिर्वादा शिवाय दुसरें काय होतें.?

एके दिवशीं असा प्रसंग आला कीं जर त्यावेळीं भिल्लजनांचें सहाय्य नसतें तर आत्मीयजनाचें रक्षण करण्याचें कार्य प्रतापाला फारच कठीण गेलें असतें. एकदां एका दुर्गम अरण्यांत प्रतापसिंह आपल्या परिवारासह

बसला होता. इतक्यांत चोंहोबाजूनीं "दीन दीन" असा ध्वनि एकाएकीं ऐकूं आला. तत्क्षणीं दोन विश्वासु भिल्ल पवनगतीनें तेथें धांवत येऊन पोंहचले व सांगूं लागले—"राजा! आज तुझा घात झाला! बनेल तर तूं आपल्या स्त्रीपुत्रांचें रक्षण कर" प्रतापसिंहानें पाहिलें तों चोंहोंबाजूनीं मोंगलांनीं त्याला घेरलें होतें; व त्यामुळें परिवारजनाचें व आपलें स्वतःचें रक्षण करणें ही गोष्ट त्याला अशक्य भासूं लागली. निसटून जाण्याचा एकही मार्ग न दिसल्यामुळें नेत्रसंकेत करून प्रतापानें भिल्लांना असें सूचविलें कीं, त्यांनीं कोणत्याना कोणत्यातरी उपायानें कुटुंबीजनाचें रक्षण करावें व आपण एकटाच यवनांचें करों काय तें पाहून घेतों. भिल्लांना प्रतापाचा हेतू समजला व दुसऱ्या कांहीं भिल्लांना मदतीस बोलावून त्यांच्या सहायानें त्यांनीं फारच गुप्तरीतीनें राजपरिवाराला मोठ्या कुशलतेनें एका दूरच्या स्थानीं नेलें. आपलें कुटुंब शत्रूच्या तावडींतून निसटलेलें पहातांच प्रतापानें हातांत तरवार घेऊन तो हरहर महादेव करित मोंगलांवर तुटून पडला व अल्पावकाशांतच जवळ जवळ दोनशें मोंगलांस मृत्युच्या हवालीं केलें. तेव्हां बाकीचे यवनसैनिक जीव घेऊन तेथून एकदांचे पळत सुटले.

राजकुटुंबाला व्यवस्थितरीतीनें एका दुर्गम अरण्यप्रदेशांत ठेवून एक भिल्ल प्रतापसिंहापाशीं येऊन सांगूं लागला "हे राजा! तुझा सगळा परिवार 'जबरा' नामक जंगलांत क्षेम कुशल आहे तेव्हां तुला चिन्ता

करण्याचें कारण नाहीं, चल. आतां आपण सगळेच तिकडे जाऊन राहूं "

जवरा जंगलांत कुटुंबाच्या सुखरूप निवासाचा समाचार ऐकून प्रतापाच्या मनांत फार संतोष झाला. आनंद व दुःखमिश्रित अश्रू त्याच्या नेत्रांतून वाहूं लागले; त्यानंतर अधिक विलंब न करितां तो भिल्लांसहवर्तमान जवरा जंगलांत गेला व त्याचे दोन विश्वासु अनुचर व कांहीं सरदारही त्यांच्याबरोबर गेले.

प्रतापानें या जंगलांत येऊन पाहिलें तों हिंस्रक पशूंनीं कांहींही हानी न करावी एतदर्थ मोठमोठ्या वृक्षांच्या शाखांस बांधलेल्या वेळूच्या टोपल्यांतून आपलीं प्रिय माणसें बसलीं आहेत असें त्यास दिसलें. भिल्ल लोकांची ही अकृत्रिम सहानुभूति व भक्ति पाहून प्रतापाचे नेत्र पाण्यानें भरून आले. प्रतापाची अशी अशी अवस्था पाहून एक भिल्ल त्याला ह्मणाला—" राजा! असा शोक करूं नको हेही दिवस निघून जातील. या प्रसंगीं तूं असा शोक करित असलेला पाहून तुझ्या कुटुंबीयांची व तुझ्या अनुयायांची काय बरें अवस्था होईल? याचा कांहीं विचार कर. हे ईश्वरा! केवढा हा दुःखदायक व हृदय-द्रावक प्रसंग!"

भिल्लांचें हें शांतिपर व आश्वासनपर भाषण ऐकून प्रतापसिंह अंमळ शांत झाला व सर्व भिल्लांना त्यानें आलिंगनें दिलें. प्रतापाच्या आलिंगनामुळें सर्व भिल्ल आपणास धन्य मानूं लागले.

जबरा जंगलांत प्रतापसिंहानें पुष्कळ दिवस घालविले. हें स्थान त्याला सुरक्षित व निर्भय वाटलें. पद्मावती आपल्या पतीला स्वीकृत व्रत पाळण्यांत उत्तेजन देत असे. एके दिवशीं प्रताप आपल्या राणीला म्हणाला--" प्रिये मला आतां सर्व स्वप्नसमान भासत आहे. अशास्थितींत आपण अठरावर्षे काढिलीं; परंतु, अद्यापि आपल्या व्रताची पूर्ती होत नाहीं, तेव्हां माझें जीवन मला आतां व्यर्थ वाटूं लागलें आहे! "

" प्राणनाथ! हें कठोर व्रतपालन जर आपणास स्वप्न-समान भासतें तर मग यापरतें सत्य तरी काय आहे हें मला समजत नाहीं. " राणी ह्मणाली.

" प्रिये! जोंपर्यंत कार्यसिद्धि नाहीं तोंपर्यंत आपणाला हें स्वप्नच समजलें पाहिजे. अरेरे! देशकल्याणाचें एकसुद्धां कार्य आजपर्यंत माझ्या हातून झालें नाहीं! इतकेंच नव्हे तर उलट मी देशाची धुळधाण करणारा ह्मणून ठरलों. वडिलांनीं फक्त चितोडच गमाविलें होतें. पण मी महत्वा-कांक्षा बाळगून बाकीचाही सगळा देश गमावून बसलों व शेवटीं वनवास पत्करला. " प्रतापानें आपल्या खेदाचें कारण दर्शविलें.

" ह्मणून काय झालें? " राणी पुनः उत्तेजन देऊं लागली—" अशा या भिक्षुकदशेंतही राजराजेश्वरा प्रमाणें आपलें अंतःकरण महान् व गंभीर आहे. रजपूत जातीच्या हृदयरूपी क्षेत्रांत आपण जें स्वातंत्र्यरूपी बीजाचें

आरोपण केलें आहे त्या पासूनच एक विशाल वृक्ष उत्पन्न होऊन तो आपल्या छायेचा समस्त भारतवर्षीत प्रसार करील. आपण अशा या व्यर्थ मनोव्यथांचा आश्रय कां करितां? शांत व्हा—धीर धरा!

"प्रिये! फक्त माझ्याच वचनाला मान देऊन सहस्रावधि रजपून वीरांनीं समरभूमीत आपल्या प्राणाचें बलिदान केलें. पण माझ्या हातून देशहिताचें एकही कार्य घडलें नाहीं; तेव्हां मनोव्यथा होणें हें स्वाभाविक व नैसर्गिकच आहे." प्रतापानें आपला मनोभाव व्यक्त केला.

"देशाचें कल्याण या पेक्षां तें अधिक काय कसणार? स्वातंत्र्याच्या पवित्र मंदिरांत जन्मभूमीच्या मूर्तिसमोर आपण आत्मयज्ञ केला. तेव्हां आपलें राज्य, धन व ऐश्वर्य यांचा योग्यस्थानींच व्यय झाला आहे, असें निःसंशय ह्मणतां येईल. आपणाला याहून दुसरें कोणतें कल्याण करणें शक्य होतें? आपला पुत्रकन्यादि परिवार क्षुधेनें व्याकुळ होऊनही अजून या अरण्यांत निमुटपणें पडून आहे. आपण स्वत: सर्वस्वचा त्याग करून संन्यासी बनलां आपली अर्धांगीही छाये प्रमाणें आपल्या बरोबर राहून रानावनांतून आपल्या बरोबर भटकट आहे व भिल्ल व सांथळ लोक आपले मित्र व सहाय्यकर्ते आहेत. असें असूनही आपल्या हातून देशाचें कांहींही कल्याण झालें नाहीं असे जे आपण उद्गार काढितां ते मला अगदीं अकारण वाटतात." पद्मावती ह्मणाली.

" प्रिये! मी व्रत तर आचरीत आहे व कार्यसिद्धि-साठीं प्राणार्पणही करण्याचा माझा दृढसंकल्प आहे, परंतु खेदाची गोष्ट इतकीच कीं, माझा प्राण अद्यापि स्वस्थ आहे. खाणें-पिणें आदिकरून सर्व व्यवहार अद्यापि पूर्व-वत चालू आहेत. जीवनयज्ञांत सर्वस्वाची आहुति देण्याचा प्रसंग अजून प्राप्त होत नाहीं यासाठींच मी शोक करितों! " प्रताप ह्मणाला.

सजलनेत्रांनीं व गद्गद कंठानें पद्मावती ह्मणाली—" नाथ! खरोखर धन्य आहे आपल्या मानवजन्माची! "

" प्रिये! असें व्यर्थ रोदन करूं नको. " पत्नीला अश्वासन देण्याच्या हेतूनें प्रताप ह्मणाला--" मी तुला फक्त माझ्या मनांतील हेतू काय आहे तो कळविला. मी तुला खरोखर सांगतों कीं, केव्हां केव्हां माझ्या मनांत अशा भावना उत्पन्न होतात कीं, माझ्या हातून देशहित काय झालें? राज्य व ऐश्वर्य यांचा त्यागकरून मी काय पुरुषार्थ केला? असा प्रसंग येतांच कोणालाही असेंच वाटेल. हें साधारण आहे. प्रिये! व्रताचीसिद्धि झाल्या-विना मनांत केव्हांही शांति येणार नाहीं. "

" महाराज? आपण ज्ञानी, विज्ञ व बहुदर्शी आहां. तेव्हां मी आपणाला तें विशेष काय सांगणार? असें कठीण व्रत स्वीकारिलें असतांही कार्यसिद्धि होत नाहीं. तेव्हां ती आपली दुर्दैवप्रबलताच समजली पाहिजे! दुसरें काय?--पद्मावतीनें आणखी पतीच्या समाधानासाठीं यत्न चालविला.

"दुर्दैव प्रबलता तर खरीच ! पण या शिवाय दुसरेंही एक प्रबल कारण आहे. ईश्वराचे शिरीं सर्व भरिभार एकनिष्ठेनें टाकण्याइतका विश्वास अद्यापि आपल्या ठायीं नाहीं. अद्यापि आमच्या सर्व कार्यांत आह्मीं मनुष्याच्या सहायाची अपेक्षा करित असतों. पण हें योग्य नाहीं. यशप्राप्तीचा सर्व भार जर आह्मीं ईश्वराचे शिरावर टाकला असता तर आजपर्यंत मी श्री कृष्णपरमात्म्यास भेटून नरनारायण बनलों असतों. पण अद्यापि आपल्या अंगी एवढी संकल्पदृढता कुठें आली आहे ? प्रतापानें आंतरिक उद्गार काढिले.

प्रतापाचे हे उद्गार ऐकून पद्मावती स्तंभित होऊन गेली. काय बोलावें हें तिला सुचेना. ती आपली प्रतापाच्या मुखाकडे टकमक बघूं लागली.

प्रतापसिंह पुनः बोलूं लागला.—"हे अनाथनाथा पांडवसख्या श्री कृष्णा ! तूं कोठें आहेस ? प्रभो मला सत्वर भेट देऊन माझ्या या मायामोहादि दुर्गुणांना दूर कर. संसारबंधनापासून मला मुक्त कर व माझ्या इच्छानुसार या देशाचा उद्धार कर"

प्रतापसिंह ! तुझी ही केवढी अपूर्व देशभक्ती ! तुझी गणना मनुष्य कोटिंत करावी कीं देव कोटिंत करावी याची आह्मांला कल्पना सुद्धां होत नाहीं. तुझें हें सौजन्य व मनो-गांभीर्य पाहून मन विस्मयानें व भक्तीनें एकाएकीं उचंबळून येते. खरोखर तुझी गणना देव कोटिंतच करणें

योग्य आहे ! परंतु सुखदुःखरूपी मायामोहाच्या जाळ्यांत गुरफटून जाऊन क्षुद्र मानवप्राणी तुझी मनुष्य कोटिंतच गणना करितात. तेव्हां त्या भावास अनुसरूनच आम्ही तुझें-अपूर्व जीवन चरित्र लिहीण्यास प्रवृत्त झालों.

तुझ्या जीवनसहचर व प्रधानभक्त चंदावत कृष्णानें तुझ्याविषयीं एकदां असें म्हटलें होतें कीं " मृत महाराणा उदयसिंहाची चूक सुधारण्यासाठीं व लोकांना स्वदेशभक्तीचा उत्तम धडा घालून देण्यासाठींच पुरुषसिंह प्रतापसिंहानें या नश्वर संसारांत अवतार घेतला आहे. " व हेंच अक्षरशः खरें आहे.

---

## पंचम परिच्छेद.

# स्नेहसंताप.



केवळ प्रकाशमयी पौर्णिमेची रात्र ! निरभ्रनभोमंडलांत पूर्णचंद्र विराजित होता. सर्वत्र शांततेचें साम्राज्य व्यापून राहिलें होतें. सुंदर चंद्रिकेच्या धवल प्रकाशाचा सर्वत्र विकास झालेला दिसत होता. चंद्रिकेच्या प्रकाशानें जवरी जंगलाला एकप्रकारची अपूर्व शोभा प्राप्त झाली होती. वृक्षलतादि सर्व शांत होतीं. समस्त जगत् निद्रा-

सुखाच्या अनुपम उपभोगांत लीन झालें होतें. आकाशस्थ चंद्र आपल्या रमणीय तेजानें अवनीला आनंद देत होता. गगनांतील तारे स्थीरदृष्टिनें सृष्टीचें निरीक्षण करित होते. चकोर चकोरी अमृतमय चंद्रकिरणांचें यथेष्ठ पान करित होतीं. सर्वत्र शांतता व रमणीयता यांचेंच साम्राज्य व्यापून राहिलें होतें.

अशा या रमणीय रात्रीच्या शांतसमयांत जबरा जंगलाच्या निकट असलेल्या एका पर्वतशिखरावर बसून व जगांतील सर्व सुखदुःखें पार विसरून जाऊन एक अपूर्व सुंदरी आपल्याशींच गाण्यांत निमग्न झाली होती. गायनांतील प्रत्येक मात्रेच्या उच्चारांत सुधावर्षणाचा आभास होत होता. कोकिलेच्या प्रथम तानेप्रमाणें तिच्या गायनाचा आरंभ नीच स्वरांत झाला. शेवटीं तें गायन पंचम व सप्तम स्वरापर्यंत पोंहचलें. समस्त वनस्थलें मधुर गानानें दुमदुमून गेलीं. रात्रीच्या शांततेचा व निस्तब्धतेचा भंग करून सर्वथा तन्मय होऊन ती सुंदरी गाऊ लागली:—

" लक्षजन्मींची प्रेममिलनाशा धरूनि बैसली ही नारी।
दुर्दैव ती प्रेमापासुनी मनीं वंचिता हाय! करी,।
आत्मचिता जी रची स्वहस्तें तिजसम दुःखी कोण? अहा!
समजे तिच्या मनोव्यथेतें असा न कोणी पुरुष महा. "॥

गातां गातां त्या युवतीच्या नयनांतून उष्ण अश्रूधारा वाहूं लागल्या.

पौर्णिमेची रात्र! सर्वत्र शुभ्र चांदणें पडलें होतें.

जोत्स्नाधारा धरणीला स्नान घालित होत्या. पर्वतप्रदेशांत पडलेली कौमुदी पर्वतपंक्तीला अपूर्व शोभासरितांत विहार करायस लावित होती. वर अनंत आकाश व असंख्य तारे शोभत होते. जवळून वहाणाऱ्या निर्झरणींचा झुळझुळ ध्वनि व त्यांतील विलक्षण स्वर कर्णाला आनंद देत होता. पर्वतवासी वृक्ष-लता-तृणादि सर्व चंद्रिकेच्या किरणांनीं धवलता धारणकरून दुसऱ्याच रूपांत आपलें दर्शन करित होतीं. निसर्गदेवता आनंदसागरांत निमग्न होती. फक्त या रूपवती रमणीच्याच हृदयांत कायत्या मर्मभेदक वेदना होत होत्या.

युवती सर्वथा तन्मय होऊन गाणें गात होती. तिच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह वहात होता. तिचा केशकलाप व वसनें अस्ताव्यस्त पडलीं होतीं. अशा या चंद्रिकायुक्त रमणीय रजनींत निराशेनें कलुषित झालेल्या तिच्या हृदय-समुद्रांत अनेक प्रकारच्या विचारलहरी उत्पन्न होत होत्या. चंद्राचीं किरणें, पौर्णिमेचीरात्र व प्रकृतीचें अनुपम सौंदर्य हीं सर्व तिच्या वेदनांच्या वृद्धिला कारण होत होतीं. परंतु अशा आपत्तींत असूनही तिची मनोहर मूर्ति रम्यच दिसत होती.

सुंदरी आपल्या मधुर कंठानें पुनः तेंच गाणें गाऊं लागली.

पर्वताच्या दुसऱ्या [illegible]रांत आपला स्वर मिळवून कोणी तिच्या आलापाचें उत्तर दिलें:—

"विवश होउनी तुजसम प्रेमीं समदुःखी मी सखे होई
विचार याचा करितां करितां भ्रांतचित्त बनुनी जाई "!

हें पद्य गात गात एक सुंदर तरुण त्या युवतीपुढें येऊन उभा राहिला. या तरुणाचे तरलनेत्र अश्रुनीं भरले होते. त्याचा स्वर कंपित झाला होता; व त्याचें समस्त शरीर रोमांचित झालें होतें. ती तरुणी अनिमेष नयनानीं त्या तरुणाला पाहूं लागली. पहातां पहातां तिचेंही शरीर रोमांचित होऊन गेलें.

तो तरुण त्या चंद्रिकाधाराभिषिक्त मानिनिच्या मुखाचें अवलोकन करित अद्यापि गाण्यांतच निमग्न होताः--

"सुखस्वप्नातें हृदयीं धरुनि क्षण दुःखी क्षण सुखी होई।
विचार याचा करितां करितां नष्ट भान जाई बनुनी." ॥

सुंदरी अद्यापि त्या तरुणाचें मुखावलोकन करण्यांत निमग्न होती तरुणही त्या तरुणीला एकध्यानानें पहात होता: चतुर्नेत्रांचें ऐक्य होतांच मूकभाषेंत त्या उभयतांचीं परस्पर अनेक भाषणें झालीं.

निःस्तब्ध शांत रात्रीची वेळ. त्या निःस्तब्ध निर्जन अरण्यमय पर्वतप्रदेशांत हीं युवक युवती परस्पर मुखावलोकन करित निःस्तब्ध उभीं होतीं. दुसऱ्या कोणाही मनुष्यप्राण्याचें तेथें अस्तित्व नव्हतें.

मस्तकीं चंद्र प्रकाशत होता. चंद्राच्या शुभ्र किरणांचा सर्वत्र प्रसार झाला होता. कौमुदीकिरणपतनानें या पर्वतप्रदेशाला अपूर्व सौंदर्य प्राप्त झालें होतें. आसपास दुसरें

कोणीही माणूस नव्हतें. अशा समयीं तो तरुण व ती तरुणी परस्परांनां अतृप्त नेत्रांनीं अवलोकन करण्यांत निमग्न झालीं होतीं. त्यावेळचा तो अप्रतिम देखावा खरोखर चित्रांत आलेखन करण्यालायख होता.

पौर्णिमेची आनंदमयी रजनी! विरहिणी वनिता आजची रात्र कितीबरें कष्टानें घालवित असतील? व प्रेमिक प्रेमिकांना आजची रात्र कितीबरें आनंददायिनी भासत असेल? याची कल्पना करणें अशक्य आहे. याच रात्रीं उपरिनिर्दिष्ट प्रेमिक प्रेमिका या निर्जन वनमय पर्वतप्रदेशांत शून्य अंतःकरणानें परस्परांना पहात होतीं. परस्परांसाठीं उभयतांही मनांत झुरत होतीं. एकानें चित्रदर्शन करून व दुसऱ्यानें स्वप्नांत मोहिनी मूर्ति अवलोकन करून प्रेमप्रतिमेला आपापले प्राण अर्पण केले होते

तरुणीचें तरुणाचे ठायीं व तरुणाचें तरुणीचे ठायीं अनन्य व असाधारण प्रेम बसलें होतें. उभयतांनींही परस्पर देहविनिमय केला होता. पण दुर्दैव हेंच कीं उभयही संन्निध असून एकमेकांना प्राप्त होत नव्हतीं. त्यांच्या मार्गांत एक अनिवार्य विघ्न येऊन पडलें होतें.

चित्रांत पाहिलेली आपल्या प्रियतमाची देवतुल्य मूर्ति प्रत्यक्ष आपल्या नेत्रांसमोर उभी असूनही या जन्मीं त्याची प्राप्ति होण्याची आशा नाहीं हा विचार मनांत येतांच त्या तरुणीचें हृदय कंपित होऊं लागलें, त्याच प्रमाणें स्वप्नांत दर्शन झालेली आपल्या प्रियतमेची सुंदर

मनोहर मूर्ति, आपल्या जवळ असूनहीं इहलोकीं तिची प्राप्ति होणें अशक्य आहे या विचाराचा हृदयांत उद्भव होतांच त्या तरुणाचीही त्या तरुणी प्रमाणेंच अवस्था झाली. तरुण मनांत ह्मणूं लागला--" ब्रह्मदेवाचें हें केवढें अलौकिक कर्तव्य! माझ्या मनांत वारंवार असें येतें कीं, जन्मोजन्मीं मला हीच तरुणी प्राप्त व्हावी!" तरुणीच्या मनांतही असेच विचार चालले होते. उभयतांच्याही हृदयांत एक प्रकारची भयंकर विक्षोभ जागृति झाली होती. उभयतांच्या नेत्रांतून अश्रुंचें अविश्रांत वहन चाललें होतें. व उभयतांही अश्रुपूर्णनयनांनीं एकमेकांच्या मुखांचें अवलोकन करण्यात लीन झालीं होतीं. परस्परांच्या निरीक्षणांत अशा रीतीनें कांहीं वेळ निघून गेल्यावर ती तरुणी सद्गदीत कंठानें गाऊं लागली:—

" हृदयस्वप्ना अतां विसरुनी या नारीतें नाथ! त्यजा
मुखंदर्शनें नका दग्ध करूं, अन्य स्थानीं स्नेह सजा."

तिच्या त्या मधुर आलापयुक्त गंभीर गानानें दशदिशा व्याप्त होऊन गेल्या. तरुण थोडावेळ स्तब्ध होता; परंतु नंतर विषादपूर्ण अंतःकरणानें त्यानें उत्तर दिलें:-

" हेंच श्रेष्ठ भासे मजहृदयीं; आज्ञा दे प्रेमें मजला!
सत्वर जाऊं येथुनि आतां; जातों विसरुनि मी तुजला"

तो तरुण आपल्या कंपित स्वरानें त्या कामिनीच्या कंपित कराला स्पर्श करून तिची आज्ञा घेण्याच्या विचारांत होता; पण इतक्यांत आकाशांत एका पक्षानें किंकट ध्वनि केला. ध्वनि ऐकतांच दोघेंही चकित होऊन गेलीं.

या समयीं तरुणीची आज्ञा तरुणाला घेतां आली नाहीं. तो मनांत म्हणूं लागला—" पित्याच्या व्रतोद्यापनेला अजून कितीसा विलंब आहे? तेव्हां थोड्या वेळासाठीं पितृद्रोहाचें पाप शिरीं येणें हें योग्य नाहीं ! "

क्षणभर उभयतांही निस्तब्ध होतीं. शिरोभागीं अनंत आकाश, आसपास निर्जन वनस्थली व चरणतलीं अपार पृथ्वी ! अजून उभयतांही तेथेंच उभीं होतीं हा तरुण अमरसिंह व तरुणी यमुना हें वाचकांनीं ताडलेंच असेल.

---

## षष्ठम परिच्छेद.

## कालप्रभाव—" नाहीं " च्या स्थानीं होय.

" कालस्य कुटिला गतिः "



गावर रोमांच उभे करणारें असें प्रताप-सिंहाचें अमानुष देवचरित्र आम्हीं आतां-पर्यंत वर्णन केलें पण आतां प्रस्तुत परि-च्छेदांत आपणाला त्याच्या साधारण मनुष्यचरित्राचें अवलोकन करणें आहे. मनुष्य ज्यावेळीं महत्तेच्या शिखरावर पोंहचून अक्षय कीर्ति व अतुल पुण्य-संचय करतो त्यावेळीं तो सर्व आबालवृद्धांस पूज्य पुरुष होतो. शिवाय अशा पुरुषाच्या हातून कदाचित् कांहीं प्रमाद घडला तर त्यांच्याकडे लोकांचें विशेषच लक्ष

लागतें, जर कोणा साधारण मनुष्याच्या हातून त्याहीपेक्षां विशेष भयंकर प्रमाद घडला तर त्याविषयीं कोणी विचार करण्याचाही परिश्रम घेत नाहीं. साधारण बुद्धीच्या मनुष्याच्या हातून असा प्रमाद घडतो हा जगाचा साधारण नियमच आहे; परंतु ज्याच्या हातून कधींकाळीं प्रमाद घडण्याची कल्पनाही नसते अगर त्याचेठायीं जें कार्य असंभवनीय असतें असें कांहीं कल्पनातीत कार्य त्याच्या हातून घडलें तर प्रथम लोक तें खरेंच मानीत नाहींत. पण नंतर ज्यावेळीं त्याच्या सत्यतेची दर्शक अशीं कांहीं विशेष प्रमाणें त्यांना आढळतात, तेव्हां ते आश्चर्यचकित होऊन एकमेकांच्या तोंडाकडे पहात तटस्थ उभे राहतात. व मग त्याविषयीं अधिक उहापोह करूं लागतात. जगाचा हा अनादिकालापासून अबाधित नियमच आहे.

प्रतापाच्या देवचरित्राच्या वचनापासून ज्यांच्या मनांत त्याच्याविषयीं पूज्यभाव आहे त्यानीं प्रतापाच्या इच्छेनें अगर अनिच्छेनें झालेल्या प्रमादाचा वृत्तांत वाचून त्यामुळें विरक्त अगर खिन्न होऊं नये अशी आमची इच्छा आहे. कारण कसेंहीं असलें तरी प्रताप एक मनुष्यच होता. जीवधर्माचे नियम त्यालाही लागू होते. त्याची स्त्री होती. त्याचीं मुलें होतीं. तेव्हां सुखदुःखाचे तरंग त्याच्या मनांत उद्भवत असलेच पाहिजेत. वस्तुस्थिती अशी असूनही आजपर्यंत त्याच्या हातून एकसुद्धां प्रमाद घडला नव्हता. याचें कारण एवढेंच कीं तो एक पुण्यश्लोक महापुरुष होता.

सत्याचा अपलाप होऊं नये म्हणून या महापुरुषाच्या चरित्रांत कलंकरूप होऊन राहिलेल्या एका प्रसंगाचा येथें उल्लेख करणें हें आम्हीं आमचें कर्तव्य-समजतों, कसेंही असलें तरी प्रताप एक मनुष्य प्राणी होता; व प्रमाद घडणें हा मनुष्याचा एक नियम धर्म आहे.

दुर्दैवानें व दारिद्र्यानें आपलीं उग्र स्वरुपें दाखविलीं असतांही व अकबरानें वारंवार लोभ उत्पन्न करणारे अनेक संदेश पाठविले असतांही प्रतापसिंह व्रतहीन कीं कर्तव्य भ्रष्ट झाला नाहीं. पण आज घडलेल्या एका अपूर्व करुणाकारक दृश्यामुळें त्याच्या हृदय-समुद्रांत एक महान विक्षोभ उत्पन्न झाला. त्यानें त्याला चंचल व संकल्पभ्रष्ट करून सोडलें. कांहींही झालें तरी प्रताप एक पंचतत्वात्मक मनुष्यच होता.

एका गुप्त गिरिकंदरांत बसून अभागिनी राजमहिषी फार परिश्रमानें मिळविलेल्या आहार द्रव्याची पाकनिष्पत्ति करण्यांत गुंतली होती. जवळच एका तृणशय्येवर प्रताप आपल्या स्थितीचा विचार करित पडला होता. एका बाजूनें प्रतापाचीं दीर्घ नखें, मलीन वस्त्रें व वीरत्वदर्शक कृश शरीर इत्यादि चिन्हें त्याच्या कठोर व्रतपालनाची साक्ष देत होतीं व दुसऱ्या बाजूनें मूर्तिमान् दारिद्र्य काल-रूपानें आपल्या सहस्त्रशः जिव्हा पसरून त्यांच्या ग्रासा-साठीं टपून बसलें होतें. दुर्दैवी राजबालकें आशाशील भिक्षुकाच्या बालकांप्रमाणें मातापित्याच्या आसपास फिरत

होतीं. खाण्याची कांहींही वस्तु दृष्टिस पडली कीं, आप-आपसांत भांडून तत्काळ ती खाऊन टाकीत. यावेळीं अशीच कांहीं भांडाभांड चालली होती. प्रतापसिंह आज चार पांच वर्षे नित्य असले नवे नवे आदर्श पहात होता.

आजही पण तसाच एक करुणोत्पादक आदर्श प्रतापाच्या दृष्टिस पडला. त्यानें बालकांकडे दृष्टि फिरवून पाहिलें तों पद्मावती एखाद्या भिकारणीप्रमाणें फाटकीं-तुटकीं मलीन वस्त्रें परिधान करून क्षुधेनें व मनःस्तापानें कृश होऊन गेलेल्या हातांनीं चुलींत इन्धनें घालून मृण्मय तव्यावर कांहीं भाजीत असलेली त्याच्या दृष्टिस पडली. बालकें क्षुतातुर असल्यामुळें तिच्या शेजारीं बसलीं होतीं. तीं वरचेवर तव्यावर भाजत असलेल्या वस्तुकडे दृष्टि फेंकून ती केव्हां तयार होईल व केव्हां आपल्या पोटांत पडेल याचा विचार करित होतीं. ही भाजत असलेली वस्तु काय असेल बरें ? रुचि व सौगंध्य-रहित असें एक जातीचें वन्य तृणाचें पीठ ! या पीठाच्या भाकऱ्या करून प्रतापाची पट्टराणी त्या तव्यावर भाजीत चुलीपाशीं बसली होती

तृण शय्येवर पडलेला अर्ध-अवनीपती प्रतापसिंह हा सर्व देखावा पहात पडून होता व त्यामुळें उत्पन्न झालेल्या व्यग्रतेमुळें तो जणुं पर्वतराज हिमालय पदतळीं पृथ्वी व मस्तकीं आकाश धारण करून वर्षाव झंजावाताची पर्वा न बाळगतां आपल्याच मनोविचारांत लीन होऊन पडला आहे कीं काय असा भास होत होता.

राजमहिषी पद्मावतीनें आपल्या नेत्रांतील अश्रू पुसून तयार झालेली भाकर आपल्या बालकांस खायाला दिली. बालकांनीं अत्यंत प्रेमानें मिष्टान्नाप्रमाणें ती भाकर भक्षण केली. एका बालकानें आणखी कांहीं शिल्लक आहे कीं नाहीं व पुनः भूक लागली तर खायाला मिळेल कीं नाहीं याचीही चौकशी केली. पण "कांहीं शिल्लक नाहीं" असें ज्यावेळीं मातेनें निराशासूचक उत्तर दिलें त्यावेळीं कित्येकांनीं आतांच एकदम कां पोटभर खाऊन घेऊं नये असा मनांत विचार केला. इतक्यांत प्रतापाच्या एका सात आठ वर्षे वयाच्या कन्येनें आपणास मिळालेल्या भाकरीपैकीं अर्धी खाऊन बाकीची अर्धी दुसऱ्या खेपेसाठीं संग्रहीं ठेवली. हा प्रकार पाहून पद्मावतीला रडूं कोसळलें, पतीची सहानुभूति मिळेल किंवा नाहीं हें पाहण्यासाठीं तिनें एकवार प्रतापाकडे दृष्टिपात केला. पण धैर्यमेरु प्रताप किंचिन्मात्रही डगमगला नाहीं.

तो बाह्यदृष्टिनें डगमगला नाहीं; पण त्याच्या अंतःकरणाची स्थिति यावेळीं काय झाली असेल याची कल्पना प्रत्येकानें आपल्या मनांशींच करावी.

त्यानंतर दुसरा एक प्रकार घडला. कन्येनें मागाहून खाण्यासाठीं शिल्लक राखलेली अर्धी भाकर फारच काळजीनें जमिनींत एक लहानसा खड्डा खणून त्यांत लपवून ठेविली. व मातेपाशीं येऊन तिला मोठ्या केविलवाण्या शब्दानीं विचारिलें—"आई! तूं कां रडतेस?" इतक्यांत

तेथें एक रानमांजर आलें व त्यानें त्या बालिकेची प्राणापेक्षांही प्रियकर अशी अर्धी भाकर जमिनींतून उकरून काढून नेली. हें पाहून ती अर्ध क्षुधातुर बालिका हृदयभेदक आक्रंदन करूं लागली. मातेनें काय झालें? म्हणून अनेकरीतीनें तिच्या दुःखाचें कारण विचारलें. पण कांहींही उत्तर न देतां ती बालिका आपली रडतच राहिली.

आतां हिमालयानें आपल्या अचलतेचा त्याग केला व समुद्रानें गंभीरता सोडली. सतीच्या मृत्युसंवाद श्रवणानें धूर्जटीचा प्राण एकाएकीं व्याकुल होऊन गेला अर्थात प्रतापाच्या हृदयव्यथेस आतां पार राहिला नाहीं.

तो तृणशय्येवर पडून असलेला, सहस्र वृश्चिकदंशांनी जर्जरित व सहिष्णुतेचा अवतार प्रतापसिंह पडूनच हा करुणास्पद प्रकार पाहत होता, पहातां पहातां त्याच्या हृदयसागरांत वडवानलाचा उद्भव झाला. महाकष्टानें त्याच्या ज्वालेचा दाह तो शांत करूं लागला. गतकालीन व वर्तमान कालीन अनेक घटनांचे विचार त्याच्या डोळ्यांपुढें उभे राहिले आपल्या लाडक्या कन्येनें दुसऱ्यानदां खाण्यासाठीं राखून ठेविलेली अर्धी भाकर रान मांजर घेऊन गेलें व त्याच्यासाठीं ती रडत आहे, तसेंच तिला रडतांना पाहून पद्मावतीही रडत आहे हा देखावा पाहून प्रतापाच्या हृदयांत शल्यवत् वेदना होऊं लागल्या. ह्या असह्य वेदना त्यानें कोणाला कळूं दिल्या नाहींत. कन्येच्या अन्नार्थआक्रंदनानें त्याचें योगासन चालित

झालें. त्याच्या शांत हृदयसमुद्रांत एकाएकीं भयंकर विक्षोभोद्भव झाला. त्याचें हिमाचलासमान गंभीर व अचल-हृदय कंपायमान होऊं लागलें. त्याच्या नेत्रांपुढें अंधःकार पडला. मस्तकभ्रमण सुरु झालें व आपल्या बरोबर जणुं सर्व पृथ्वीही भ्रमण करित आहे असा त्याच्या मनांत भ्रम होऊं लागला. अर्थांत कन्येचा आक्रोश ऐकून प्रतापसिंह आपणही एखाद्या बालकाप्रमाणें रडूं लागला.

प्रताप रडूं लागलेला पाहून कन्येनें आपलें रडणें बंद केलें. पद्मावतीचेंही रडणें बंद पडलें. तीं सर्व भयभीत होऊन प्रतापाच्या शोकातुर मुखाकडे पाहूं लागलीं. सुख-दुःखाच्या भावानें विरक्त स्मशानवासी सदाशिवाच्या नेत्रांतून आज अश्रु कसे आले? याच विचारांत तीं पडलीं. असो. आम्हीं प्रतापाच्या अंगच्या कित्येक अलौकिक गुणांस भुलून जाऊन प्रतापाला सदाशिवाची उपमा दिली तरीपण वास्तविक रीतीनें पहातां प्रताप एक मानव-प्राणीच होता.

मानवप्राणी असल्यामुळेंच प्रतापाच्या हृदयसागरांत विक्षोभ उत्पन्न झाला. त्या हृदयसमुद्राच्या विचार-रूपी प्रवाहाचा आतां ज्या दिशेकडे वहनभाव सुरु होता त्या दिशेंत त्या गतीचा अवरोध करण्याचें कार्य अगदीं अशक्य होतें. प्रतापानें अकबराकडे संधि प्रार्थना केली.

प्रतापाचा चिरसहचर चंदावतकृष्ण आला. अमरसिंहही आला. महाराणी पद्मावती तेथें होतीच. प्रतापाचा विचार

ऐकून सर्व आश्चर्यचकित .होऊन गेलीं. त्यांनीं अनेक-प्रकारें त्याची समजूत केली प्रार्थना केली, त्याच्या मनांत आलेला विचार काढून टाकण्याचे शक्य तितके प्रयत्न केले; पण समुद्रसलिलगतीचा अवरोध करण्यास कोणीही समर्थ झालें नाहीं. भीष्माची प्रतिज्ञा कोण फिरवूं शकणार? सर्वजण भयभीत होऊन प्रतापाकडून कांहींशीं दूर जाऊन उभीं राहिलीं प्रतापासमक्ष बोलणें हें त्यांच्या सामर्थ्या पलिकडचें कार्य होतें.

यापूर्वीं संधिसाठीं बादशहाचे अनेक संदेश आले असूनही प्रतापानें त्यांस अनुमोदन दिलें नव्हतें. त्या दिवशीं शहाच्या जासुदाला जेव्हां प्रतापानें नाहीं असा जबाब दिला त्यावेळीं त्याच्या मुखांतून "होय" हा शब्द ह्मणविण्याचें कोणाच्याहीं अंगीं सामर्थ्य नव्हतें. त्याचप्रमाणें आजसुद्धां जेव्हां त्यानें "नाहीं" च्यास्थांनीं "होय ह्मटलें तेव्हां त्याच्या मुखांतून 'नाहीं' ह्मणविण्याचीही कोणाची प्राज्ञा नव्हती. महापुरुषांचा सर्व स्थितींत असाच प्रभाव असतो. भाग्य रेषा! मनुष्याचें तेथें काय शहाणपण!!!

---



## सप्तम परिच्छेद.

# अशक्य ! सर्वथा अशक्य !!

सौजन्य धन्य जनुषः पुरुषः परेषाम्
दोषान पास्य गुणमेव गवेषयन्ति ।
त्यक्त्वा भुजंगमविषाणि पटीरगर्भा-
त्सौरभ्यमेव पवनाः परिशीलयन्ति ॥ ”

रविकक्षा भ्रष्ट झाला! गिरीराज हिमाचल एका साधारण गिरीकंदरांत जाऊन लपून बसला. प्रचंड वृक्षाचें उन्मूलन झालें. एकाएकीं प्रतापाचें पारतंत्र्यस्वीकारदर्शक पत्र येतांच अकबराच्या मनांत एक-समयावच्छेदेंकरून आश्चर्य व विस्मयता यांचा उद्भव झाला. प्रतापसिंहानें अशा पारतंत्र्याचा स्वीकार केला असेल ही गोष्टच त्याला प्रथम खरी वाटेना! त्यानें तें संधिपत्र पुनः पुनः चार पांच वेळां वाचलें. अनेकवेळां दुसऱ्यांस दाखविलें व घडीघडी प्रतापाचें हस्ताक्षर तपासून पाहिलें. अशारीतीनें कांहींकाळ विचारांत घालविल्यानंतर शेवटीं त्याची खात्री झाली कीं पत्र प्रतापाचेंच आहे. तेव्हां त्याच्या आनंदास पार राहिला नाहीं. आपल्या राज्यांत त्यानें एक महोत्सव सुरु केला.

प्रतापाचा प्रधानभक्त रजपूत कविराज पृथ्वीराज याला अकबरानें हें वर्तमान कळविलें. संधिपत्रही दाखविलें व हें पत्र घेऊन येणाऱ्या दूताला यथेष्ट पारितोषिक दिलें.

पत्र वाचून पृथ्वीराज गहन विचारांत पडला. तीन तीनवेळां पुनः पुनः त्यानें प्रतापाचें पत्र वाचलें. हें अक्षर प्रतापाच्या हातचेंच आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं त्यानें वारंवार त्या पत्राचें निरीक्षण केलें.

तेव्हां अकबर मोठ्या दिमाखानें ह्मणाला—" काय कविराज ! हें पत्र इतक्या बारकाईनें पहाण्याचें कारण ? प्रतापसिंहानें असें संधिपत्र कां व कसें पाठविलें या विचारांत निमग्न झाला कीं काय ? मला तर असेंच वाटतें. मग खरें काय तें परमेश्वरालाच ठाऊक ! "

" हुजूरचें अनुमान खरें आहे. अपराधाची क्षमा असेल तर बोलतों–हें पत्र प्रतापसिंहानें स्वतः लिहिलें असेल असें मला तरी निदान वाटत नाहीं. " पृथ्वीराज ह्मणाला.

बादशहानें मोठ्या उत्सुकतेनें व म्लान मुखानें विचारिलें-" काय ? हें पत्र प्रतापसिंहाचें नव्हे ? हें बनावट आहे ? "

" स्पष्ट सांगण्यांत कांहीं अपराध होत असेल असें मला वाटत नाहीं व ह्मणूनच मी ह्मणतों कीं, मला हें पत्र बनावटच वाटतें. प्रतापसिंहाच्या कोणातरी गुप्त शत्रूनें त्याचें निर्मल यश कलंकित करण्याच्या हेतूनेंच हें पत्र लिहिलें असावें. " पृथ्वीराज साहसपूर्वक ह्मणाला.

" तुह्मीं माझी धारणा खोटी पाडूं पाहतां असें मला वाटतें; पण नाहीं. तुमची त्याच्यावर अतिशय भक्ति व श्रद्धा असल्यामुळें कदाचित् तुह्मांला हें पत्र खोटें वाटत

असेल. पण मी निश्चयपूर्वक सांगतों कीं हें अक्षर प्रताप-सिंहाचेंच आहे. दुसऱ्या कोणाचेंच नव्हें." अकबर निश्चयपूर्वक म्हणाला.

"जहांपनाह! मी प्रतापसिंहाला चांगला ओळखतों. स्वतःचें राज्य तर काय पण हुजुर जरी त्याला आपलें सर्व साम्राज्यही देण्यास तयार झाले तरी तो शरण येईल हें कधींकाळींही शक्य नाहीं. हें पत्र बनावटच आहे!" पृथ्वीराज म्हणाला.

कविजन सर्वस्थानीं व सर्व प्रसंगीं स्वतंत्रच असतात. फार दिवसांपासून बादशहाचें पृथ्वीराजावर प्रेम होतें व विशेषतः नौरोजच्या दिवशीं दृग्गोचर झालेल्या त्या सिंह-वाहिनी मूर्तीच्या तेजाचें व पराक्रमाचें दर्शन झाल्यापासून पृथ्वीराजाचेठायीं त्याचा अपूर्व भाव होता इतकेंच नव्हें तर तो त्याला थोडा भीतही होता.

बादशहाच्या मनांत शंकेचा उदय झाला व जोंपर्यंत पृथ्वीराजाच्या तोंडांतून हें पत्र प्रतापाचेंच आहे असें निघणार नाहीं तोंपर्यंत या शंकेचें समाधान होणें अशक्य होतें. म्हणून जरा क्रोधभावानें तो पृथ्वीराजाला म्हणाला—"जोंपर्यंत अमुक एका गोष्टीविषयीं आपला निर्णय ठरत नाहीं तोंपर्यंत त्याच्याविषयीं अभिप्राय देणें हा निर्भय मार्ग नाहीं. प्रतापसिंहावर आपला विशेष पूज्यभाव असल्यामुळेंच आपण असें बोलत आहां. हें पत्र प्रतापसिंहाचें नाहीं असें सिद्ध करण्यास आपल्यापाशीं काय प्रमाणें आहेत?"

" हुजूरच्या भाषणावर व्यर्थ टीका करावी हें या दासास शोभत नाहीं !" पृथ्वीराजानें गंभीरतेनें उत्तर दिलें.

"तुम्हांला जें काय योग्य वाटतें तें सांगा. मी कांहीं कोप करणार नाहीं." अकबर शांत होऊन म्हणाला.

" जर हुजूर सत्यच विचारित असतील तर मला सांगितलेंच पाहिजे. प्रताप असें पत्र लिहील हें अशक्य, सर्वथैव-अशक्य आहे !" पृथ्वीराजानें निश्चयपूर्वक सांगितलें.

" शक्य असो कीं अशक्य असो; पण काळाचा व आपल्या बळाचा सर्वांस विचार करावा लागतो. प्रतापसिंह हल्लीं कोणत्यादशेंत आहे याचा कांहीं विचार करून पहा." अकबरानें समय व स्थिती यांचें विवेचन केलें.

"मी याचा पुरापुरा विचार केला आहे. हल्लीं प्रतापसिंह सर्वस्वी साधनहीन, वनचारी व संन्यासी आहे !" पृथ्वीराज म्हणाला.

" तुम्हीं सांगतां त्याहीपेक्षां हल्लीं तो विपन्नावस्थेंत आहे. तूर्त खाण्याला त्याला पुरेसें अन्नही मिळत नाहीं. पुत्रकन्यादिकांना बरोबर घेऊन तो एका वनांतून दुसऱ्यांत व दुसऱ्यांतून तिसऱ्यांत अशा गुप्तरीतीनें भटकत असतो. माझे सैनिक रात्रंदिन त्याच्या पाठीस लागले असल्यामुळें दोन घटका शांततेनें बसण्याचा प्रसंग त्याला क्वचितच मिळतो त्याची एखाद्या भिकाऱ्यापेक्षांही हल्लीं वाईट अवस्था झाली आहे." अकबरानें प्रतापाच्या पीडेचें किंचित वर्णन केलें.

" हुजूरचें सांगणें सत्य आहे. परंतु अशा अधमावस्थेंत कष्ट भोगीत असतां उलट त्या महापुरुषाच्या चित्ताची दृढताच सिद्ध होते. त्याचें हिमाचलाप्रमाणें अचल मन् कधींकाळींही चळणार नाहीं. " पृथ्वीराजानें उत्तर दिलें.

" तर मग तुमचें मत असें आहे कीं, हें पत्र प्रतापसिंहाचे नाहीं ? " अकबरानें म्लानमुद्रेनें प्रश्न केला.

" होय ! सरकार ! माझा असा अभिप्राय आहे खरा. " पृथ्वीराजानें उत्तर दिलें.

" अभिप्रायाचा व अनभिप्रायाचा प्रसंग आतां नाहीं. तुमच्या अभिप्रायाची सत्यता दाखविणारीं प्रमाणें तुह्मांला रुजू करावीं लागतील. प्रतापसिंहाचें हस्ताक्षर तुह्मीं ओळखित असालच. तेव्हां या पत्राची चांगल्यारीतीनें प्ररिक्षा करून काय तें सांगा कीं हें अक्षर राण्याच्या हातचें आहे कीं नाहीं ? " अकबरानें पृथ्वीराजाला निक्षून सांगितलें.

पण पृथ्वीराज किंचिन्मात्रही घाबरला नाहीं. तो किंचित् हंसून ह्मणाला—' जहांपनाह ! जर कोणी प्रतापसिंहाच्या नांवचें पत्र लिहीण्याचें धाडस केलें तर त्यांच्यासारखें अक्षर काढलेंच पाहिजे. "

" जर असें असेल तर दिल्लीश्वराच्या हुजूर-बनावट पत्र पाठविण्याचें धाडस कोणाचें असेल ? असा जीवावर उदार झालला प्राणी तरी कोण ? " दिल्लीश्वरानें स्वाभिमानाचें स्मरण करून दिलें.

कोपाविष्ट होऊन अकबरानें तें पत्र घेऊन येणाऱ्या

दूताला एकदम दरबारांत बोलाविलें. बिचारा दूत कांपत कांपत हजर झाला. बादशहानें त्याला सांगितलें.–" या पत्राच्या सत्यासत्यतेचा निर्णय होईपर्यंत तूं आमचा बंदिवान आहेस."

गरिब बिचारा दूत! विनाकारण कारागृहवासी झाला.

## अष्टम परिच्छेद.

## पृथ्वीराजाचें साहस.



चलबिचल मन होतांच पृथ्वीराज मनांत अनेकप्रकारचे विचार करूं लागला. " खरोखर प्रतापसिंहानेंच हें पत्र लिहिलें असेल काय? मोंगलबादशहापुढें त्यानें आपली मान लवविली असेल काय? आज अठरा वर्षे आपल्या सर्व सुखोपभोगांचा त्याग करून ज्यानें वनचर वृत्ति स्वीकारली, केवळ चितोडच्या उद्धारार्थ जो मेवाडचा अखिल प्रदेश हिरावून बसला, क्षत्रियाचें नांव निष्कलंक राखण्यांसाठीं ज्यानें सिसोदिया कुळांतील समस्त कुमार कुमारिका दीर्घकाळपर्यंत अविवाहीत राखिल्या, तो प्रातःस्मरणीय पुण्यश्लोक हंमीरवंशज महाराणा प्रताप आज व्रतच्युत झाला काय? भयंकर दारिद्याच्या दुःखदायक

फेऱ्यांत सांपडल्यामुळें त्याच्या मनांत आपल्या प्रतिज्ञेचें विस्मरण झालें ? असें दारुण दुःख कसें सहन करणार ?

एकांतस्थानीं बसलेल्या पृथ्वीराजाच्या मनांत असे विचार चालले होते त्यानंतर तो मनांत ह्मणूं लागला — " बादशहाचें अनुमान खोटें नाहीं. संधिपत्रांतील हस्ताक्षर प्रतापसिंहाचेंच आहे. जरी प्रतापसिंहाची विमळकीर्ति कलंकित करण्यास उत्सुक असे अनेक गुप्तशत्रु व गृहशत्रु अजून जिवंत आहेत तरी इतके दिवसांनंतर असें पत्र बादशहाचे दरबारीं पाठविण्याचें साहस कोणी करील हें असंभवनीय दिसतें. जरी पत्र बनावट असलें तरी तें बादशहापाशीं घेऊन येण्याचें साहस दूत कसें करील ? पत्र घेऊन येणारा दूत चर्येवरून कांहीं नीच दिसत नाहीं. माझाच तर्क असत्य असें मला आतां वाटतें. एकंदरींत मेवाडचा उद्धार किंवा मेवाडच्या उदयाची अंतिम आशा यांचा आतां पुरापुरा नाश झाला !! "

" जरी ही गोष्ट खरी असली तरी त्यासाठीं मी महाराण्याला अपराधी मानणार नाहीं. इतकी दुर्दशा असतांही इतके दिवस यानेंच ह्मणून शत्रुपुढें टिकाव काढला. त्याच्या हल्लींच्या दुर्दशेचा विचार मनांत येतांच रक्ताचें पाणी पाणी होऊन जातें. अशा स्थितींत चलित झालेल्या मनाला दृढ करण्यास व उत्साहवृद्धि करण्यास त्याच्याजवळ कोणी माणूस राहिलेला नाहीं. त्याची उत्साहवृद्धि करण्यासाठीं मी माझ्या लाडक्या भगिनीला तिकडे पाठ-

विली आहे खरी; पण त्या उच्छृंखल कुमारीकेच्या हातून हें कार्य कितीसें पार पडणार? अर्थपूर्ण दोन गोष्टी सांगून अगर वीररसप्लुत दोन काव्यें म्हणून दाखवून ती कुमारिका त्या दृढप्रतिज्ञ, संकल्पपरायण, व स्वदेशभक्ताला कर्तव्यपरायण करूं शकेल काय? याप्रसंगीं जर मीं त्याच्यापाशीं असतों तर किती बरें चांगलें होतें।"

थोडावेळ मौन्य धारण करून तो पुनः विचार करूं लागला-"पण मी जवळ नसलों म्हणून काय झालें? मी येथूनच त्याला एखादी चांगली सल्ला देऊं शकणार नाहीं काय? त्याच्या एका दिवसाच्या मोहानें त्यानें इतकीं वर्षें पाळलेल्या व्रताचा जर भंग होत आहे व त्यासोबत अखिल मेवाडच्या भावीआशेचा भंग होण्याचा जर संभव दिसत आहे तर मला याप्रसंगीं याविषयीं त्याला कांहीं सूचना केल्याच पाहिजेत. मला माझें कर्तव्य बजावलेंच पाहिजे! पण हें कसें होणार?"

अशारीतीनें पृथ्वीराजानें शांततापूर्वक अनेक विचार केले व शेवटीं एक निश्चय करून तो म्हणाला-"होय! हाच योग्य उपाय दिसतो. असें केल्यानें सहजच निरपराधी दूत बंधमुक्त होईल व मीही माझें कर्तव्य बजावलें असें होईल. तरी पण निश्चयपूर्वक कांहींच सांगतां येत नाहीं. माझी मनोदेवता मला असें सांगते कीं, महाराण्याला जर आपली चूक झालेली दिसून येईल तर तो जागृतसिंहाप्रमाणें गर्जना करित उठेल. वस्तुस्थिति कशीही

असो पण बादशहाशीं वादविवाद करण्यापासून हें तरी फळ मिळालें. खरें कीं एक वेळ महाराण्याला त्याच्या सत्यप्रतिज्ञेची स्मृति तरी करावी. "

इतक्यांत पृथ्वीराजाची पत्नी महा साध्वी जोधाबाई तेथें आली. तिला पहातांच पृथ्वीराजानें तिला विचारिलें—" प्रिये! माझ्या मनांतील इच्छित हेतू सिद्ध होईल कीं नाहीं? सांग पाहूं? "

जोधाबाईनें हंसत हंसत उत्तर दिलें—मी कांहीं अंतर्ज्ञानी योगिनी नाहीं कीं मला आपला हेतू समजल्याशिवाय त्याच्या सफलतेचें अगर विफलतेचें उत्तर देतां येईल! "

" पण तुला काय वाटतें सांग तर खरी? पहा, पतिव्रतेच्या " हो " " ना " म्हणण्यावर माझा फार विश्वास आहे. " पृथ्वीराज आपलेंच म्हणणें घेऊन बसला.

" आपला हेतू कांहीं मला ठाऊक नाहीं. तेव्हां होय कीं नाहीं हें मी कसें सांगूं? हें मोठें दुष्कर कार्य म्हणायचें! पतिव्रतेला थोडेंबहुत अंतर्ज्ञान असतें असेंच समजून आपण प्रश्न विचारतां? जर असें असेल तर कोणाही पतिव्रतेला हा प्रश्न विचारा! जर मी एवढी पतिव्रता असतें तर— "

पृथ्वीराजानें फार आदरानें आपल्या पत्नीला चुंबनसुख दिलें, व तिला पुढें बोलूं न देतां प्रेमपूर्वक म्हटलें—" जीवन सर्वस्वे! प्राणप्रिये! तूं तशा प्रकारची पतिव्रता नाहींस असें कोण म्हणेल? या पापमय यवननगरांत

तुझ्यासारखी दुसरी पतिव्रता कोण आहे ? नौरोजच्या मेळ्याचे दिवशीं तूं जें अपूर्व शौर्य दाखविलेंस त्याचें स्मरण होतांच सर्व शरीर रोमांचित होऊन जातें ! प्रिये ! तुझ्याच पुण्यबलानें दिल्लीश्वराचें मन पापवासनेपासून पराङ्मुख झालें व त्यामुळें अनेक अबलांनीं तुला धन्यता-दर्शक आशिर्वाद दिले. त्या प्रसंगाचें स्मरण कर. असें असूनही तूं ह्मणतेस कीं मी एवढी पतिव्रता असतें तर—प्रिये ! खरें सांग. मी विनोद करित नाहीं. माझ्या मनांतील हेतू सिद्ध होईल कीं नाहीं ? ”

उत्तर दिल्याविना सुटका नाहीं असें पाहून जोधाबाईनें हंसत हंसत उत्तर दिलें—“ हो ! आपला हेतू सिद्धिस जाईल. ”

“ मला वाईट वाटेल ह्मणून तर हो नाहीं ना ह्मणत. ” पृथ्वीराजानें विनोदभावानें विचारलें.

जोधाबाई पुनः हंसून ह्मणाली—“ जर मी होय अगर नाहीं हें कांहींच न सांगतां दुसरीच गोष्ट सांगितली असती अगर मला काय ठाऊक ” असें ह्मटलें असतें तर आपल्याला वाईट वाटलें असतें. कदाचित् रागही आला असता. तेव्हां हार खाऊन मी शेवटीं ‘ हो ’ ह्मटलें तरी अजून माझी सुटका नाही ती नाहींच. हें काय ? जोधा-बाईनें विनोद पुढें चालविला.

“ तुझ्या बोलण्यानें मला राग येईल असें तूं कशावरून ह्मटलेंस ? ” पृथ्वीराजानें विचारलें.

" कशावरून तें पुरुषांना चांगलें ठाऊक आहे! स्त्रीयांना इतकीं सगळीं कामें समजत नसतात. " जोधाबाईनें हंसून एक कटाक्षपात करून नम्रतापूर्वक उत्तर दिलें.

" तर मग मला वाटतें कीं, स्त्रियांना कधीं रागावयाला कारणच मुळीं लागत नाहीं? आपल्या जातीचा केवढा हा पक्षपात! प्रिये! पक्षपात सोडूनदे व खरोखर सांग कीं माझा हेतू सिद्धिस जाईल कीं नाहीं? पृथ्वीराजानें पुनः विचारलें.

" आपल्या मनांत काय हेतू आहे तो सांगावा अशी विनंति करण्याची आज्ञा आहे काय? " जोधाबाईनें प्रार्थना केली व संकेतपूर्वक हेतू सिद्ध होण्याची सूचनाही दिली

" निःसंशय! तुला जर माझा हेतू कळविला नाहीं तर दुसऱ्या कोणाला कळवायचा? माझ्या मनांत यावेळीं महाराणा प्रतापसिंहाविषयीं कांहीं विचार चालले आहेत व त्यांच्या लाभासाठींच कांहीं हेतू मनांत धरला आहे. "

असें ह्मणून पृथ्वीराजानें आपल्या पत्नीला एका-मागून एक सर्व गोष्टी सांगितल्या. संधिपत्र घेऊन दूताचें येणें, पत्र बनावट असल्याविषयीं आपली कल्पना व बादशहाबरोबर झालेला वादविवाद इत्यादि सर्व गोष्टी क्रमानुसार त्यानें तिला सांगितल्या. त्या ऐकून जोधाबाईचाही पतीप्रमाणेंच अभिप्राय पडला. कांहीं विशेष अनिवार्य संकटें येऊन पडलीं असतील व त्यामुळेंच प्रतापसिंहानें हें संधिपत्र पाठविलें असेल असा त्यांचा ठाम निश्चय ठरला.

त्यानंतर पृथ्वीराजानें आपल्या मनांत जो विशेष हेतु होता तोही आपल्या अर्धांगीस निवेदन करून म्हटलें:- " एका यवन पहारेकऱ्याच्या सहाय्यानें त्या दूतास बंधमुक्त करून त्याच्याद्वारें महाराणाजीस एक गुप्त पत्र पाठविण्याची माझी इच्छा आहे. हें पत्र असें लिहिलें पाहिजे कीं, तें वाचतांच महाराणाजी आपल्या अंगीकृत व्रताच्या उद्यापनेसाठीं पुनः उद्युक्त होतील व मनांत धारण केलेल्या संधिकरण्याच्या संकल्पाचा ते त्याग करतील परंतु हा दूत विश्वासास पात्र आहे कीं नाहीं याची प्रथम आपण पुरीपुरी खात्री करून घेतली पाहिजे. "

जोधाबाई म्हणाली —" हें सर्व ठीक आहे. पण आपण आपल्या भगिनीसाठीं काय विचार ठरविला तो तरी कळूं दे, वन्सं आजन्म कुमारिकाधर्मांतच रहाणार कीं काय? अमरसिंहाशीं त्यांचा विवाह होणार कीं काय? माझ्या काकांनीं आपल्या निरोपाचा अव्हेरच केला ना? हरहर ! ! "

एक दीर्घ निःश्वास सोडून पृथ्वीराजानें उत्तर दिलें —" प्रिये ! दूताच्या मुखानें मी सर्व समाचार ऐकिला आहे, मोंगलांशी ज्याचा यत्किंचित्सुद्धां संबंध घडला नाहीं त्यांच्याशीं वैवाहिकसंबंध जुळवावा असा महाराणाजींचा दृढतर संकल्प आहे, तेव्हां, आपला तरी काय उपाय? यमुनेचा तर अमरसिंहाशींच शरीरसंबंध करण्याचा दृढतर संकल्प झालेला असल्यामुळें दुसऱ्या कोणाशीं तिचें लग्न

करतां येणार नाहीं. तेथें तिचा इच्छित 'प्रियकर तरी तिला दृग्गोचर होत असतो हें तिचें महद्भाग्यच समजलें पाहिजे. जर ती येथें असती तर क्षणोक्षणीं आमच्या व तिच्या शिरावर नवीन नवीन संकटें येऊन पडलीं असतीं, महाराणाजींच्या परिवारांत राहून तिला दुसरा जरी कांहीं लाभ झाला नाहीं तरीपण तिच्या पवित्रतेच्या व वंश मर्यादेच्या रक्षणाचा लाभ तिला घडत आहे एवढ्यांतच संतोष व समाधान मानतों."

"वत्सं आतां पुनः दृष्टिस पडतील अशी कांहीं आशा दिसत नाहीं! अजून आपणास किती दिवस या यवन-पुरींत निवास करावा लागणार आहे कोण जाणे? परमेश्वर या बंधनशृंखला लौकरच तोडो!!" जोधाबाई निराशेनें ह्मणाली.

"ईश्वराला जें योग्य वाटेल तसें तो करील. तें तुझ्या माझ्या हातीं थोडेंच आहे. अशा दुर्दशेच्यावेळीं महाराण्याला पत्रांत यमुनेविषयीं कांहीं सूचना करावी हें मला योग्य दिसत नाहीं. तिच्या नशिबीं काय लिहीलें असेल तसें होईल." पृथ्वीराजानें नशिबावर हवाला ठेविला.

---



## नवम परिच्छेद.



# पृथ्वीराजाचें पत्र.

नामशेष महाराणा प्रतापसिंहाच्या चित्तवृत्तींत एका-एकीं कांहीं चंचलता उत्पन्न होऊन तत्काळ त्यानें एक संधिपत्र लिहून बादशहाकडे रवाना करून दिलें. त्यानंतर थोडावेळ तो गंभीरपणा धारण करून स्वस्थ बसून होता. त्याची ही गंभीरता व स्तब्धता तुफानी समुद्राच्या स्थितीप्रमाणेंच होती. त्याची यावेळची उग्रमूर्ति पाहून त्याच्यापुढें जाण्याची कोणाला छाती नव्हती. त्याच्या अंतःकरणांत केवढें मोठें तुफान चाललें होतें याची कल्पना त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणालाही करतां येणार नाहीं. हाय! हाय! कित्येक वर्षेपर्यंत पालन केलेल्या महाव्रताचा एका क्षुद्र घटनेच्या योगेंकरून क्षणार्धांत लोप झाला! अर्थात यावेळच्या त्याच्या मानसिक स्थितीचें वर्णन करणें सर्वथैव अशक्य आहे.

अशा मनोवस्थेंत कित्येक दिवस निघून गेले. त्यानें पाठविलेला दूत दिल्लीस जाऊन पोंहचला. थोडे दिवस गेल्यानंतर,प्रतापसिंह खरोखर अगदीं अधीर व उन्मत्त होऊन गेला. प्रमादी मनुष्याप्रमाणें तो रात्रंदिवस मनांतल्या मनांत चडफडूं व शोक करूं लागला. अशा दशेंत त्याच्या हृदयाचे भिन्न भिन्न भाग तर गळून पडणार

नाहींत! अशी त्याच्या परिवारवर्गाला व हितैषि जनाला मोठी भीति वाटूं लागली.

उन्मादाचे दिवस निघून गेले. दोनप्रहरचा समय होऊन गेला होता. प्रमादिपुरुषाप्रमाणें प्रतापसिंह रडूं लागला. तो ह्मणाला—" हाय! हाय! इतकीं वर्षें अशा अवस्थेंत काढून शेवटीं मी आत्महत्या केली ना! हाय हाय! खरोखर आत्महत्याच केली! मी माझ्या हृदयाचें स्वहस्तानींच विदारण केलें! मला ही दुर्बुद्धि कोठून सुचली-मी हें दुष्कृत्य करण्यापेक्षां मरणच कां पत्करिलें नाहीं!

" कोणी सन्मित्र आहे काय? जर असेल तर त्यानें येऊन मित्रकार्य तडीस न्यावें. कार्य एवढेंच कीं त्यानें माझा वध करून माझ्या हृदयांत भडकत असलेल्या ज्वाले-पासून मला मुक्त करावें! त्यानें या व्रतभंगकारी अधमाधम नीच नराला जीवंत ठेवूं नये! जर माझा कोणी खरा मित्र असेल तर त्यानें येऊन मला या यमयातनेंतून एकदांचें मुक्त करावें! नाहीं तर मी ह्मणतों तो माझा मित्रच नव्हे. सर्वथैव माझा शत्रु आहे!"

पतीचें असें आर्त भाषण ऐकून राजमहिषी पद्मावती घाबरीघुबरी होऊन तेथें आली. तेव्हां तिला उद्देशून प्रताप ह्मणाला—" राजमहिषी! माझी तरवार कुठें आहे? ती सत्वर मला आणून दे,"

" नाथ! असें एकाएकीं झालें तरी काय?" राणीनें रडत रडत विचारिलें.

" प्रिये ! आतां होण्यांचें काय बाकी राहिलें आहे ? माझ्या नशिबीं शेवटीं असें व्हायचें होतें ! परमेश्वरा ! माझ्या शिरावर हा केवढा दुःखकारक प्रसंग कोसळला ! माझा सर्वस्वी नाश झाला ! मोंगलबादशहापुढें मी हार खाल्ली ! "

असें बोलून प्रतापसिंह स्वतःच गुहेंत गेला व आपली तरवार घेऊन आला व ती राणीच्या हातीं देऊन तिला म्हणाला-" प्रियतमे ! तुझ्या पतीच्या या अंतिम आज्ञेचें पालन कर-मला या असह्य यातनेंतून सोडीव ! आत्महत्या करावी हें मला योग्य दिसत नाहीं ! "

" प्राणनाथ ! मी हें काय ऐकत आहें ? माझें केवढें दुर्भाग्य ! हे जगदीशा ! शेवटीं माझ्या पतीच्या पवित्र अंतःकरणांत तूं उन्मादाचा वास करविलास व इतकेंच पाहण्यासाठीं तूं मला जिवंत ठेवलीस ! केवढी तुझी निर्दयता ही. ! " पद्मावतीनें मोठ्या निराशेचे उद्गार काढिले.

विकटहास्यकरून प्रतापानें उत्तर दिलें—" प्रिये ! ही तुझी शंका खोटी आहे. माझ्या मनांत उन्मादाचा निवास झाला नाहीं. जर मी वेडा झालों असतों तर तुच्छ भोगविलासांच्या आशेनें आजवर पाळलेल्या वृताचा त्याग केला असता काय ? अवनति स्वीकारून अकबराकडे संधिपत्र पांठविलें असतें ? या सर्व अनिष्टाचें मूळ ही दुष्ट विषयविलासतृष्णाच आहे. दुसरें कांहीं नाहीं ! "

इतक्यांत चंदावतकृष्ण, अमरसिंह, यमुना इत्यादि

त्याठिकाणीं येऊन दाखल झालीं. प्रतापसिंह चंदावतकृष्णास संबोधून ह्मणाला—" सरदार! आज तुमच्या स्वामिनिष्ठेच्या परिक्षेचा दिवस आहे. ही तरवार घ्या व तुमच्या या अधम स्वामीला इहलोकांतून परलोकीं रवाना करा!!"

हें भाषण ऐकून चंदावत्, अमर, यमुनादि सर्व आश्चर्यचकित होऊन प्रतापाच्या शोकावृत्त मुखाकडे पाहूं लागलीं.

पुनः उन्मादाचा झटका आल्याप्रमाणें उन्मत्त होऊन प्रतापसिंह ह्मणाला—" आपल्या हातानींच आपल्या घराला आग लावून तें चांगलें पेटूं लागलें इतक्यांत शुद्धीवर येणाऱ्या मनुष्याप्रमाणें आतां माझी अवस्था झाली आहे. माझ्यासाठीं या दुष्टबुद्धीचा कोठून उद्भव झाला? मी मोंगलांचा शरणागत कां ह्मणून झालों? इतक्यांत तो दूत दिल्लीला पोंहचला असेल काय?"

प्रतापाच्या उन्मादिनी अवस्थेचें कारण आतां सर्वांच्या ध्यानीं आलें व सर्वांच्या मनांत अत्यंत शोक होऊं लागला.

" महाराज? दूत काल परत येण्याचा संभव होता. आतां त्याबद्दल व्यर्थ शोक करण्याचें कांहींही कारण नाहीं जर संधि करणें अपमानकारक वाटत असेल तर त्याच दूताबरोबर एक उलट पत्र पाठवावें ह्मणजे झालें!" चंदावतकृष्णानें प्रतापाच्या हृदयांतील ज्वाला शांत करण्याचा प्रयत्न केला.

" सरदार! हा तुह्मां विषयीजनांचा उपदेश आहे.

अजून माझ्या हृदयांत पेटत असलेली ज्वाला मी कशी शांत करूं ? हिच्या शांतीचा कांहीं उपाय आहे का ? मला तर मृत्युविना दुसरा उपायच दिसत नाहीं. " प्रताप आपलाच हेका धरून बसला.

" स्वामिन्—"

चंदावत् कांहीं बोलणार होता; इतक्यांत मध्येंच प्रतापसिंह ह्मणाला—" आतां मी तुमचा स्वामी नव्हें जर मी तुमचा स्वामी असतों तर तुह्मीं स्वामीच्या आज्ञेचें उल्लंघन केलें नसतें !! सरदार ! जर तुमच्या मनांत एकनिष्ठ भक्ति असेल तर ही तरवार हातीं घ्या व माझ्या अस्तित्वाचा या जगांतून एकदांचा लोप करा. "

सरदार चंदावतकृष्ण रडत रडत ह्मणाला—प्रभो ! आपण जर असा धैर्याचा त्याग करूं लागला तर आमच्यासारखे क्षुद्रजीव व्रतपालन कसें करतील ! कुमारांना व्रताची दीक्षा कोण देईल ? अनाथ परिवारवर्गाचें रक्षण कोण करणार ?

" परिवार ! परिवार कोणाचा ? या परिवारानेंच माझा नाश केला. याच्याच मोहजालांत फसून जाऊन मी व्रतच्युत झालों ! नाहीं तर अकबराला शरण जाण्याचें दुसरें काय कारण होतें ? प्रतापानें चंदावताचे गोष्टीस हरकत घेतली.

इतक्यांत दूर घोड्याच्या टापांचा आवाज ऐकूं आला. सर्वजण फार उत्कंठेनें तिकडे पाहूं लागले. पहातां पहातां घोडेस्वार अगदीं जवळ आला. दूत दिल्लीहून परत फिरला होता. सर्वजण त्याच्या आगमनाची वाट पहात होते.

दूतानें घोड्यावरून खालीं उतरून प्रतापसिंहाला त्रिवार प्रणाम केला व एक पत्र त्याच्या हातीं दिलें. पत्र हातांत घेऊन प्रतापसिंह ह्मणाला—" आतां हें पत्र वाचण्याचें तरी काय कारण आहे ? या पत्रांत माझे मृत्युशर आहेत हें मी चांगलें जाणून आहे. बादशहानें अनुग्रह केला हीच अमंगल वार्ता त्यांत असणार ! दुसरें काय ? " असें ह्मणून प्रतापानें तें पत्र दूर फेंकून दिलें.

दूत ह्मणाला—" महाराज ! हें पत्र पृथ्वीराज राठोडानीं दिलें आहे. बादशहाचें नव्हें ! "

" काय ! हें पत्र बादशहाचें नव्हें ? " प्रतापानें आश्चर्य व आनंदमिश्रित भावानें विचारिलें–" बादशहानें माझ्या प्रार्थनेची उपेक्षा केली काय ? सांग ! सत्वर सांग ! जर वस्तुस्थिती अशीच असेल तर माझ्या मनाचें फार समाधान होईल. शत्रूनें केलेला अपमान व उपमर्द मी मोठ्या आनंदानें सहन करीन पण शत्रूचा अनुग्रह व दया सहन करण्याची माझ्या अंगीं शक्ति नाहीं ! काय आहे तें एकदां सत्वर बोल ! तुझ्या मुखचर्येवरून तर असेंच दिसतें कीं, तूं कांहीं आनंदाचीच वार्ता आणिली आहेस ! अकबरानें खरोखर माझ्या विनंतीचा अस्विकार केला काय ? माझ्या विनंतीची अवगणना केली ? "

प्रताप अशारीतीनें दूताला एकामागून एक अनेक प्रश्न विचारूं लागला. या अवकाशांत प्रतापानें फेंकून दिलेलें पत्र अमरसिंहानें उचलून घेतलें व तें उघडून पित्याच्या हातीं दिलें.

दूत ह्मणाला-" प्रभो! पृथ्वीराजराठोडांचें हें पत्र वाचून आपल्याला आपोआप सर्व वृत्तांत कळेल! आपण जें संधिपत्र बादशहाला लिहिलें होतें तें आपणच पाठविलें असावें हें पृथ्वीराजांना बिलकूल पटेना. तें बनावट आहे, आणि तें आपल्या कोणी शत्रूनें लिहिलें असलें पाहिजे असें अकबराला त्यांनीं स्पष्ट सांगितलें!"

प्रतापाच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचा प्रवाह सुरु झाला. नंतर तो दूताला उद्देशून ह्मणाला-हे दूता! या तुझ्या वनवासी स्वामीपाशीं तुला उपहार देण्यासाठीं दुसरी एकही वस्तु नाहीं. करितां यावेळीं मी तुला प्रेमपूर्वक आलिंगन देतों"

असें ह्मणून प्रतापानें आपले दोन्ही हात पुढें करून त्या दूताला अत्यंत अनुरागपूर्वक आलिंगन दिलें.

" प्रभूचें आलिंगन या दासाला लक्ष सुवर्णमुद्रांपेक्षां अधिक मौल्यवान आहे. प्रभो! आज मी खरोखर कृतकृत्य झालों!" दूतानें आपला आभारप्रदर्शक भाव प्रकट केला. व त्यानंतर त्यानें प्रतापसिंहाची चरणधूलि आपल्या शिरोभागीं धारण केली.

प्रतापसिंहानें पृथ्वीराजाचें पत्र पुनः पुनः वाचलें. वाचतां वाचतां त्याचें मुखकमल प्रफुल्लित होऊं लागलें. या आनंदभरानें तो दबून जात होता. पत्र एकदां वाचलें. पुनः वाचलें. फिरून वाचलें, व अखेरीस एकाएकीं गर्जना करून तो ह्मणाला—" युद्ध! युद्ध!! युद्धाविना

आतां दुसरें कांहीं नाहीं ! प्रिय मित्रानों ! मेवाडचा उद्धार केल्यावांचून मी आता प्राण त्याग करणार नाहीं !"

त्यानंतर तो मनांत ह्मणूं लागला-" अहाहा ! 'या पत्रांतील भाषा किती मिष्ट ! किती अमृतमय ! पृथ्वीराज नैसर्गिक कवि आहे यांत तिलमात्रही संशय नाहीं. तो नैसर्गिक व सत्य कवि असल्यामुळेंच शत्रूच्या कारागृहांत राहूनसुद्धां आपल्या देशबांधवांना अशारीतीनें उत्तेजित करित असतो ! यमुने ! धन्य तुझी व तुझ्या मातेची कीं तिच्या पोटीं असा पुत्र जन्मास आला. पण खेदाची गोष्ट मात्र एवढीच कीं असा नरपुंगव शत्रूचा बंदिवान व परतंत्र आहे ! ' असें ह्मणून प्रताप यमुनेला अनुलक्षून ह्मणाला-" यमुने ! तुझ्या बंधूचा मी शतशः ऋणी आहे. हें पहा त्यानें मला पत्र लिहीलें आहे ! "

यमुना आपल्या मधुर कंठानें सर्वास ऐकूं येईल अशारीतीनें आपल्या बंधूचें पत्र वाचूं लागली:—

( सोरठा )

" अकबर समद अथाह, सूरापण भरियो सजल;
मेवाडोतिणमाह, पोयण फूल प्रतापसी ॥ १ ॥

अकबर एकण बार, दागलकी सारीदूनी;
अणदागळ असवार, रहियां राण प्रतापसी ॥ २ ॥

अकबर घोर अँधार, ऊघाणा हिन्दु अवर;
जागे जुग दातार, पौहर राण प्रतापसी ॥ ३ ॥

हिन्दुपति परताप, पतराखी हिन्दु वाणरी;
सहे विपत संताप, सत्य सपथ करी आयणी ॥ ४ ॥

चौथी चित्तोडाह, बांटी बाजन्ती तणि ;
माथे मेवाडाह, सोहे राण प्रतापसी ॥ ५॥

सोरभ अकबर शाह, अलियल आभडिया नहीं;
चंपो चित्तोडाह, चोरस तणी प्रतापसी ॥ ६ ॥

पातल खाग प्रमाण; सांची सांगा हरघणी;
लही सदा लगराण, अकबरसूं उभी अणी ॥ ७॥

(दोहा) माईजण अहडा जगे, जहडा राणप्रताप;
अकबर सूतो ओझके, जाण सिराणे सांप ॥ ८ ॥

(सोरठा) राखो अकबरियाह, तेज तिहारो तुरकडा;
नम नम नीस रियाह, राणबिना सहराजवी ॥ ९ ॥

सह गावडिये साथ, येकण बाडे बाडिया;
राण न मानी नाथ, तांडे राण प्रतापसी ॥ १० ॥

सोयो सो संसार, असुर पलो ले ऊपरे;
जागे जगदातार, पोहरे राण प्रतापसी ॥ ११ ॥

(दोहा) धर बांकी दिन पाधरा, मरद नमूके माण;
घणें नरिंदां घेरियां; रहे गिरंदा राण ॥ १२ ॥

" स्वस्तिश्री, आर्यांचा सर्व आधार आर्यांवर; दिल्लीश्वरानें समस्त आर्यांवर आपल्या साम्राज्याची स्थापना केली आहे. फक्त एकाच महापुरुषापुढें त्याचा निरुपाय झाला आहे, तोच एक वीर कधींकाळीं मेवाडांत आपलें साम्राज्य स्थापून समस्त रजपूत जातीचा अग्रणी होईल. तेव्हां त्यानें आपलें चरित्र सदासर्वकाळ दर्पणवत् निष्कलंक राखिलें पाहिजे."

" अकबरानें फक्त मेवाडच घेतलें इतकें नाहीं तर अस्सल क्षात्रिय तेजाच्या बीजाचा नाश करून त्यानें रज-

पूतांच्या नांवाला कायमचें कलंकित करून टाकलें आहे. याचें विशिष्ट प्रमाण हेंच कीं एकदोन नव्हे तर अनेक आर्य अबला आजपर्यंत मोंगलांच्या अंतःपुरापर्यंत जाऊन पोंहचल्या आहेत. ''

" दुसरें नौरोजचा भ्रष्टमेळा ! हाय! हाय!! या मेळ्यांत आजपर्यंत किती कुलीन कामिनींच्या पातिव्रत्याचा क्रयविक्रय झाला असेल ! किती कुलीन व गौरवशील कुळाचें नांव या मेळ्यांत कायमचें कलंकित होऊन गेलें असेल !! अकबर स्वतःच या बाजाराचा कर्ता करविता होता !!! हर ! हर !! "

" अशा अधम अकबरापुढें प्रातःस्मरणीय पुण्यश्लोक वीराग्रणी प्रतापसिंहानें आपलें उन्नत मस्तक अवनत करावें काय ? हिमालयगिरीकंदरांत लपून बसण्याचा कधीं प्रयत्न करील काय ? राहूच्या भीतीनें भगवानभास्कर आपल्या मार्गाचा त्याग करतो काय ? हंमीरवंशजानें अकबरराजाच्या नीच कृतीचें अनुकरण करावें काय ? "

" काळाच्या अखंड व प्रचंड प्रवाहांत सर्वच वाहून जाणार आहेत. मात्र मागें रहाणार त्यांची कीर्ति व नांव ! आजपावेतों जर कोणी आपलें नांव निष्कलंक राखलें असेल तर तें एकट्या मेवाडच्या महाराण्यानें ! व त्यामुळेंच समस्त राजस्थाननिवासीजन त्याला परमेश्वराप्रमाणें पवित्र व पूज्य मानून मान देतात. त्यानें आतां या शेवटच्या घटकेस असें व्रतच्युत व्हावें काय ? रजपूतांच्या

पवित्रतेजाचें बीज त्यानेंच आजपर्यंत राखून ठेवलें आहे. मोंगलांचा नाश झाल्यानंतर भ्रष्ट राजस्थानांत तें बीज पेरण्याचें काम त्यानेंच करावयाचें आहे. करितां शेवटपर्यंत या बीजाचें रक्षण करून त्यानें धन्य व्हावें. इतकीच या दुर्दैवी भक्तकवीची विनंती आहे, इत्यादि इत्यादि."

पत्रांतील प्रत्येक अक्षरांत जी भक्ति व स्वातंत्र्यप्रीति दृग्गोचर होत होती ती पाहून सर्वांचीं अंतःकरणें आनंदानें भरून गेलीं व सर्वजण एकाएकीं गर्जना करून म्हणाले–" प्राण गेला तरी बेहत्तर पण मरेपर्यंत व्रतपालन केलेंच पाहिजे ! "

प्रतापसिंह अलौकिक आनंदभावानें म्हणाला " तथास्तु ! माझ्या अविचारानें ज्या प्राणाचें मी स्वतः बलिदान करण्यास तयार झालों होतों त्या प्राणाचें मी आतां केवढाही प्रसंग आला तरी रक्षण करीन ! आतां मेवाडचें भाग्य किती प्रबल आहे तें तरी पाहूं ! "

" मी एक सामान्य स्त्री असूनही माझ्या मनांत हें पत्र वाचून एकप्रकारचा उत्साह जागृत झाला आहे. तेव्हां जर आपली अनुमति असेल तर या स्त्रीवेषानेंच मी मोंगलांशीं तरवार घेऊन लढण्यास तयार आहे ! " यमुनेनें गद्गद् कंठानें प्रतापसिंहाची प्रार्थना केली.

" पृथ्वीराजाचे भगिनीच्या तोंडीं हे शब्द योग्यच आहेत. मुली ! तुला उदंड आयुष्य असो. "

असें म्हणून प्रताप पुनः मनांत म्हणूं लागला–" हाय !

हाय! इतकेंही असून मी हिला हिचा चिरवांच्छित आशिर्वाद दिला नाहींना? अरे दुष्ट मोंगलांनो! तुमच्या पापामुळेंच मला या अनुपम कुमारिकारत्नाला माझी स्नुषा करतां येत नाहीं!"

त्यानंतर दिल्लीहून परत आलेल्या दूतानें-तिकडील सर्व वृत्तांत निवेदन केला, पृथ्वीराजाचा अकबराबरोबर झालेला वादविवाद, आपला कारागृहवास, पृथ्वीराजाच्या प्रयत्नानें एका पहारेकऱ्याच्या सहाय्यानें झालेली आपली बंधनमुक्तता, पृथ्वीराजाशीं एकांतांत झालेली मुलाखत व पत्रदान इत्यादि सर्व गोष्टी त्यानें सविस्तर वर्णन केल्या. त्या ऐकून प्रतापसिंहानें पृथ्वीराजाविषयीं आपली पूर्ण कृतज्ञता व्यक्त केली व त्याला त्यानें सहस्रशः धन्यवाद दिले. शेवटीं प्रताप ह्मणाला—"याच श्रेष्ठ नराच्या पुण्यबलानें आज माझें व्रत अखंड राहिलें! कारागृहांत असूनही त्यानेंच आपलें मित्रकर्तव्य यथायोग्य बजावलें!! या ऋणांतून मी जन्मोजन्मींही मुक्त होणार नाहीं!"

एका अशुभ व राक्षसी मुहूर्तावर प्रतापाला जो भ्रम झाला होता त्याचें आजच्या या शुभ मुहूर्तीं पूर्णपणें परिमार्जन झालें. इतकेंच नव्हे तर या भ्रमाचें प्रतापाच्या मनांत रात्रंदिवस स्मरण राहिल्यामुळें त्याचें जीवनव्रत अधिकाधिक दैदिप्यमान होऊं लागलें. प्रतापाचें अंतःकरण देवासमान निर्मल झालें. पण याचें फळ त्याला काय मिळालें?

## दशम परिच्छेद.

# यमुनेची प्राणहुति.



रणशूर प्रतापसिंहाच्या संधिप्रार्थनेंत कांहींही अर्थ नसून त्याचा दूत सर्वांच्या डोळ्यांत धूळ फेंकून पळून गेला ही गोष्ट ज्यावेळीं बादशहाच्या कानावर गेली त्यावेळीं त्याचा राग अनावर झाला. त्याचा वैराग्नि दुप्पट प्रज्वलित झाला. त्यानें आपल्या सैनिकांना असा हुकूम दिला कीं, "पाहिजे तो प्रयत्न करा पण तो काफर कोठें राहतो त्याचा शोध करून त्याला पकडून बंदिवान करून माझ्यापुढें घेऊन या. तुम्हांला या कार्याबद्दल काय इनाम मिळणार आहे हें मी पूर्वी जाहीर केलेंच आहे. तरी पण पुनः एकदां सांगतों कीं, जो कोणी प्रतापसिंहाला बंदिवान करून माझ्यापुढें घेऊन येईल, त्याला या माझ्या अवाढव्य भारत साम्राज्याचा दहावा हिस्सा इनाम मिळेल!"

बादशहाचा हा हुकूम ऐकून राज्य मिळविण्याच्या लोभामागें लागून कित्येक मोंगलवीरानीं मेवाडांत येऊन आपल्या शक्तिपलिकडे प्रतापाचा शोध केला पण कोणाकाही त्याचा पत्ता लागला नाहीं.

शेवटीं मोंगलांची एक लहान टोळी इनामाच्या लालुचीनें प्रतापाचा शोध करित जबरा जंगलाच्या निकट

आली. त्याठिकाणीं दोन भिल्ल आपआपसांत कांहीं बोलत होते. तें ऐकून त्या मोंगल सैनिकांना अशी शंका आली कीं, दुर्दैवी प्रतापसिंह आपल्या परिवारासह याच जंगलाच्या आसपास कोठेंतरी वास करित असला पाहिजे. मोठ्या इनामाच्या आशेनें अंध झालेल्या त्या थोड्या लोकांनीं आपल्या बलाबलाचा विचार न करतां त्यांनीं प्रतापावर अचानक हल्ला करण्याचा निश्चय केला. ज्या दोन भिल्लांच्या गुप्त संभाषणावरून मोंगलांना प्रतापसिंहाच्या निवासस्थानाबद्दल तर्क बांधतां आला त्यांतील एका भिल्लास मोंगलांच्या तरवारीनें स्वर्गवास घडला. पण दुसरा निसटून जाऊन त्यानें प्रतापाला मोंगलांच्या आगमनाची भयंकर वार्ता कळविली.

ही अनिष्ट वार्ता ऐकून प्रतापसिंह उत्कंठित झाला व त्याच्यापाशीं असलेलीं साधनें तयार करून त्यानें मोंगलांबरोबर लढण्याचा निश्चय केला. सत्वर त्यानें—लहान लहान दगडांच्या राशी व झाडांच्या डहाळ्या एकत्र करून एक चालचलाऊ कोट तयार करविला. कांहीं भिल्ल या कोटा जवळ जमून लढण्यासाठीं तयार राहिले. कित्येक हातांत धनुष्यबाण घेऊन मोंगलांच्या आगमनाची वाट पहात होते.

सरदारांपैकीं फक्त चंदावतकृष्ण एकटाच प्रतापाच्या सहाय्यास उभा होता. चंदावतकृष्ण व अमरसिंह यांस बरोबर घेऊन मोंगलांचा हल्ला परतविण्याच्या हेतूनें सामोरा

जाण्यास प्रताप सिद्ध झाला. भिल्लांचें सैन्य पाषाणवृक्षाच्या शाखा व धनुष्यबाण हातांत घेऊन एका बाजूस उभें राहिलें. दुसऱ्या बाजूस चंदावतकृष्ण उभा राहिला. तिसरी बाजू अमरसिंहानें संभाळली व चौथ्या बाजूस शत्रूच्या आक्रमणाचा अवरोध करण्यासाठीं मूर्तिमान यम-राजाप्रमाणें प्रताप स्वतः उभा होता. चंदावतकृष्ण, अमरसिंह व प्रतापसिंह यांच्या हातांत भाला व कमरेंत दिव्य तरवारी होत्या.

यवन सैनिकांनीं " दीन दीन " अशी गर्जना करून अरण्यास चोहोंबाजूनें घेरून टाकिलें. चोहोंबाजूनें मार्ग रोख-लेला आहे हें त्यांना नंतर आढळून आलें. रजपुतांचें अनु-करण करून मोंगलसैनिकांनीं आपल्या समूहाचे चार विभाग केले हां हां ह्मणतां त्यांचें शत्रुपक्षाबरोबर असि-युद्ध सुरू झालें यासमयीं प्रतापाचा परिवारवर्ग शत्रूनें घेरलेल्या अरण्यांत एका वृक्षाखालीं बसला होता.

भिल्लांनीं मोंगलांवर पाषाणवृष्टि सुरु केली. दहा बारा मोंगल जखमी झाले व एक दोन मरण पावले. धनुष्य-बाणाचा परिणामही असाच किंहुना याहींपेक्षां विशेष होता. मोंगलांच्या हातून पांच दहा भिल्ल जखमी झाले. व एक दोन स्वर्गस्थही झाले, पण ज्या बाजूस चंदावत्-कृष्ण व महाराणा प्रतापसिंह हे होते त्या बाजस मोंग-लांची बहुतेक समाधिच झाली. अर्थात चंदावतकृष्ण व प्रतापसिंह हे विद्युद्वेगानें मोंगलांची डोकीं धडापासून

वेगळीं करितं चालले होते. हां हां ह्मणतां 'अनेक मोंगलांच्या अवताराळीलेची परिसमाप्ति झाली. इनामाच्या आशेनें पांच चार मोंगल अद्यापि लढत होते. त्यांतील एक दोन क्षणोक्षणीं प्राणभयानें पळूनही जात व पुनः परत येऊंन युद्धास प्रवृत्त होत.

कुमार अमरसिंह ज्या बाजूस उभा होता त्या बाजूची स्थिती चांगली नव्हती कारण एक तर कुमार तरुण होता. दुसरें असें कीं युद्धकलेंत त्यानें तितकी प्रविणता संपादन केलीं नव्हती. तेव्हां चंदावत् किंवा प्रतापसिंह यांच्या इतका अद्भुत पराक्रम त्याला दाखवितां आला नाहीं. इतकेंही असून प्रारंभीं त्यानें जें शौर्य दाखविलें त्यानें शत्रू कांहीं मागें हटले खरे परंतु त्याचें हें शौर्य शेवटपर्यंत टिकलें नाहीं.

प्रतापसिंह व चंदावतकृष्ण यांनीं अमरसिंहाची ही अवस्था पाहिली, पण त्यांच्यापैकीं कोणीही त्याच्या सहाय्यास गेला नाहीं कारण कीं जर ते आपल्या स्थानाचा त्याग करते तर कदाचित् शत्रु तिकडून पुनः हल्ला करून स्त्रियांच्या मर्यादेचा नाश करतील अशी त्यांना मोठी भीति होती. कुमार अमरसिंह थकून अगदीं गलित झाला. त्याचें सर्व अंग अगदीं रक्तमय झालें होतें.

दुरून एका सुंदर युवतीनें त्याच्या या दुर्दशेचें अवलोकन केलें. कुमाराचें शरीर रक्तमय झालेलें पाहून तिच्या नेत्रांत अश्रु आले. अरे ! पण हें काय ? एका

मोंगल सैनिकानें अमरसिंहाच्या मस्तकावर वार करण्या-साठीं आपली तरवार उगारली. दुसऱ्या एकानें त्याच्या खांद्यावर नेम धरला. तिसऱ्यानें त्याच्या छातीवर प्रहार करण्यासाठीं आपली तरवार वर केली. यमुनेच्यानें आतां शांति धरवेना. आपल्या प्रियतमावर असा बिकट प्रसंग गुदरत असलेला पाहून तिच्यानें स्वस्थ कसें बसवेल ?

आतां दुसराही कांहीं उपाय राहिला नव्हता. यमुनेनें वृक्षावर अडकवून ठेविलेली एक तरवार आपल्या हातीं घेतली व उग्रमूर्ति धारण करून क्षणार्धांत ती कुमार अमरसिंहापाशीं येऊन पोंहचली. पद्मावतीनें " मुली ! कुठें चाललीस ? थांब ! थांब ! असें साहस करूं नको " इत्यादि सांगून तिला मागें परतविण्याचा पुष्कळ यत्न केला. पण यमुना तिकडे बिलकूल लक्ष न देतां " ही पहा मी अशी आलेंच ! तुम्हीं बालकांचें रक्षण करा. रजपूत कन्या कधीकाळींही मृत्युला भीत नसतात असें ह्मणून विद्युद्वेगानें तेथून धांवत सुटली.

ती नवयौवनसंपन्न सुंदर कुमारिका भैरवीमूर्ति धारण करून हां हां ह्मणतां अमरसिंहापाशीं येऊन उभी राहिली व निमिषार्धांत तिनें अमरसिंहाचा प्राण घेण्यास उद्युक्त झालेल्या एका मोंगलवीरास भूतलशायी केलें. " अल्ला ! अल्ला ! " करित त्या मोंगल सैनिकानें प्राण सोडला.

" हें काय ! यमुने ! तूं येऊन माझ्या प्राणाचें रक्षण केलेंस ? तूं अशी समजून उमजून या आगींत उडी कां

मारतेस ? आतां माझ्या हातून तुझें रक्षण कसें होणार ? हे पहा तीन मोंगल तुझ्यावर हल्ला करण्यास येत आहेत. आतां काय उपाय करावा ? बोलण्यासही अवसर राहिला नाहीं ! दूर हो चांडाळा ! दूर हो ! "

अमरसिंह असें बोलत असतां त्याच्या हातावर एका मोंगलानें तरवारीचा वार केला. पण तत्काळ आपल्या तरवारीच्या एकाच वारानें त्या मोंगलाला त्या वीरबाला यमुनेनें स्वर्गीं रवाना केलें.

" यमुने ! तूं तर आज देवीरूपानें येऊन माझ्या प्राणाचें रक्षण केलेंस ! पण आतां मी तुझें कसें रक्षण करूं ? अरे ! पुनः–"

अमरसिंह असें बोलत होता इतक्यांत दुसऱ्या एका मोंगल सैनिकानें त्याच्या हातावर प्रहार करण्याचा प्रयत्न केला. पण त्यालाही यमुनेनें यमसदनाचा साधा व सरळ मार्ग दाखवून दिला.

अमरसिंह विस्मित होऊन ह्मणाला–" यमुने ! केवढी ही तुझी पराक्रमशीलता - निमेषमात्रांत तूं तीन मोंगलांना ठार केलेंस ! खरोखर आजपर्यंत मी तुला ओळखिलेंच नाहीं. तूं साक्षात् देवीचाच अवतार आहेस !! "

बोलण्यानें बोलणें वाढतें. आतां बोलण्यास अवकाश राहिला नाहीं. ते पहा ! चार मोंगल आपल्यावर हल्ला करण्यास येत आहेत असें दिसतें. तेव्हां वेळ न घालवितां सत्वर आपलें रक्षण करा." यमुनेनें अमरसिंहास वेळाची किंमत सांगितली.

पण हें काय ? त्या चार मोंगलांपैकीं तिघे यमुनेच्या अंगावर चालून आले व चौथ्यानें अमरसिंहास आपली शिकार बनविण्याचा प्रयत्न चालविला. " रजपूत स्त्रियांच्या अंगीं इतकें शौर्य असतें ? आतां पाहूं हिचें कोण रक्षण करतें तें ? " एक मोंगल दुसऱ्यास उद्देशून ह्मणाला.

त्या तिघांनीही यमुनेस घेरलें. खरोखर आज यमुनेनें सिंहवाहिनी रणचंडीचाच अवतार धारण केला होता. निमिषार्धांत तिनें त्या तीघांपैकीं दोघांस मृत्युच्या कराल दाढेंत लोटून दिलें. बाकी राहिला एक. अरे ! पण हें काय ? आपल्यावर चालून आलेल्या यवन सैनिकास स्वर्गाच्या द्वारीं प्रवेश करायला लावून अमरसिंहानें मागें वळून पाहिलें तों त्याच्या तोंडून एकाएकीं पुढील उद्गार निघाले " अरेरे ! यमुने ! हें काय झालें ? माझें रक्षण करण्यास इकडे येऊन तूं आपल्याच प्राणाची आहुति दिलीस अँ ?"

अश्रूपूर्णनयनांनी हे शब्द उच्चारून बाकी राहिलेल्या यवनांचा वध करून अमरसिंह लागलाच यमुनेकडे धांवत गेला व तिचें मस्तक आपल्या अंकावर घेऊन तो हृदयद्रावक रूदन करूं लागला.

यमुना फार खोल व मंद स्वरानें ह्मणाली-" कुमार ! क्षमा करा. या अंतकाळीं तरी माझ्या जन्माची इच्छा एकवार तृप्त करूं द्या.—प्राणेश्वर !—"

तिच्या मुखांतील " प्राणेश्वर " या मधुर व प्रियतम संबोधनानें तिचें रक्तमय शरीर जणुं पुलकित झालें आहे

असा भास होऊं लागला. तिच्या मुखकमलावर किंचित् हास्यछटेचा आभास झाला. यमुना पुनः ह्मणाली–" प्राणेश्वर! मरणसमयीं तरी मला आपल्याला या संबोधनानें बोलण्याचा प्रसंग आला हें माझें महद्भाग्य! आज माझ्या जन्माची इच्छा सफल झाली! आपल्या अंकावर मस्तक ठेवून मी स्वर्गवासिनी होत आहें यामुळें माझ्या मनांत अवर्णनीय आनंदाच्या ज्या लहरी उद्भवत आहेत त्यांचें ज्ञान माझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही होणार नाहीं. पुनः एकवार मी ह्मणत्यें " प्राणेश्वर! " हृदयवल्लभ! " जन्मजन्मांतरीं या दासीला आपला लाभ होऊन ही सदैव संयोगीनीच राहील असा मला आशिर्वाद असूं द्या!"

अमरसिंहानें रडत रडत उत्तर दिलें–" सुंदरी! खरोखर आजपर्यंत मला तुझ्या सत्यस्वरूपाची ओळख झाली नाहीं. तूं साक्षात् देवीचा अवतार आहेस. आजच्या या घोरतम प्रसंगीं तूंच येथें येऊन माझ्या देहाचें रक्षण केलेंस!–प्रियतमे! प्राणेश्वरी!"

खरोखर आज माझ्या नारीधर्माची सार्थकता झाली! जीवितेश्वर! पुनः एकदां मला त्याच नांवानें हाक मारा ह्मणजे कदाचित् अशाही स्थितींतून माझा उद्धार होईल!" यमुना पुलकित मुखानें ह्मणाली.

दीप विझून जाऊं लागला कीं ज्याप्रमाणें त्यांत एकवार प्रज्वलता येते त्याप्रमाणें आसन्नमरण झालेल्या यमुनेनें बलपूर्वक अट्टाहास केला व नंतर हलु हलु तिचें अंग थंड होत गेलें.

यमुनेची अशी अवस्था पाहून अमरसिंह ढळढळां रूदन करूं लागला. मध्येंच एक हुंदका काढून तो ह्मणाला—" हाय! हाय! यमुने! हें काय झालें? तर मग खरोखरच तूं मला विलाप करायला मागें ठेवून स्वर्गीं गमन करण्याच्या तयारींत आहेस? हाय! हाय! हृदयेश्वरि!"

यमुना फारच खोल व अस्पष्ट स्वरानें ह्मणाली—" अहाहा! आजचा दिवस मला किती आनंदाचा; समर क्षेत्रांतील रक्तासन तेंच माझ्या लग्नाचें आसन झालें! आज माझा मंगलविवाह झाला! या घटनेला देव साक्षी आहे! आतां मी माझ्या सतीधर्माचें अखंड पालन करण्यासाठीं पतीच्या अंकीं शयन करून सुखानें मरेन! मा–झ्या –बं–धू–ला हा–शु–भ–सं–वा–द–क–ळ–वा!"

झालें! यमुनेच्या मानवलीलेचा अंत झाला! तिचा प्राण पवित्रपणें प्रयाण करतां झाला. वादळशांत झालें. बहुतेक सर्व मोंगल ठार झाले. एक दोन वांचले त्यांनी प्राणरक्षणासाठीं पलायन केलें.

त्यानंतर सर्व भिल्ल, चंदावत्कृष्ण व प्रतापसिंह–सर्व अमरसिंहाकडे आले. तेव्हां अमरसिंह स्फुंदत स्फुंदत त्यांना उद्देशून ह्मणाला—" पिताजी! सर्वस्वी घात झाला! माझ्या प्राणाचें रक्षण करण्यास येऊन यमुनेनें आपल्या प्राणाची आहुति दिली. हें पहा तिचें मृतशरीर!

सर्वांच्या मुखांतुन एकाएकीं—" अरेरे " असा उद्गार निघाला. प्रतापमहिषी प्रभावतीही ह्या स्थानीं

येऊन पोंचली. तों रक्तबंबाळ झालेली व धुळीनें माखलेली यमुनेची मृतमूर्ति तिच्या दृष्टिस पडली. अश्रूंचा वर्षाव करित तिनें यमुनेचें शव प्रेमपूर्वक आपल्या मांडीवर घेतलें व तिनें विलापास आरंभ केला. किती हृदयद्रावक प्रसंग हा!

अतिशय दुःखानें कंठाचा अवरोध झाल्यामुळें खोल स्वरानें प्रतापसिंह ह्मणाला—" स्वर्गवासिनी कुमारिके! या दुर्दैवी परिवारांत येऊन पडल्यामुळेंच आज तुला असा हा अपमृत्यु आला! प्रियमित्र पृथ्वीराज! तुझ्या लाडक्या भगिनीचा तुझ्या गैरहजरींत अग्निसंस्कार करण्याचा दुष्ट प्रसंग शेवटीं माझ्या शिरावर आला हा माझ्या दुर्भाग्याचाच प्रभाव! दुसरें काय? परमेशा! तुलाही असेंच करावेंसें वाटलेंना? "

सर्वांच्या हृदयांत असह्य दुःख होऊं लागलें. सर्वांच्या नेत्रांतून अश्रूंचा प्रचंड प्रवाह खळखळ वाहूं लागला. नंतर प्रतापाच्या आज्ञेप्रमाणें चिता तयार करण्यांत आली. अमरसिंहानें आपल्या हातांनीं त्या सुवर्णप्रतिमेला चितेवर ठेविलें व अग्निसंस्कार होतांच चिता भडाभड पेटूं लागली.

यासमयीं यमुनेचें स्मारक करण्याचें सामर्थ्य प्रतापाचे अंगीं नव्हतें. ह्मणून ज्या तरवारीच्या प्रहारानें यमुनेनें त्या पांच यवनवीरांना यमसदनीं पाठविलें होतें ती तरवार प्रतापसिंहानें चितेच्या स्थानीं पुरून ठेविली, व तो ह्मणाला—" पुढें कधींकाळीं जर माझ्या हेतूंची सिद्धि

झाली व सुखाचे दिवस पुनः आले तर यास्थानीं यमुनेचें स्मारक म्हणून मी एक देवालय बांधून त्यांत तिच्या सुवर्ण मूर्तीची स्थापना करीन! अहाहा! यमुना साक्षात् लक्ष्मीच होती!!"

अमरसिंहाच्या सर्व आशा मनांतल्या मनांतच राहिल्या. आपली प्रियतमा चिरकाळ दूर झालेली पाहून त्यानें चितेला आपल्या अश्रुप्रवाहानें शांत करून तत्काळ त्या स्थानाचा त्याग केला. यमुनेच्या स्वप्नमयी ज्वलन्मूर्तीचा त्याच्या हृदयांतून यावज्जन्म लोप झाला नाहीं. प्रेमाचा सदासर्वदा असाच विचित्र प्रभाव असतो.

---

## एकादश परिच्छेद.

## भामाशा.

शतेषु जायते शूरः सहस्रेषुच पंडितः ।
वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा ॥



नाम मिळविण्याच्या इराद्यानें प्राण गमावून बसलेल्या मोंगलशिपायांपैकीं जे एक दोन पळून गेले होते त्यांनीं दिल्लीला येऊन बादशहाला समाचार निवेदन करतांना म्हटलें-". खुदावंत! फार दिलगिरीची गोष्ट कीं, पुष्कळ खटपट व मेहनत करून आम्हीं प्रतापसिंहाचा पत्ता मिळ-

विला पण आमच्या टोळींतील शिपायांची संख्या थोडी असल्यामुळें आम्हांला त्याला पकडून बंदिवान करून आणतां आलें नाहीं इतकेंच नाहीं तर आमच्यापैकीं बहुतेक जवानमर्द रजपूतांच्या तरवारीला बळी पडून जन्नतनशीन झाले. अर्थात् आमचें बळ हरलें व आम्ही मागें परतलों."

ही वार्ता ऐकून अकबराच्या अंतःकरणांत एकसमयावच्छेदेंकरून आनंद व विषाद झाला. आनंद होण्याचें कारण इतकेंच कीं इतके दिवसांनंतर पुनः प्रतापाचा शोध लागला. व विषादाचा हेतू हाच कीं आपल्या सर्व सैन्याची दुर्दशा होऊनही प्रताप हातीं आला नाहीं.— अद्यापि क्षत्रियांचे अंगीं राक्षसीशक्ति वास करित आहे व एक एक रजपूत शंभर शंभर मोंगलांना पुरा पडतो या विचारानें मनांतल्यामनांत तो आश्चर्यचकित व भयभीत होऊन गेला. परंतु ही आनंदाची अगर शोकाची भावना व्यक्त न करतां एक हजार मोंगलशिपायांची सेना त्यानें प्रतापाला पकडण्यासाठीं एकदम रवाना केली. जातांना त्यांना ताकीदीनें हुकूम केला " कसेंही करून प्रतापाला कैद करून आणा. माझें हें काम बजावण्याबद्दल काय बक्षिस मिळणार आहे हें आतां कोणाला ठाऊक नाहीं असें नाहीं. चला. फत्ते करा. "

दिल्लीश्वराच्या आज्ञेनें निघालेली यवनसेना प्रथमच नवरा जंगलांत येऊन थडकली. पण त्यापूर्वींच कांहीं दिवस चाणाक्य प्रतापसिंह तेथून अन्यत्र निघून गेला होता.

यमुनेच्या अंत्येष्टिक्रियेच्या दुसऱ्याच दिवशीं प्रताप-सिंहानें आरवलीपर्वताला शेवटचा प्रणाम केला. त्यावेळीं तो चंद्रावतकृष्णास ह्मणाला—" सरदार! ज्याअर्थी या निबिड अरण्यांत सुद्धां मोंगलांनीं. आपला शोध केला आहे त्याअर्थीं व जरी परवांच्या झटापटींत बहुतेक सगळे मोंगल मरून पडले आहेत तरी पण आतां आपणाला हें स्थान लौकरच सोडलें पाहिजे. पण जावें कोठें? या विशाल मेवाडांत व या विशाळ आरवलीपर्वतप्रदेशांत आपणाला विश्रांतीचें स्थान कोठें आहे? पण या विस्तीर्ण अवनी-तलावर कोठेंच आपणाला रहाण्यास स्थान मिळणार नाहीं? मित्रा! चल आपण या अभागी राजस्थानाचा त्याग करून सिंधुनदीच्या तीरीं जाऊन राहूं. तेथें एक लहानसें बेट आहे. तेथें वास्तव्य करून आपण आपले दुःखाचे दिवस घालवूं. तिकडे मोंगल आमचा पिच्छा पुरविणार नाहीं. प्राणप्रिय मित्रा! माझे सर्व विचार व माझ्या मोठमोठ्या आशा मृगजलवत् व्यर्थ होतील असा मला आतां भास होऊं लागला आहे. रजपूतांच्या सर्व सुखसौभाग्याचा संहार मीच हतभाग्यानें केला!"

" महाराज शांत व्हा! शांत व्हा! असें दुःख करूं नका चला. मनांत उद्भवलेल्या विचारांची परिपूर्णता करण्याची तयारी करा. पाहूं तर खरें त्याचा पुढें परिणाम काय होतो तें!" चंदावतानें धीर दिला.

" या महापापी प्रतापसिंहाला जिवंतपणींच नरकवास!

दुसरा परिणाम तो काय असणार? निघावें हें ठरलेंच. ” प्रतापानें पुनः निराशा व्यक्त केली.

त्यानंतर आपला स्त्रीपुत्रकन्यादि परिवार बरोबर घेऊन प्रतापसिंह तेथून निघाला. भग्नमनोरथ अमरसिंहही बरोबर होता.

थोडेसें चालल्यावर प्रतापसिंह उभा राहिला व चंदावत्‌कृष्णास सांगूं लागला–“ वीरवर्य! तुह्मीं या सर्वांना सांभाळित थोडावेळ येथें उभे रहा. मी या आरवलीपर्वताच्या उच्चतम शिखरावर चढून एकवार चितोडचें अंतिमदर्शन करून येतों चितोडच्या उद्धाराची माझी सर्व आशा आज समूळ नष्ट झाली!! ”

अरवली पर्वताच्या एका उच्चतम शिखरावर चढून प्रतापसिंहानें एकवार चितोडाकडे दृष्टिपात केला. त्यानंतर निराशापूर्ण एक गंभीर निःश्वास टाकून तो मनांतल्या मनांत ह्मणाला—“ हे माते जन्मभूमि! आज मी तुझा कायमचा त्याग करित आहें. या जन्मींच्या माझ्या सर्व आशा नष्ट झाल्या! सद्भाग्यानें जर दुसऱ्या जन्मीं तुझ्या चरणांचें स्थान मिळालें तर पुनः तुझ्या दर्शनाचा लाभ होईल. हे पुण्यमयी परमेश्वरि!! ”

यावेळीं प्रतापाच्या नेत्रांतून अश्रूंचें अविश्रांत व अखंड वहन होत होतें. पर्वत शिखरावरून उतरून प्रताप पुनः चंदावत्‌कृष्णापाशीं आला व आपल्या परिवार वर्गासह सिंधुतीरीं असलेल्या एका दूरस्थ प्रदेशांत जाण्यास निघाला.

ज्यावेळीं प्रतापानें प्रवासास आरंभ केला तो समय ग्रीष्मऋतूचा होता. वायुची प्रबलता असल्यामुळें उडत आसलेल्यां धुळीनें चाऱ्ही दिशा व्याप्त होऊन गेल्या होत्या. आसमंतात वृक्षांचा सर्वथैव अभाव असल्यामुळें, सूर्याच्या प्रखर तापानें पृथ्वीपट जणुं दग्ध होऊन जात आहे असा भास होई. अशा दुर्गम व दुस्तर मरुभूमींतून आपला मार्ग काढित मोठ्या निरुपायानें प्रतापसिंहाला निघावें लागलें!

असह्य चिंतासागरांत निमग्न होऊन व स्त्रीपुत्रांदिकांचा हात धरून प्रतापसिंह या भीषण मरुभूमींत उभा आहे. जवळ कांहींएक साधन नसल्यामुळें या मरुभूमींतून निर्विघ्न कसें पार पडतां येईल या मोठ्या विचारांत चंदावतकृष्ण पडली होता. इतक्यांत जणुं ईश्वरानेंच कोणी देवदूत पाठवावा असा एक पुरुष एकाएकीं त्यांच्या दृष्टीस पडला. तो पुरुष आपला पूर्वपरिचित असावा असाही त्यांना भास झाला. प्रतापसिंहास पहातांच तो पुरुष फारच उतावीळपणानें धांवत येऊं लागला.

प्रतापसिंहही त्या धांवत येणाऱ्या पुरुषाकडे निरखून पाहूं लागला. थोड्यावेळानें तो पुरुष अगदीं जवळ आला व प्रतापसिंहास साष्टांग प्रणिपात करून रडत रडत ह्मणाला "महाराणाजी! मेवाडच्या या अंतिम सामुग्रीचा स्वीकार करून चिंतेचा परिहार करा!"

असें ह्मणून त्या पुरुषानें आपल्या मागून आलेल्या आपल्या अनुचरांच्या खांद्यावरील सर्व द्रव्य एकत्र करून प्रतापसिंहाच्या चरणीं अर्पण केलें.

प्रतापसिंह विस्मित होऊन ह्मणाला–“ हे कोण ? प्रधान भामाशा ! भामाशा आपण इकडे कोठें ? तुह्मांला माझा शोध कसा लागला ? व हें अगणित द्रव्य तुह्मीं माझ्या चरणीं कां अर्पण केलें ? ”

मेवाडाधिपती ! हें सर्व धन मेवाडचें आहे. अर्थात् आपलेंच आहे. हें आपल्या उपयोगांत आलेंच पाहिजे. वृद्धसचीवानें उत्तर दिलें.

“ प्रधानजी ! मी आज कित्येक वर्षें वनचारी भिक्षुक बनलों आहे. तेव्हां हें धन मला कशाला पाहिजे ? ” प्रतापानें प्रश्न केला.

“ महाराणाजी ! मेवाडचें जें कांहीं आहे तें सर्व आपलेंच आहे. तेव्हां आपण या धनाचा स्वीकार करण्यास संकोच करूं नका. ” भामाशा ह्मणाला.

“ ज्यावेळीं मी मेवाडचा महाराणा होतों त्यांवेळीं तुह्मीं असें ह्मटलें असतें तर एकवेळ तें शोभलें असतें; पण आतां मी मेवाडचा राणा नाहीं. आतां मी निष्कांचन, आश्रयहीन व भिक्षुकांपेक्षांही भिक्षुक होऊन गेलेला एक यःकश्चित पुरुष आहे. आतां मी माझा परिवार बरोबर घेऊन या विशाळ मेवाडाचा कायमचा त्याग करून जाण्याच्या बेतांत आहे. प्रधानजी ! हें धन परत घेऊन चला व ज्याचें असेल त्याला परत द्या. ”

“ प्रभो ! क्षत्रिय कुलतिलक ! हा वृद्धसेवक स्वामीची समृद्धिच स्वामीचरणीं अर्पण करित आहे. त्याला निराश

करणें हें आपल्याला उचित नाहीं. मेवाडच्या अन्नावर वाढलेले आम्ही सर्व आपले वंशपरंपरेचे अनुचर आहों. व एवढ्यांचसाठीं आमच्या द्रव्याचा मेवाडच्या उद्धार कार्यांत व्यय झाला तर चांगलें अशी आमची दृढतम इच्छा आहे. तेव्हां या धनाचा स्वीकार करून दासाची एवढी ही मनीषा तृप्त करावी अशी या पवित्र चरणापाशीं अनन्यभावें प्रार्थना आहे. " भामाशानें अत्यंत नम्रतेनें प्रार्थना केली.

" मेवाडच्या दुःखानें तुमचें मन खरोखर व्यथित झालें आहे हें मी जाणून आहे. ईश्वर तुमचें कल्याण करील. पण तुमच्या धनाचा व्यय करण्याचा मला काय अधिकार आहे? मी त्याचा स्वीकार कां करावा? " प्रताप म्हणाला.

" महाराज! आपण राजनीतिज्ञ व ज्ञानी आहां. आपणाला मी काय उपदेश करणार? प्रजेच्या धनाचा सदासर्वदा राजाच स्वामी असतो, शिवाय हें धन तर मी स्वेच्छेनेंच मेवाडच्या कल्याणासाठीं अर्पण केलें आहे. तेव्हां याचा स्वीकार करण्याला आतां प्रत्यवाय कोणता? " भामाशानें दृढतेनें सांगितलें.

प्रतापसिंहानें कांहींवेळ मनांत विचार केला व नंतर तो म्हणाला -" ठीक तर भामाशाजी! मी तुमचा मनोरथ पूर्ण करतों. अर्थात् या धनाचा मी स्वीकार करितों. परंतु या संपत्तींतून मी एका कपर्दिकेचाही माझ्या परिवाराच्या सुखासाठीं व्यय करणार नाहीं. या सर्व द्रव्याचा मी मेवा-

इच्या उद्धारासाठींच व्यय करीन. काय? तुमची याला अनुमति आहे?"

"जशी महाराजांची इच्छा!" भामाशानें संक्षेपानें अनुमति दर्शविली.

"बरें! तुमची इच्छा फलद्रूप होवो! तुह्मीं महा पुण्यवान, उदार व दाते आहां. तुमच्याच द्रव्यानें मेवाडचा उद्धार होवो! तुह्मीं महा भाग्यशाली व स्वदेशभक्त आहां. तुमच्या धनाच्या प्रतापानें जननी जन्मभूमी पारतंत्र्य शृंखलेंतून मुक्त होईल. तुह्मीं राजनिष्ठ व धर्मनिष्ठ असल्यामुळें तुमच्या संपत्तीच्या प्रभावानें मोगलांच्या गर्वाचा नाश होईल अशी मला मोठी उमेद आहे. राजस्थानच्या इतिहासांत "मेवाडसंरक्षक" ह्मणून आपलें नांव अमर कीर्तिमान होईल!" प्रतापसिंहानें धनाचा स्वीकार करून भामाशाच्या स्वदेशसेवेची स्तुति केली.

आपली निराभिमानता व्यक्त करून भामाशानें उत्तर दिलें—"हीं सर्व कार्यें निर्विघ्नपणें व सामर्थ्यानें महाराणाजीच पार पाडूं शकतील. मी एक केवळ निमित्त मात्र आहे. दुसरें माझें कांहींही नाहीं."

(भामाशानें दिलेलें धन व प्रतापापाशीं जें कांहीं थोडेंबहुत शिल्लक होतें तें मिळून २५,००० माणसांस बारा वर्षें सतत पुरेल इतकें होतें.)

---



## द्वादश परिच्छेद.

# मेवाडचा पुनरुद्धार.

:o:

" चपलौ किल शूराणां रणे जयपराजयौ । " कथासरित्सागर.
" चक्रवत् परिवर्त्तन्ते दुःखानिच सुखानिच । " सुभाषितम्.



मे वाडवर पुनः परमेश्वराची कृपादृष्टि झाली? मेवाडला आपल्या गतवैभवाची पुनः प्राप्ति झाली? महाराणा प्रतापसिंहानें आपल्या अमित पराक्रमानें मोंगलांना भयभीत व चकित केलें? आज समस्त रजपूत एकत्र होऊन युद्धसामुग्रीची सिद्धता करून लढण्यास उद्युक्त झाले? व त्यांनीं अल्पावकाशांत स्वातंत्र्याची जयदुंदुभि वाजविण्यास प्रारंभ केला?

या सर्व प्रश्नाचें उत्तर एकच आहे. " होय. " आपल्या विपन्नावस्थेमुळें निराश होऊन स्त्रीपुत्रादिकांना बरोबर घेऊन प्रतापानें मेवाड सोडतेवेळीं जी अनन्यभावें परमेश्वराची प्रार्थना केली ती ऐकून त्या जगदीशानें भामाशाच्या हातून त्याला अपार धन दिलें व त्याच्या सहाय्यानें प्रतापसिंहानें आपल्या सर्व मांडलिकराजांस व सरदार लोकांस एकत्र जमविलें. त्यांच्या विलक्षण उत्साहानें प्रेरित होऊन प्रतापानें मेवाडच्या उद्धाराचा कृतसंकल्प केला. शक्तिसिंहही आपल्या बंधुस येऊन मिळाला

एवढ्या विस्तीर्ण व विशाळ मेवाडांत रहाण्यासाठीं सुरक्षित स्थळ न मिळाल्यामुळें दरिद्री प्रतापसिंह मेवाड सोडून कोठेंतरी दूरदेशीं निघून गेला असला पाहिजे अशी बादशहाची बहुतेक खात्री झाली; व त्यामुळें मोंगल सैनिक पूर्णपणें ऐषआरामांत निमग्न होऊन गेले. युद्धासाठीं त्यांची मुळींच तयारी नव्हती.

पण एक दिवस असा आला कीं, अचानक त्यांच्या त्या आनंदोत्साहाचा भंग होऊन गेला. त्यादिवशीं सहस्रावधि रजपूत सरदारांनीं "हरहर महादेव" असा गंभीर ध्वनि करून चोंहोबाजूनीं मेवाडदेशाला एकाएकीं घेरा दिला. मोंगलांना पळून जाण्यास मार्ग राहिला नाहीं.

अशी स्थिति पाहून मोंगललोक एकदम घाबरून गेले. ते आपआपसांत ह्मणूं लागले-हें कौशल्य कोणाचें असेल बरें? प्रतापसिंह मेवाड सोडून सिंधुतीरीं निघून गेल्यास तर आज पुष्कळ दिवस झाले! तेव्हां असलें हें साहस करणारा दुसरा वीरनर कोण?"

'देवीर' नामकस्थानीं रजपूतांच्या भाग्यलक्ष्मीचा पुनः उदय झाला. महाप्रतापी प्रतापसिंहानें महाशौर्यानें यास्थानीं मोंगलावर बलपूर्वक हल्ला केला. यासमयीं 'देवीर' मोंगल सेनापति शहाबाजखांच्या अधिकारांत होतें. एकाएकीं चढाई करून येणाऱ्या प्रतापसिंहाची भयंकर मूर्ति पाहून शहाबाजखां थरथर कापूं लागला. एका दिवसांत त्याच्या हजारों शिपायांस रणांगणींची धूळ खात पडावें

लागून शेवटीं याच संग्रामांत त्याचाही शेवट झाला. या युद्धांत शक्तिसिंहानें असाधारण शौर्य प्रकट केलें.

शहाबाजखांचे वांचलेले शिपायी 'अमैत' नामक स्थलीं पळून गेले. पराक्रमी प्रतापसिंहानें त्याठिकाणींही त्यांचा पिच्छा पुरवून त्यांचा बहुतेक संहार करून टाकला व आपली बहुतदिवसांची कोपज्वाला यवनांच्या रक्त-सिंचनानें शांत केली.

त्यानंतर प्रतापसिंहानें 'कमळमीर' आपल्या ताब्यांत घेतलें. यावेळीं अबदुल्लाखां नामक एक मोंगल सरदार 'कमळमीर'चा अधिकारी होता. प्रतापाच्या असह्य तेजापुढें त्याचा टिकाव लागला नाहीं व तो आपल्या सैन्यासह प्रतापसिंहाच्या कराल करवालांना बळी पडला.

अशारीतीनें फारच अल्पावकाशांत प्रतापसिंहानें एका-मागून एक बत्तिस किल्ले सर केले. अकबरला या गोष्टीची खबर मिळूनही त्याच्यानें कांहींही व्यवस्था झाली नाहीं. तो पुढें आपल्या सैन्याची व्यवस्था करणार इतक्यांत प्रतापसिंहानें हां हां ह्मणतां समस्त मेवाडदेश आपल्या अधिकारांत घेतला. एक वर्षाच्या अवधींतच मेवाडचा बहुतेक सर्व प्रदेश प्रतापसिंहाच्या सत्तेखालीं आला.

मेवाड हस्तगत करण्याचें कार्य संपल्यावर प्रतापानें आपला कट्टावैरी जो मानसिंह त्याच्या राज्यावर आक्रमण करून अंबरचा मुख्य बाजार लुटला व तेथील सर्व द्रव्य आपल्यां भंडारांत भरलें त्यानंतर थोड्याच दिवसांनीं उदयपूरही पुनः प्रतापाच्या हातीं आलें.

याप्रमाणें लहानमोठे अनेक देश, अनेक नगरें व अनेक दुर्ग प्रतापानें हस्तगत करून घेतले. हां हां ह्मणतां प्रतापसिंह पुनः समस्त मेवाडचा प्रबल प्रतापान्वित महाराणा झाला.

प्रतापानें मोंगलांकडून मेवाडची बहुतेक भूमि परत मिळविली. पण एक स्थान- फक्त एकच स्थान अद्यापि त्याच्या हातीं आलें नव्हतें. तें स्थान त्याच्या पूर्वज्यांचें कीर्तिस्थान चितोड !!

---

## त्रयोदश परिच्छेद.

## चितोड ! चितोड !




लांतरानें प्रतापसिंहाच्या दुसऱ्या सर्व आशा सफल झाल्या. पण फक्त एकट्या चितोड नगराचा अद्यापि उद्धार झाला नव्हता. एकामागून एक प्रतापसिंहाचे दुसरे सर्व हेतु सिद्ध होत गेले,-मात्र चितोडच्या उद्धाराचा एकच हेतु सिद्धीस गेला नाहीं. हळुहळु मेवाडचें सर्व गतवैभव परत आलें— मात्र मेवाडाधिपतीच्या हृदयाची शांति परत आली नाहीं !

मेवाडांत सर्वत्र आनंद व्यापून गेला. व्यापारादि सर्व

कार्यें पूर्ववत् चालू झालीं. मोंगलांच्या अत्याचाराची भीति नाहींशी होत चालल्यामुळें सर्व प्रजाजन आनंदांत व सुखांत दिवस घालवूं लागले. कलाकौशल्य व कृषिकर्म यांची दिवसेंदिवस उन्नति होत गेली. राज्यांत कोणत्याही प्रकारचें दुःख राहिलें नाहीं. इतकेंही असून प्रतापसिंहाचें मन मात्र दुःखी व व्यथित कसें? स्वतः वाचकांनांही या प्रश्नाचें सहज उत्तर देतां येण्यासारखें आहे. तेव्हां विशेष विवेचन व्यर्थ आहे!

प्रतापसिंहानें आपल्या यौवनावस्थेंत ज्या व्रताची दीक्षा घेतली होती तें व्रत अद्यापि पूर्णपणें कोठें सफल झालें होतें? अद्यापि समस्त राजस्थानाला स्वतंत्रता कोठें मिळाली होती? चितोड नगरी अद्यापि विधर्मी यवनांच्याच ताब्यांत होती. वस्तुस्थिति अशी असल्यामुळें प्रतापाच्या हृदयांत शांतता व सुख कोठून असणार? त्याच्या मनांतील मुख्य हेतु अद्यापि अपुराच राहिला होता. दिवसेंदिवस वृद्धावस्थेची छाया त्याच्यावर पडत चालली. खेदानें तो अधिकाधिक खंगत चालला.

अद्यापि त्याचा ब्रह्मचारी वेष, काषायवस्त्रें, वाढलेलीं नखें, तरुपत्रावर भोजन व तृणशय्येवर निद्रा इत्यादि नियमांचा प्रकार चालूच होता. समस्त मेवाडभूमि पुनः त्याच्या अधिकारांत येऊनसुद्धां तो नित्य उदास व खिन्न असे. त्याच्या मनांत रात्रंदिन चितोडचा ध्यासच लागला होता. त्याचें जप तप, ध्यान धारणा कायती चितोड!

चितोडचा उद्धार हा प्रतापाचा जीवनमंत्र होता. हें कार्य अद्यापिही त्याच्या हातून पार पडलें नव्हतें.!

कारण कांहींही असो. पण मोंगलांनीं आतां प्रतापा बरोबर युद्ध करणें सोडून दिलें होतें. अकबराचा यांत कांहींही हेतु असो पण हल्लीं तो प्रतापाविरुद्ध खटपट करण्याच्या भानगडींत पडत नव्हता; अर्थात यावेळीं मेवाडावर मोंगलांची लोलुपदृष्टि नव्हती. अकबरानें कृपा करूनच प्रतापाला शांतिसुख उपभोगण्यास अवसर दिला काय? असें तर कधींकाळींही घडूं नये. मग हें काय?

विचार करतां करतां प्रतापसिंहाचें अंतःकरण अभिमानानें भरून गेलें. त्याच्या हृदयसमुद्रांत भयंकर विक्षोभ होऊं लागला-तो मनांतल्या मनांत ह्मणूं लागला-"खरोखर माझ्यावर कृपा करण्यासाठींच अकबरानें युद्ध बंद ठेविलें काय? माझा इष्टहेतु सिद्धीस न जाऊं देतां केवळ माझी चेष्टा आरंभण्याच्या हेतूनेंच त्यानें मेवाड माझ्या हातीं येऊं दिलें काय? अशाचरीतीनें मला दग्ध करण्यासाठीं अकबर आपल्या अनुग्रहरूपी विषारीबाणाचा माझ्या शरीरावर प्रहार करित आहे काय? जर असेंच असेल तर माझे इतके परिश्रम, इतके कष्ट, इतकें धैर्य व इतकी सहिष्णुता शेवटीं निष्फळच ठरली, शेवटीं माझा पराजयच! तर मग मी इतका सगळा प्रपंच केला तो कशासाठीं? ईश्वराला विसरून मी या विषमय राजनीतींत कां पडलों? अगणित मनुष्यप्राण्यांच्या रक्तानें भूमातेला स्नान कां

घातलें ! या वीस वर्षांत मी असा काय पुण्यसंचय केला कीं मला माझ्या हेतूंची सिद्धता करतां आली ! तारुण्यावस्थेंत सिंहासनप्राप्ति झाल्यानंतर आजपर्यंत अनेक श्रम व अनेक कष्ट केले पण त्या सर्वांचा परिणाम शेवटीं हाच ? मला हें स्वप्नवत् भासत आहे. चितोडचा उद्धार अजून कोठें झाला आहे !

असे अनेक विचार करतां करतां प्रतापसिंहाचें मस्तक फिरून गेलें. "चितोड ! चितोड !!" असा घोष करतां करतां त्याला चित्तभ्रम झाला. त्याच्या मानसिक स्वस्थतेचा व शांतीचा लोप झाला. हळुहळु त्याची आयुष्य-शृंखलाही अधिकाधिक आंखूड होऊं लागली.

एके दिवशीं तृतीय प्रहरीं अतिशय चिंतेंत निमग्न असलेला प्रतापसिंह उदयपुरांतील एका उच्च राजमहालाच्या गच्चीवर बसून चितोडचें अवलोकन करित होता. अस्ताचलीं जाणाऱ्या संध्याकाळच्या सूर्याचीं रक्तवर्ण किरणें चितोडावर पडलीं होतीं. आसपासच्या उच्च पर्वतांना व निबिड अरण्यांना अपूर्व शोभा प्राप्त झाली होती. या अपूर्व शोभेच्या समीक्षणानें प्रतापाचें अंतःकरण एकाएकीं भरून आलें. त्याचें समस्त शरीर रोमांचित झालें. त्याच्या नेत्रांत जणुं अंधःकाराचा विस्तार होऊन गेल्याप्रमाणें भास होऊन तो मूर्च्छित होऊन धाडकन् धरणीवर पडला. बहिर्जगताचें त्याला भान राहिलें नाहीं.

मूर्च्छितावस्थेंत एक अद्भुत स्वप्न त्याच्या पहाण्यांत आलें. चितोडची अधिष्टात्रीदेवी साक्षात् येऊन त्याच्यापुढें उभी राहिली व मंजुळ मृदुस्वरानें आश्वासन देऊन त्याला म्हणाली-" वत्सा ! भिऊं नको ! नेत्र उघडून माझ्याकडे पहा. तूं ध्यान, ज्ञान, जप, तप, धारणा, आहार विहारादि कार्यांत रात्रंदिवस जिचें चिंतन करित असतोस तीच मी चितोडची अधिष्टात्रीदेवी आज स्वतः तुझ्या भेटीस आलें आहे. पुत्रा ! तुला दुःखी व निराश होण्याचें कांहींही कारण नाहीं. एकारीतीनें पहातां तुझ्या व्रताची सफलता होऊन गेली आहे. जरी तुझ्या हातून चितोडच्या उद्धाराचें कार्य पार पडलें नाहीं तरी पण आपल्या कर्तव्याची तूं परिपूर्ती केली आहेस. मेवाडांत तूं जें बीजारोपण केलें आहेस त्यापासून सत्वरच एक विशाळ वृक्ष निर्माण होऊन तो फलपुष्पांनीं मंडित होऊन सर्वांचीं मनें आपल्याकडे आकर्षण करील प्रतापा ! आतां या लोकींचें तुझें आयुष्य पूर्ण होत आलें आहे. तेंव्हां हें स्वर्गीय दृश्य तुला पहायला मिळणार नाहीं. तुझा पुत्र अमर तुझ्या स्वीकृत व्रताची दीक्षा घेऊन त्याची परिपूर्तता करील ! तूं आपल्या या अपूर्व पुण्य कृतीनें जो धर्मसंचय केला आहेस त्यानें तुझें नांव या जगांत अजरामर होईल ! ! ! "

स्वप्नाची समाप्ति झाली. प्रताप जागृत झाला. तो

हळु हळु उठून आपल्या पर्णकुटींत गेला व आपल्या प्रियतम तृणशय्येवर निद्रावश झाला ! हाय हाय ! या तृणशय्येवरून तो पुनः उठला नाहीं, ही तृणशय्याच त्याची मृत्युशय्या झाली !

---

## चतुर्दश परिच्छेद.

# प्रतापाचें परलोकीं प्रयाण.

" संभावितस्य चा कीर्तिर्मरणादति रिच्यते । "


कनिष्ठ असो कीं श्रेष्ठ असो जो परिणाम होणार होता तो झाला. आजचा दिवस हा शेवटचा. मेवाडचे मुख्य मुख्य मांडलिक राजे व सरदार प्रतापाच्या तृणशय्येसमोर बसून अधोवदनें करून अश्रू ढाळीत होते. कुमार अमरसिंह, आपल्या आसन्नमरण पित्यासमक्ष दोन्ही हात जोडून उभा होता.

जिवाला अंतिम यातना होत होत्या तरी प्रतापसिंह अस्पष्ट स्वरानें " चितोड ! चितोड !! " असा उच्चार करित होता. हा घोष सर्वांना ऐकूं आला व त्यामुळें सर्वांची अंतःकरणें अत्यंत विव्हळ होऊन गेलीं.

थोड्यावेळानें प्रतापसिंहानें आपले नेत्र उघडले. अमरसिंहाला पाहून त्यानें एक गंभीर निःश्वास सोडला. हें पाहून वृद्ध चंदावत् ह्मणाला—" महाराज! आपल्या हृदयांत कसली व्यथा होत आहे? आपल्या योगमयी शांतीचा भंग कशामुळें होत आहे? महाराज! आह्मी सर्व सामंतसरदार आपल्यापुढें उभें आहों-सांगा-आपली काय इच्छा आहे?"

" सरदार! मी महादुर्भागी आहें! मला मरणसुद्धां सुखानें येत नाहीं. चंदावत्! सांगा, कुमार अमरसिंह माझ्या व्रताची परिपूर्णता करील काय?" प्रतापसिंह मंद स्वरानें ह्मणाला.

कुमार अमरसिंहानें वीरासन घातलें व हात जोडून कंपित स्वरानें तो ह्मणाला—" पिताजी! माझ्या वचनावर विश्वास ठेवा! मी आपल्या व्रताची परिपूर्णता करीन."

" व्रताची उद्यापना करशील? तुझें सुकुमार शरीर असले कष्ट सहन करूं शकेल? छातीवर अग्नीची आगटी बांधून स्वदेशाच्या उद्धारार्थ आपलें प्राणार्पण करण्यास तूं समर्थ होऊं शकशील हें खरें काय?" प्रतापानें सशंकपणानें विचारलें.

" होय! पूज्य पिताजी! मी समर्थ होऊं शकेन! महाराणा प्रतापसिंहाचा पुत्र असत्य भाषण करील हें कधींतरी संभवेल काय?" अमरसिंहानें रडत रडत उत्तर दिलें.

" हा वेष, ही पर्णकुटि, व ही शय्या !-विशेष कांहीं नाहीं-काय ? जुळेल ? " प्रतापानें पुनः संशयित मुद्रेनें विचारिलें.

" असा कुलांगार कोण असेल कीं, जो आपल्या पित्याच्या अंतकाळच्या आज्ञेचें उल्लंघन करील ? पिताजी ! मरेपर्यंत मी चितोडच्या उद्धारासाठीं प्रयत्न करीन ही प्रतिज्ञा मी धर्माची साक्ष ठेवून करित आहें आपलें आत्मबल मला साह्य होवो ! " अमरसिंहानें प्रतिज्ञा केली.

" आतां मी सुखानें मरेन ! " प्रतापानें अंतिम उद्गार काढले.

प्रतापसिंहानें कांहीं संकेत केला. तेव्हां अमरसिंहानें आपलें मुख पित्याच्या मुखाकडे नेलें. प्रतापसिंहानें पुत्राच्या मस्तकी हात ठेवून त्याला आशिर्वाद दिला व तो ह्मणाला —" ही उक्ति सदासर्वकाळ ध्यानांत ठेव-संभावितस्यचा कीर्ति मरणादति रिच्यते. "

त्यानंतर चंदावतकृष्णाकडे पाहून प्रताप किंचित् हांसला. चंदावत् त्या हास्याचा भावार्थ समजला व तो कंपितस्वरानें ह्मणाला—" महाराज ! जोंपर्यंत मी जिवंत आहे तोंपर्यंत कुमार पितृव्रताचें उल्लंघन करूं शकणार नाहीं. मी रात्रंदिन त्यांच्यावर नजर ठेवीन. हें माझें अंतिमवचन आहे. आपण निश्चिंत असावें. "

प्रतापसिंहाच्या मुखमंडलावर अपूर्व व अलौकिक

हास्याची छटा दृग्गोचर होऊं लागली. आसन्नमरण समयीं मुखमंडलावर स्वर्गीय लावण्य झळकूं लागलें. तें हास्य, तें लावण्य अजूनही दृष्टिगोचर होत होतें इतक्यांत अचानक त्या स्वदेश प्रेमी, परमपुण्यशील, वीराग्रणी, अर्जुनावतार, मेवाडचक्रचूडामणि व राजस्थानच्या दीव्यरत्न महापुरुषानें आपल्या आयुष्याच्या मध्यान्ह काळांतच आपले नेत्र मिटून चिरकालीन शांतिसुख भोगण्यासाठीं स्वर्गगमन केलें!!!

शांतिः! शांतिः!! शांतिः!!!

---

